# श्रीज्ञानेश्वरमहाराज

## -चरित्र आणि ग्रंथविवेचन-



आवृत्ति दुसरी.

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.

# देवभक्त--चरित्रमाला.

३.

तैसें हारपलें आपणपें पावे । तें संतांतें पाहतां गिंवसावें ।
म्हणोनि वानावे ऐकावे । तेचि सदा ॥ ( -ज्ञानेश्वरी १८-४०० )

॥ श्रीविठ्ठल प्रसन्न ॥

# श्रीज्ञानेश्वरमहाराज

## -चरित्र आणि ग्रंथविवेचन.-

ज्ञानेशो भगवान्विष्णुर्निवृत्तिर्भगवान्हरः ।
सोपानो भगवान्ब्रह्मा मुक्ताख्या ब्रह्मचित्कला ॥ १ ॥

संपादक व प्रकाशक.

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.**

'मुमुक्षु'कर्ते, पुणें.




आवृत्ति दुसरी.

मार्गशीर्ष शके १८४५, जानेवारी १९२४.

कि[illegible]या.

॥ श्रीरुक्मिणीपांडुरंगाभ्यां नमः ॥

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें चरित्र व ग्रंथविवेचन ' हा ग्रंथ श्रीनाथ-चरित्रानंतर सव्वा वर्षानें आज महाराष्ट्र वाचकांस मी प्रेमानें सादर करीत आहें. महाराज हे महाराष्ट्रांतल्या भक्तिपंथाचे आद्यप्रवर्तक आहेत, ते अद्वैत आणि भक्ति किंवा निर्गुण आणि सगुण यांचें ऐक्य प्रतिपादन करणाऱ्या भागवतधर्माचे प्रमुख संस्थापक आहेत. नाथतुकोबादि त्यांच्या पश्चात् झालेल्या सर्व भक्तांचे किंबहुना अखिल महाराष्ट्रीयांचे ते धर्मगुरु आहेत. महाराष्ट्रावर आणि मराठी भाषेवर त्यांचे सर्वांहून अधिक शाश्वत असे अगणित उपकार झाले आहेत. त्यांचें दिव्य चरित्र अनेक कवींनीं गायलें आहे, त्यांचे गुणानुवाद हजारों भक्तांनीं वर्णन केले आहेत, व त्यांच्या उपदेशानें हजारों जीव कृतार्थ झाले आहेत. त्यांचे ग्रंथ आणि त्यांचें नांव ही ह्या भवार्णवांतून तारून नेणारी अभंग नौका आहे. महाराजांचीं उपलब्ध आणि अनुपलब्ध अशीं अनेक चरित्रें आहेत. छापील चरित्रांत ह. प. भिंगारकर-बोवांनीं लिहिलेलें एक चरित्र व केसरींतून प्रसिद्ध झालेला त्यांचा कालनिर्णयात्मक उत्कृष्ट निबंध, तत्वविवेचक छापखान्यांतून प्रसिद्ध झालेला निबंध, नाशिकचे ब. खं. पारख यांचें अल्प चरित्र इत्यादि ग्रंथ लोकांच्या वाचण्यांत आहेत. मुख्यतः नामदेवरायांचें ' **आदि, समाधि व तीर्थावळि** ' ह्यांवरील अभंग, महिपतबावांचीं संतचरित्रें, निरंजनमाधवांचा 'ज्ञानेश्वरविजय,' भिंगाकरबुवांचे वरील दोन ग्रंथ, खुद्द महाराजांचे ग्रंथ व साधुसंतांच्या त्यांच्यासंबंधाच्या उक्ति इत्यादिकांच्या साह्यानें मीं सदर ग्रंथ तयार केला आहे. चरित्र आणि ग्रंथविवेचन एकत्र एकाच ग्रंथांत आल्यानें सदर ग्रंथ सर्व संतसज्जनांस मान्य होईल अशी मला उमेद आहे. ' न्यून तें पुरतें ' करून घ्यावें ही विनंति आहे.

२. माझ्या ह्या संतचरित्रमालेचें धोरण कोणतें रहाणार आहे, याचें विवेचन मीं श्रीएकनाथचरित्राच्या प्रस्तावनेंत केलेंच आहे. "संतांचा चरित्रकार

सांप्रदायिक उर्फ भाविक, काव्यमर्मज्ञ उर्फ रसिक व इतिहासज्ञ उर्फ चिकित्सक असा पाहिजे " ही दृष्टि कायम ठेवून " हरि, हरिभक्त व हरिनाम यांच्याविषयीं आपला व आपल्या वाचकांचा प्रेमादर वाढावा, संतचरित्रांच्या आरशांत आपलें निजरूप आपणांस न्याहाळून घेतां यावें आणि "एकमेकां करूं साह्य । अवघे धरूं सुपंथ ' ह्या तुकोक्तीप्रमाणे लेखकवाचकांनीं श्रीहरिप्रेमास पात्र व्हावें " ह्या मुख्य हेतूनें ही संतचरित्रमाला तयार होत आहे. ह्या चारित्रानंतर श्री-तुकाराम, श्रीनामदेव, श्रीरामदास, श्रीकृष्ण, श्रीराम यांचीं चरित्रें क्रमाक्रमानें महाराष्ट्राच्या सेवेस सादर केलीं जातील.

३. असो; आतां सदर ग्रंथांत कोणते विषय कसे निरूपिले आहेत याचें थोडक्यांत दिग्दर्शन करितों. **पहिलें प्रकरण** ' श्रीज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्र ' हें आहे. यांत महाराजांच्या वेळीं महाराष्ट्राची राजकीय, वाङ्मयात्मक व धार्मिक परिस्थिति कशी होती, याचें ऐतिहासिकदृष्ट्या विवेचन केलें आहे. देवगिरीचे जाधव राजे, भास्कराचार्य, हेमाद्रि, बोपदेव, भागवतग्रंथाचें प्राचीनत्व व पंढरीच्या भागवत धर्माचा उदय इतक्या विषयांचें त्यांत विवेचन केलें आहे; म्ह० राजकारण, विद्या व धर्म ह्या तीन सदरांखालीं तत्कालीन महाराष्ट्राचा थोडक्यांत इतिहासच येथें दिला आहे. हें पहिलें ऐतिहासिक प्रकरण संपल्यावर पुढें ग्रंथाच्या अर्ध्या भागांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें साग्र चरित्र दिलें असून पुढील अर्ध्या भागांत त्यांच्या ग्रंथांचें विवेचन केलें आहे आणि शेवटीं नाम देवापासून तों मोरोपंतांपर्यंत अनेक संतकवींनीं महाराजांच्या स्तवनपर अभंग, श्लोक, पदें आरत्या वगैरे केल्या आहेत त्या दिल्या आहेत. ह्याप्रमाणें ऐति-हासिक, चरित्रपर, ग्रंथविवेचनपर व गौरवपर असें ह्या ग्रंथाचें थोडक्यांत स्वरूप आहे. **दुसरें प्रकरण** 'कुलवृत्तांत' हें आहे. ह्यांत महाराजांचे पूर्वज, त्यांचे मातापितर रुक्मिणीबाई व विठ्ठलपंत, विठ्ठलपंतांच्या यात्रा, त्यांचा विवाह, त्यांचा संन्यास, रामानंदस्वामींचा अनुग्रह, रुक्मिणीबाईचें तपाचरण, गृहाश्रमाचा पुनः स्वीकार, छळ व निवृत्तिज्ञानेश्वरांचे जन्मकाळ इतके विषय आले असून १४ व्या कलमांत संन्याशाच्या पोटींच ज्ञानेश्वरांनीं अवतार कां घेतला, याचें विवेचन केलें आहे. **तिसरें प्रकरण** 'गुरुसंप्रदाय' हें आहे. त्यांत गैनीनाथांपासून निवृत्तिनाथांस व त्यांजपासून ज्ञानेश्वरांस

बोध कसा झाला हें वर्णिलें असून जालंदरनाथ, मैनावती, गोपीचंद, मत्स्येंद्र-नाथ, गोरक्षनाथ यांच्या कथा दिल्या आहेत व निवृत्तिनाथ आणि ज्ञानेश्वर यांचे स्वसांप्रदायासंबंधाचे उद्गार विवरणासह दिले आहेत. **चवथें प्रकरण** 'मुंज व वेदशास्त्रमर्यादा' हें आहे. यांत ब्रह्मवृंदाची विठ्ठल-पंतांस देहांतप्रायश्चित्ताची शिक्षा, विठ्ठलपंतांचें प्रयागक्षेत्रीं देहविसर्जन, ज्ञानेश्वरांचें बाळपण इतके विषय असून ३ ऱ्या कलमांत ब्रह्मवृंदाच्या निकालाच्या योग्यायोग्यतेची समाजशास्त्रदृष्ट्या चर्चा केली आहे व ५ व्या कलमांत वर्णाश्रमधर्म पाळणें अवश्यक कीं अनवश्यक, याबद्दल निवृत्तिज्ञानेश्वर-सोपान यांचा संवाद दिला आहे. समाजसुधारणेची इच्छा करणाऱ्यांनीं हें सर्व प्रकरण मननपूर्वक वाचावें. यांत विठ्ठलपंतांची स्वधर्मप्रीति, ब्रह्मनिष्ठा व मनोधैर्य हे गुण स्पष्ट केलेले आढळतील. **पांचवें प्रकरण** 'पैठणचे चमत्कार' हें आहे. यांत मुंजप्रकरणाचा निकाल, ज्ञानेश्वरमहाराजांची समबुद्धि, रेड्याकडून वेद बोलविणें वगैरे चमत्कारांवरून ब्राह्मणांची त्यांच्या दिव्यत्वाबद्दल झालेली खात्री, शुद्धिपत्र, महाराजांचें ग्रंथावलोकन व सिद्धप्रज्ञा इतके विषय आले आहेत. **सहावें प्रकरण** 'तीर्थयात्राप्रकरण' हें आहे. यांत नेवासें क्षेत्र, सच्चिदानंदबावा, विसोबा चाटी, ज्ञानेश्वरीची रचना हे विषय प्रथम घातले असून पुढें महाराज नामदेवांबरोबर तीर्थयात्रेस कोठें कोठें गेले, वाटेंत त्यांनीं अनेक चमत्कार करून अनेकांचा उद्धार कसा केला, हें सांगितलें आहे. **सातवें प्रकरण** 'चांगदेव व ज्ञानदेव' हें आहे. यांत वटेश्वरचांगदेवांचें साग्र चरित्र दिलें आहे. चांगदेवांची विद्वत्ता व योगसिद्धि, 'कोऱ्या कागदा' ची गोष्ट, ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्यांस पाठविलेलें 'चांगदेवपासष्टी'चें पत्र, पासष्टीचें विवरण, ज्ञानदेवचांगदेवांच्या भेटीचा अपूर्व प्रसंग, चांगदेवांची शरणागति व मुक्ताबाईचा उपदेश इतके विषय यांत आले आहेत. **आठवें प्रकरण** 'समाधि-प्रकरण' आहे. हें अत्यंत गंभीर स्वरूपाचें आणि प्रेमरसानें थबथबलेलें असून हें नामदेवांच्या प्रेमळ वाणीनेंच वर्णिलें आहे. ज्ञानेश्वरमहाराजांच्या समाधीचा नक्की काळ, महाराजांची लोकप्रियता, सर्व संत पंढरीची यात्रा करून आळंदीस येतात, समाधिप्रसंगाचें वर्णन, सोपानदेव–चांगदेव–मुक्ताबाई–निवृत्तिनाथांच्या समाधि, इतर समकालीन संतांच्या समाधितिथि इत्यादि विषय असून शेवटीं ज्ञानेश्वरदर्शनाचा नामदेवांचा हट्ट देवानें कसा पुरविला, याबद्दलचें अत्यंत प्रेमळ वर्णन नामदेवांच्या वाणीनें दिलें आहे. चरित्र भाग

येथेंच संपला. **नववें प्रकरण** ‘ उपासना आणि गुरुभक्ति ’ हें होय. नाथ-परंपरेची योगनिष्ठा व ज्ञानेश्वरमहाराजांची कृष्णोपासना यांचें प्रथम वर्णन केलें असून पुढें ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व अभंग ह्यांतून महाराजांचे गुरुभक्तिपर उद्गार क्रमानें दिले आहेत व त्यांचें जागोजाग विवरण केलें आहे. गुरुभक्तांना हें प्रकरण फारच आवडेल. ह्या प्रकरणावरून महाराजांच्या किंबहुना सर्व अस्सल गुरुभक्तांच्या गुरुभक्तीचें मर्म व प्रेम प्रेमळांच्या सहज ध्यानीं येईल. **दहावें प्रकरण** ‘ग्रंथविवेचन आणि वेंचे ’ हें वाढत वाढत फार वाढलें आहे. पण महाराजांच्या वाणीचें माधुर्य, त्यांच्या दृष्टांतादिकांचें समर्पकत्व, त्यांचें सगुण प्रेम, त्यांच्या निःसंदेहपणानें केलेल्या बोधाचें रहस्य, त्यांचा अद्भुत प्रेमळपणा इ. गुण त्यांच्याच वाणीनें आपल्या वाचकांच्याही नीट गळीं उतरावें असें मला वाटल्यामुळें माझी वृत्ति व लेखणी येथें अनांवर झाली ! ह्या प्रकरणांत ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, हरिपाठादि अभंग इत्यादिकांतील उत्कृष्ट वेंचे देतांना त्यांचें माधुर्य चाखीत चाखीत, प्रेमामृताचे घुटके घेत घेत, त्यांच्या वागर्थसंपत्तीचा आनंदानें यथेष्ट उपभोग घेत घेत हें प्रकरण लिहिलें गेलें आहे. पण हा फुगारा भक्तिज्ञानवैराग्यानें भरींव झाला आहे हें वाचक खास कबूल करितील. असो. प्रथम महाराजांच्या ग्रंथांचें ‘ आबाळसुबोधत्व,’ त्यांचा मराठी भाषेचा अभिमान व मनोहर आत्मप्रत्यय, त्यांची ग्रंथसंप्राप्ति, ज्ञानेश्वरी व तिचें संशोधन, इतके विषय ह्यांत प्रथम घेतले असून पुढें ज्ञानेश्वरीच्या अंतरंगाकडे वळलों आहें. महाभारत, व्यास आणि गीताशास्त्र ह्यांसंबंधानें महाराजांनीं जागोजाग काढलेले उद्गार एकवटून त्यांत काय मर्म सांपडतें, तें पाहिलें आहे. तसेंच श्रुति आणि गीता, श्रीकृष्णार्जुनांचें अन्योन्य-प्रेम, श्रोत्यांची प्रार्थना ह्यांसंबंधानेंही महाराजांचे जागोजागचे उद्गार एकत्र आणून त्यांचाही प्रेमरंग दाखविला आहे. पुढें ज्ञानेश्वरींतले उत्कृष्ट उतारे देऊन अमृतानुभवाचें विवेचन केलें आहे. महाराजांच्या बोधांत व उपासनेंत कोणते मुख्य सिद्धांत कसे प्रतिपादिले आहेत याचेंही उद्घाटण जागोजाग केलें आहे. शेवटीं त्यांच्या अभंगांत सगुणप्रेमा व नाममाहात्म्य कसें भरलें आहे तें सांगितलें आहे. **अकरावें प्रकरण** ‘ स्तुतिसुमनांजलि ’ हें आहे. नामदेव, जनाबाई, सेना न्हावी, एकनाथ, तुकाराम, निळोबाराय, कान्हूपात्रा, शिवदिनकेसरी, भोळानाथ, निरंजनमाधव, रंगनाथ, मोरोपंत, श्रीधर, मुक्तेश्वर

इत्यादि संतांनीं व कवींनीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या स्तवनपर जे उद्गार काढले आहेत ते येथें एकत्र दिले आहेत. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें हें चरित्र त्यांच्याच कृपाप्रसादानें झालेलें असून हें त्यांच्याच चरणीं समर्पण असो.

॥ श्रीज्ञानेश्वरमहाराजकी जय ॥

पुणें, 'मुमुक्षु' कचेरी
श्रीरामनवमी; शके १८३४.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा अनन्यसेवक.
**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

---

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

पहिली तीन हजार प्रतींची आवृत्ति संपून बरेच दिवस या ग्रंथाची प्रत मिळत नव्हती; म्हणून ही द्वितीयावृत्ति छापून प्रसिद्ध केली आहे. या आवृत्तींत विशेष फेरफार केले नाहींत.

पुणें, मुमुक्षु कचेरी
कार्तिकी एकादशी. शके १८४५.

श्रीज्ञानेश्वरचरणरज—
**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

# अनुक्रमणिका.







# १ श्रीज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्र.

जेथ तो श्रीवल्लभ । तेथ भक्तकदंब ।
तेथ सुख आणि लाभ । मंगळाचा ॥ १६५८ ॥

ज्ञानेश्वरी अ० १८.

१ विषयप्रवेश. २ देवगिरीचे यादवराजे. ३ भिल्लम. ४ जैत्रपाळ. ५ सिंघणदेव. ६ कृष्णदेव व महादेव. ७ त्यांची राजनीति व देवगिरीचें ऐश्वर्य. ८ रामदेवराव जाधव व त्यांवरील ज्ञानेश्वरांचा अभिप्राय. ९ देवगिरीच्या राज्याचा ऱ्हास. १० ज्योतिषविद्येचा प्रसार व भास्कराचार्य. ११ हेमाद्रि उर्फ हेमाडपंत. १२ बोपदेव व त्याचे ग्रंथ. १३ बोपदेव आणि भागवत. १४ भागवताची प्राचीनता. १५ ज्ञानेश्वरांच्या पूर्वीचे 'विठ्ठला' चे उल्लेख. १६ पंढरीचा एक्यायशीचा शिलालेख. १७ शिलालेखाचें विवेचन. १८ पंढरीचा भागवतसांप्रदाय.

१. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या खास चरित्राकडे वळण्यापूर्वी आपण ह्या प्रथम प्रकरणांत महाराष्ट्राच्या तत्कालीन परिस्थितीचें थोडक्यांत पर्यालोचन करूं. आपल्या ह्या परमार्थप्रवण देशांत इतिहासादिकांकडे लोकांचें लक्ष सामान्यतः कमी असल्यामुळें ज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्राचा सर्व बाजूंनीं पूर्ण असा इतिहास किंवा तशा इतिहासाचीं साधनेंही फारशीं उपलब्ध नाहींत; तथापि गेल्या अर्धशतकांत उपलब्ध झालेल्या सामुग्रीचा यथामति उपयोग करून घेऊन ज्ञानेश्वरांच्या काळच्या महाराष्ट्राचें चित्र ह्या प्रकरणांत मी रेखाटणार आहें. कोणत्याही काळाची सामान्य कल्पना येण्यास त्या काळच्या राजकीय, वाङ्मयात्मक व धार्मिक चळवळींचा इतिहास पाहिला पाहिजे व ह्याचसाठीं राजकारण, विद्या व धर्म ह्या बाबतींत ज्ञानेश्वरांच्या वेळीं म्हणजे त्यांच्यापूर्वी व नंतर शेंपन्नास वर्षें महाराष्ट्र कोणत्या स्थितींत होता याचा मी थोडासा विचार येथें करणार आहे. हा

काळ महाराष्ट्राच्या इतिहासांत फार महत्त्वाचा आहे. जैत्रपाळ, सिंघणदेव व रामदेवराव यांसारखे राजे, भास्कराचार्य व बोपदेव यांसारखे पंडित, हेमाडपंतांसारखे विद्वान् मुत्सद्दी व ज्ञानेश्वरनामदेवांसारखे महात्मे ज्या काळांत झाले तो काळ महाराष्ट्राच्या इतिहासांत चिरस्मरणीय आहे यांत शंका नाहीं. लक्ष्मी, सरस्वती व आत्मविद्या ह्यांचा उत्कर्ष ज्ञानेश्वरांच्या वेळीं महाराष्ट्रांत झाला. देवगिरि, आपेगांव, नेवासें, आळंदी व पंढरपूर ह्या स्थानांचा ज्ञानेश्वरचरित्रांत वारंवार उल्लेख येणार असल्यामुळें व ह्या स्थानांवर तत्कालीन यादवभूपतींचा अंमल चालत असल्यामुळें देवगिरीच्या यादव घराण्याचा थोडक्यांत इतिहास सांगणें अप्रासंगिक होणार नाहीं. यादव घराण्याची ज्ञानेश्वरांच्या पूर्वजांनीं चार दोन पिढ्या सेवाही केलेली आहे, आणि शिवाय पंढरपूरच्या भागवतसांप्रदायाचा उदयही रामदेवराव जाधवांच्या कारकीर्दींत व त्यांच्या सहानुभूतीनेंच झालेला असून खुद्द ज्ञानेश्वरांनीं त्यांचें सप्रेम गौरवही केलेलें आहे. ह्या सर्व कारणांचा विचार करितां देवगिरीच्या यादवराजांच्या इतिहासाचें प्रथम निरीक्षण करणें अवश्य आहे. ह्या यादवांच्या कारकीर्दींत वैद्यकी, ज्योतिष व धर्मशास्त्र ह्या विद्यांचा उत्कर्ष ज्या विद्वानांनीं केला त्यांच्याबद्दलही त्यानंतर चार शब्द लिहिणें ओघानेंच येतें; आणि नंतर खुद्द भगवान् श्रीविष्णूचे प्रत्यक्ष अवतार असे जे आमचे ज्ञानेश्वरमहाराज व भक्तिसुखाचा आनंद जनतेस शिकविण्यासाठीं जन्मास आलेले भक्तराज नामदेवराय ह्यांच्या कृपेनें आधींच वाढीस लागलेल्या पंढरपूरच्या भागवतसांप्रदायाचा महाराष्ट्रभर कसा जयजयकार होऊं लागला याचाही थोडक्यांत विचार करणें योग्य होणार आहे. ह्याप्रमाणें ज्ञानेश्वरांच्या काळीं राजकारण, विद्या व धर्म ह्या बाबतींत महाराष्ट्राची कशी भरभराट झाली होती हे विहंगमदृष्टीनें पाहणें अवश्य असल्यामुळें आपण येथें थोडा विचार करूं. ज्ञानेश्वरांचा काळ म्हणजे महाराष्ट्राच्या इतिहासांतलें सुवर्णयुग होय.

## १ राजकारण.

( देवगिरचे यादव राजे. )

१ भिल्लम ( शके ११०९–१११३ )

२ जैतुगी उर्फ जैत्रपाळ ( शके १११३–११३२ )

३ सिंघण ( शके ११३२–११६९ )

४ जैतुगी उर्फ जैत्रपाळ

५ कृष्णदेव उर्फ कन्हर. ( शके ११६९–११८२ )

६ महादेव ( शके ११८२–११९३ )

७ रामचंद्र उर्फ रामदेवराव ( शके ११९३–१२३१ )

८ शंकरदेव ( शके १२३१–१२३४ )

९ हरपाल ( मेहुणा ) शके १२४० मध्यें हा मारला गेला.

२ ह्या वरील राजघराण्यांतील दुसरा राजा जैतुगी व तिसरा राजा सिंघण ह्यांच्या अंमलांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे पणजे त्र्यंबकपंत व रामदेवरावाच्या कारकीर्दींत खुद्द ज्ञानेश्वरमहाराज झाले. डॉ. भांडारकर यांनीं इंग्रजी भाषेंत 'दक्षिणचा इतिहास' म्हणून जो एक उत्कृष्ट ग्रंथ मोठ्या परिश्रमानें तयार केलेला आहे त्यांत व हेमाद्रिकृत राजप्रशस्तींत पुढील माहिती व्यवस्थेशीरपणानें दिलेली आहे. हे देवगिरीचे यादव उर्फ जाधव राजे द्वारकाधीश श्रीकृष्ण भगवान् यांच्याच जगविख्यात घराण्यांत झाले. वर दिलेल्या वंशावळींतला पहिला राजा भिल्लम ह्यानें देवगिरीच्या राज्याचा विस्तार करून त्याला साम्राज्यपदास पोंहचविलें. त्याचा १८ वा पूर्वज

दृढप्रहारीनामक राजा होऊन गेला. हा देवगिरीच्या यादवांचा पहिला पूर्वज होय. दृढप्रहारीचा मुलगा सेउणचंद्र हा होय. सेउणचंद्राच्या पराक्रमामुळेंच त्याच्या ताब्यांत असलेल्या नाशकापासून देवगिरीपर्यंतच्या प्रदेशांस सेउणदेश असें नांव पडलें. ह्या सेउणदेशांतल्याच बहुतेक भागाला पुढें मुसलमानी अमदानींत खानदेश असें म्हणूं लागले.

३ असो. दृढप्रहारीपासून भिल्लमापर्यंत ( शके ११०९ ) जे अठरा राजे झाले ते सार्वभौम नव्हते. हें सार्वभौमपद भिल्लमानें चालुक्य वंशांतल्या सोमेश्वरनामक सार्वभौम राजास जिंकून व त्याचें विस्तृत राज्य आपल्या राज्यास जोडून संपादन केलें. हेमाद्रीनें आपल्या राजप्रशस्तींत म्हटलें आहे कीं, ' भिल्लमानें श्रीवर्धनच्या अंतल राजास, प्रत्यण्डक येथील एका दुष्ट राजास, मंगलवेष्टक ( मंगळवेढें ) येथील वज्री राजास, कल्याणच्या चालुक्य राजास व होयसळ यादवांच्या नृसिंह राजास जिंकून आपलें राज्य व यश वाढविलें.' भिल्लमानें ह्याप्रमाणें स्वपराक्रमानें अनेक देश जिंकून कृष्णानदीच्या उत्तरेस असलेलें आपलें विस्तृत राज्य सुस्थिर केलें खरें, पण तें भोगण्यास तो फार वर्षें जगला नाहीं. भिल्लमाच्या वेळच्या शिलालेखांत व दानपत्रांत त्यानें "प्रतापचक्रवर्ती, समस्तभुवनाश्रय; पृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज," इत्यादि बिरुदें आपल्या नांवास जोडलेलीं आढळतात. भिल्लमानें शके ११०९ च्या सुमारास देवगिरी ही आपली राजधानी केली. त्याच्यापूर्वी दृढप्रहारीच्या वेळेपासून यादवांची राजधानी श्रीनगर ही होती. डॉ. भांडारकरांच्या मतें श्रीनगर म्हणजे नाशिक जिल्ह्यांतलें चंद्रादित्यपूर उर्फ चांदूर होय. भिल्लमानें देवगिरीस आपल्या साम्राज्याची प्राणप्रतिष्ठा केली. हेमाद्रि म्हणतातः—

**स दंडकामंडलमंडयित्रीमकंपसंपत्प्रभवैर्विलासैः ।**
**चक्रे पुरं देवगिरिं गिरीशप्रसादसंसादितदिव्यशक्तिः ॥ ३९ ॥**

म्हणजे शंकराच्या प्रसादानें ज्यानें दिव्यशक्ति प्राप्त करून घेतली आहे अशा त्या भिल्लमानें अचल संपत्ति, अपार वैभव व नानाविध विलास यांनीं युक्त आणि दंडकामंडलाला म्हणजे महाराष्ट्राला भूषणभूत झालेली

देवगिरी नामक नगरी स्थापन केली. येथपासून पुढील यादवराजे देवगिरीस राहूं लागले व देवगिरीलाच पुढें मुसलमान दौलताबाद म्हणूं लागले. भिल्लमाला रामेश्वरापासून तों नर्मदेपर्यंतचा सर्व प्रदेश जिंकावयाचा होता, पण यादवांची दुसरी शाखा——जी होयसळयादव या नांवानें "इतिहासांत प्रसिद्ध आहे——म्हैसुराकडे तितक्याच नेटानें राज्य करीत होती, त्या शाखेचा तत्कालीन राज्यकर्ता वीरबल्लाळ होता. हाही भिल्लमासारखाच पराक्रमी होता. दोघांच्या झटापटींत भिल्लमाच्या फौजेचा शके ११११ मध्यें धारवाड जिल्ह्यांत लोकुंडी येथें पराभव होऊन त्यास परतावें लागलें. यानंतर भिल्लम फार दिवस जगला नाहीं.

४. भिल्लमानंतर देवगिरीच्या गादीवर **जैत्रपाळ उर्फ जैतुगी** हा बसला. ह्याच्या वेळचे तीन शिलालेख सांपडले असून त्यांवरून समजतें कीं, भास्कराचार्यांचा पुत्र लक्ष्मीधर यास जैत्रपाळानें आपल्या दरबारांत पंडितमुख्य केलें होतें, जैत्रपाळाचा सेनापति शंकर याची एकट्याचीच एक हजार गांवांवर सत्ता चालत होती, त्याचे महामंडलेश्वर उर्फ मांडलिक राजे पुष्कळ होते, व त्यानें आपणास 'पृथ्वीवल्लभ, प्रतापचक्रवर्ती' इत्यादि बिरुदें लाविलीं होतीं. मराठींत 'आद्यकवि' असें अजूनही ज्यास कित्येक म्हणतात तो मुकुंदराज ह्याच जैत्रपाळाचा गुरु असून ह्याच्याचसाठीं त्यानें आपला 'विवेकसिंधु ग्रंथ रचला' असें कित्येक विद्वानांचें मत आहे. मुकुंदराजाचा शिष्य जैत्रपाळ हा असून द्वारसमुद्राचा राजा

१ रा. रा. बाळकृष्ण भवानराव चौसाळकर, मोमिनाबाद उर्फ जोगाईचे आंबे येथील सावकार यांजपाशीं विवेकसिंधूची जुनी हस्तलिखित प्रत आहे ती माझे धुळेकर मित्र रा. गोविंदराव चांदोरकर, वकील, यांनीं पाहिली असून तिच्या शेवटीं "वर्ते शके अकरा दाहोत्तरू। साधारण संवत्सरू। राजा शार्ङ्गधरू। राज्य करी ॥ ३३ ॥ ऐसा समयो सर्वोत्तमू। तेथें मुकुंद द्विजोत्तमू। विवेकसिंधु मनोरमु। निर्मिता जाला ॥ ३४ ॥" अशा दोन ओव्या आहेत. ह्या ओव्या विचारणीय आहेत. शके १११० ला कीलक संवत्सर येत असुन १११२ ला साधारण संवत्सर आहे.

नृसिंह हा तत्कालीनच होता. मुकुंदराजाचा काळ अद्याप अनिश्चित आहे. कसेंही असो, हा जैत्रपाळराजा विद्वानांचा चहाता होता एवढी गोष्ट खरी आहे. 'तिलंगाधिपति म्ह० तेलंगदेशाचा राजा फार दुष्ट असून त्या रौद्राकृती पशूची रणयज्ञांत जैत्रपाळानें पूर्णाहुति दिली' असें हेमाद्रीनें म्हटलें आहे.

५. जैत्रपाळाचा मुलगा **सिंघणदेव** याच्या ३७ वर्षांच्या कारकीर्दीत देवगिरीचें साम्राज्य वैभवाच्या कळसास चढलें. सिंघणदेव उर्फ सिंहलदेव हा खरोखरच सिंहासारखा महापराक्रमी होता. हेमाद्रीनें याच्या लढायांचें व शौर्याचें उत्कृष्ट वर्णन केलें असून त्याला पुष्टी देण्यासारखे सुमारें ५०।६० प्राचीन लेख आजकाल उपलब्ध झाले आहेत. सिंघण हा स्वरूपानें मदनासारखा सुंदर असून प्रतापाचें व कीर्तीचें माहेरघर होता. छत्तीसगडचा जज्जल राजा, माळव्याचा अधिपति अर्जुन व धारानगरीचा तत्कालीन राजा यांना त्यानें जिंकून पुष्कळ संपत्ति मिळविली. त्याचा ब्राह्मणसेनापति मुद्गलगोत्री खोलेश्वर व त्याचा पुत्र राम यांनीं गुर्जर देशाचा चालुक्यवंशीय राजा जो लावण्यप्रसाद त्याच्या फौजेचा फडशा उडाविला व तेणेंकरून सारी गुर्जरभूमि कंपायमान झाली. सिंघणाच्या फौजेचें गुर्जरलोकांस एवढें भय वाटलें कीं गुजराथ प्रांतांत त्यामुळें कोणी घर बांधीना व धान्यसंग्रहही करीना! लावण्यप्रसादही खूप शौर्यानें लढला तथापि 'महाराजाधिराज व सम्राट्' सिंघणदेव याच्याशीं त्याला शेवटीं तहाचें बोलणें करावें लागलें. सिंघणानें अनेक राजांस आपले मांडलिक केलें. त्यानें कोल्हापूर घेतलें. एका शिलालेखांत सिंहणास 'पन्नगनिलयप्रबलभोज—भूपालव्यालविद्रावण-विहंगमराज' म्हणजे पन्हाळ्याचा प्रबळ 'भोजराजा हाच कोणी सर्प त्याला पिटाळून लावणारा गरुड' असें म्हटलें आहे! गुर्जराजास हत्तीच्या अंकुशाप्रमाणें तो असह्य भासला असेंही त्याच लेखांत लिहिलें आहे. एका लेखांत अंग, वंग व कलिंग म्ह० बंगाल, पांचाल म्ह. पंजाब, सिंध, केरल म्ह० मलबार, माळवा, चेर, चोल.( कर्नाटक ), मगध ( बिहार ), गुर्जर, पांड्य (रामेश्वराजवळचा देश), लाट व नेपाळ येथील राजे हे सर्व सिंघणाचे

हुकूम मानीत व तुरुष्क, बर्बर व पल्हव हेही त्यास मान देत असें लिहिलें आहे. सिंघणाचा राज्यविस्तार जसा मोठा झाला तशी त्याच्या शूर सेनापतींचीही सत्ता वाढली. निरनिराळ्या प्रांतांवर त्यानें आपले प्रतिनिधि नेमले. त्यांना महाप्रधान, मंडलेश्वर, दंडनायक किंवा बहात्तरनियोग्माधिप असें म्हणत. त्या सर्वांत उत्तरेकडचा सेनापति खोलेश्वर व दक्षिणेकडचा बीचण हे मुख्य होते. बीचण किंवा बीचीदेव हा फार शूर होता. कऱ्हाड—कोल्हापूर प्रांताचा हा महाप्रधान होता. यानें पश्चिमेचे चालुक्य, गोव्याचे कदंब, मद्रासकडले पांड्य यांना नरम केलें होतें. यानें यादवांचें ‘ सुवर्ण गरुडध्वज ’ निशाण कावेरीवर नेऊन तेथें जयस्तंभ उभारला होता ! शके ११३७ मध्यें मायीदेव पंडित ह्याच्याकडे सर्वाधिकार होते व त्याचा एक हस्तक हेमनायक हा शके ११४८ मध्यें १२००० गांवांवर अंमल चालवीत होता. सिंघणदेवाच्या राज्यांत ८४ किल्ले होते व त्यांत देवगिरीचा किल्ला मुख्य होता. सिंघणदेवास “ प्रौढप्रतापचक्रवर्ती, यादवचक्रवर्ती, द्वारकापुरवराधीश्वर इ. ” विरुदें लाविलेलीं आहेत.

६ सिंघणाच्या मागून त्याचा पुत्र जैतुगी हा अल्पकाळ गादीवर बसला व थोड्याच महिन्यानंतर मृत झाला. त्याचे पुत्र म्ह. सिंघणाचे पौत्र **कृष्ण** व **महादेव** यांनीं अनुक्रमें १३ व ११ वर्षें राज्य केलें. हे भाऊ जवळ जवळ सारिख्याच वयाचे असून त्यांचें परस्परावर शुद्ध प्रेम होतें. त्यांच्याबद्दल हेमाद्रि मोठ्या प्रेमानें म्हणतो:—

**धर्मार्थाविव तौ साक्षात्पालयन्तौ वसुंधराम् ।**
**विलोक्य लोकः सस्मार राजानौ रामलक्ष्मणौ ॥ १ ॥**

कृष्ण व महादेव हे फार लोकप्रिय होते व त्यांचें शुद्धाचरण पाहून हे रामकृष्ण किंवा रामलक्ष्मणच लोककल्याणार्थ पुन्हां अवतरले आहेत असें लोक म्हणूं लागले. कृष्णदेव हा शूर असून धर्मशील होता. सिंघणाच्या प्रतापाग्नीनें बहुतेक राजे होरपळून गेले होते व देवगिरीकडे वांकड्या नजरेनें पाहण्यासही कोणी समर्थ नव्हता. कोणी डोकें वर काढलेंच तर कृष्ण व त्याचा वयानें कनिष्ठ पण शौर्यानें वरिष्ठ असा भाऊ वीर महादेव

हे तेव्हांच त्याला शरण यावयाला लावीत. कृष्णदेवानें गुर्जरराजाचा पुरा पाडाव केला व कोंकणांतील राजांना जिंकिलें, तथापि सारा कोंकणप्रांत त्याच्या राजवटींत यादवांच्या अंमलाखालीं आला नाहीं. कृष्णदेवाबद्दल हेमाद्रि म्हणतोः—

**येनाकारि विशालवीसलचमूसंहारकालानले**
**हेलोन्मूलितमूलराजसमरे निर्वीरमुर्वीतलम् ।**
**येनानेकमहाफलक्रतुकृतासंवर्ध्यमानोऽनिशं**
**क्षीणः कालवशात् पुनस्तरुणतां धर्मोपि संप्रापितः ॥**

म्हणजे कृष्णदेवानें गुजराथच्या वीसलदेव राजाच्या अफाट सेनेचा संहार केला, रणभूमीवर अनेक राजांचें निर्मूलन करून 'निर्वीरमुर्वीतलम्' केलें, व आपल्या राज्यांत महाफल देणारीं अशीं यज्ञयागादि पुण्यकर्मे करून कालवशात् क्षीण झालेल्या धर्माच्याही अंगीं तारुण्य आणलें! वरील श्लोकांतील शेवटला चरण 'क्षीणःकालवशात्पुनस्तरुणतां धर्मोपि संप्रापितः' हा फार महत्वाचा आहे. हेमाद्रि, बोपदेव वगैरे पंडित ह्याच काळांत झाले असून त्यांनीं आपल्या पवित्र आचरणानें व ग्रंथांनीं धर्माच्या पुनरुज्जीवनास मोठें साह्य केलें व त्या सर्वांच्या परिश्रमांनीं भागवतधर्मास मोठें तेज चढून पुढें अल्पकाळांतच पंढरीच्या परिसरांत श्रीज्ञानेश्वरप्रमुख महाराष्ट्र-संतांनीं धर्मोदयाचा माध्यान्हकाळ आणला. ती गोड हकीकत पुढें येणारच आहे. तथापि यज्ञयाग, व्रतनियम इत्यादिकांस यादवराजांचें आनुकूल्य असल्यामुळें कर्मनिष्ठा व त्या मागोमागच ज्ञान व भक्ति यांचा उदय होऊन महाराष्ट्रांत भागवतधर्माचा विजय होण्याचा सुप्रसंग प्राप्त झाला. कर्मठपणा हा कदाचित् दोष असेल पण कर्मनष्टपणा हें महत्पाप आहे. धर्मग्लानीच्या काळीं लोक कर्मनष्ट होतात व धर्मोद्धाराच्या काळीं प्रारंभ कर्मांत होऊन भक्तिज्ञानांत त्याचा परिपाक होतो. भगवंतांनीं गीतेंतही 'यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत्' ( अ० १८–५ ) असेंच सांगितलें आहे. यादवांच्या कारकीर्दींत कर्मठपणाचें प्रस्थ माजलें म्हणून कित्येक विद्वान् त्यांना

दोष देतात, पण मला वाटतें कीं, कर्माविषयीं राजापासून रंकापर्यंत सर्वांना आदर वाटूं लागून स्वधर्मप्रीति लोकांत उत्पन्न झाली हा यादवांच्या कारकीर्दीचा मोठा गुण म्हणूनच समजला पाहिजे. कारण कीं, तेव्हांच्या सत्कर्माचरणाचेंच पर्यवसान भागवतधर्माच्या पुनरुज्जीवनांत झालें. असो. सिंघणदेव, कृष्णदेव, महादेव व त्यांच्या मागून आलेले रामदेव यांच्या काळीं संस्कृत विद्येला उत्तम राजाश्रय मिळाला व भास्कराचार्य, हेमाद्रि, बोपदेव शार्ङ्गधर यांसारखीं विद्वद्रत्नें प्रकट झालीं. पण त्यांच्याकडे वळण्यापूर्वी यादवांच्या घराण्याचाच इतिहास प्रथम पुरा करूं.

७ कृष्णदेवानें बीचणदेवाचा भाऊ मल्ल याला कुहुंडी प्रांताचा दंडनायक नेमलें होतें. ह्या मल्लीसेट्टीनें बागेवाडी प्रांतांतील कांहीं ब्राह्मणांस एका दानपत्रानें जमिनी बक्षीस दिल्या होत्या. त्या दानपत्रांत घालिस, पाठक, त्रिवादी (त्रिवेदी) हीं (देशस्थ?) व पटवर्धन आणि घैसास हीं (कोंकणस्थ?) आडनांवें सांपडतात. मल्लदेवाचा मुलगा चौन्दराज यास मल्लदेवाच्या मृत्यूनंतर कृष्णदेवानें आपला मुख्य प्रधान केलें. गुणी आश्रितांच्या पुत्रपौत्रांकडे लक्ष देऊन त्यांचाही प्रतिपाळ करण्याचा यादवराजांचा प्रघात होता असें अशाच आणखी कांहीं उदाहरणांवरून स्पष्ट दिसतें. कृष्णदेवाच्या पश्चात् वीरमहादेव हा राजा झाला. कोंकणचा राजा जो शिलाहार वंशांतला सोमेश्वर त्यास पूर्णपणें जिंकून महादेवानें सारा कोंकणप्रांत आपल्या राज्यास जोडला. महादेवानें त्याचीं गलबतें पाण्यांत बुडविलीं व त्याबरोबर तो कोंकणचा राजाही समुद्रांत बुडाला. महादेवाच्या मंत्र्यांत मुख्य मंत्री पंडित हेमाद्रि हाच होय. त्याजकडे 'श्रीकरणाधिप' हा हुद्दा होता. हेमाद्रि मोठ्या अभिमानानें म्हणतातः—

**सा संपत्तदिदं यशो बलमिदं सोयं प्रतापो महा-**
**नेकैकं पृथिवीभृतो भुवि महादेवस्य लोकोत्तमम् ।**
**यस्य श्रीकरणाधिपः स्वयमयं हेमाद्रिसूरिः पुरः**
**प्रौढप्रातिभवर्ण्यमानविलसद्वंशो भृशं शोभते ॥**

अर्थः—“पृथ्वीवरील राजांमध्यें जी संपत्ति, जें यश, जें बल, जो प्रताप लोकोत्तर म्हणून असेल ते सर्व महादेवभूपतीच्या ठायीं एकवटले आहेत. ह्या प्रौढप्रतापचक्रवर्ती राजाच्या दरबारांत श्रेष्ठ बुद्धिमत्ता व विद्वत्ता ह्या गुणांनीं भूषित झालेल्या वंशांत जन्मलेला मी हेमाद्रि ‘ श्रीकरणाधिप ’ ह्या अधिकारावर उत्तम प्रकारें शोभत आहे.” ह्या महादेवाच्या रणनीतींतला एक उत्तम नियम असा असे कीं, तो स्त्रिया, मुलें व शरणागत यांना मारीत नसे व हें जाणून त्याच्या भयानें आपल्या गादीवर आंध्रांनीं एक स्त्री बसविली व मालवेश्वरानें एक अर्भक बसविलें! “ अयं शिशुस्त्रीशरणागतानां हंता महादेव नृपो न जातु,” ह्या महादेवाच्या व्रतावरून त्याच्या मनाचें औदार्य स्पष्ट दिसतें. ह्याच जाधवांच्या घराण्यांत सोळाव्या शतकांत जन्मलेल्या जिजाबाईच्या पोटीं जन्म घेऊन महाराष्ट्रांत स्वराज्याची पुनः स्थापना करणाऱ्या महात्म्या शिवाजीनें औदार्यांत आपल्या पूर्वजांचा कित्ता कसा गिरविला हें इतिहासज्ञांस माहीत आहेच. “ परमुलखांत पोरबायका न धरावी. गाई न धरावी. बैल ओझ्यास मात्र धरावा. ब्राह्मणांस उपद्रव न द्यावा. कोणी बदअंमल म्ह० जुलूम न करावा ” अशी शिवरायाची आपल्या सैनिकांस सक्त ताकीद असे. ( सभासदांची बखर, पृष्ठ २४ पहा. ) असो. यादवराजधानी देवगिरीही ह्या वेळीं अपार वैभव भोगीत होती. त्रैलोक्यांतील संपत्तीचें तें विश्रांतिस्थान होतें; तेथील मोठमोठाले वाडे देवांची जेथें वस्ती अशा शैलशिखरांशीं स्पर्धा करीत होते; तेथील लोक, त्यांचीं भूषणें, त्यांचीं वस्त्रें व त्यांचीं भाषणें परम मधुर व चित्ताकर्षक होतीं. ह्या ऐश्वर्याचा स्वतः उपभोग घेणारे पंडित हेमाद्रि म्हणतातः—

**आस्ते मण्डितदण्डकापरिसरः श्रीसेउणाख्यः परं**
**देशः पेशलवेशभूषणवचोमाधुर्यधुर्याकृतिः ।**
**तस्मिन्देवगिरिः पुरी विजयते त्रैलोक्यसारश्रियां**
**विश्रांतिः सुरशालिशैलशिखरस्पर्धिष्णुसौधावलिः ॥ १ ॥**

असो. हेमाद्रीची ‘ राजप्रशस्ति ’ येथेंच संपली असल्यामुळें ह्यापुढील राजांची माहिती नीट मिळत नाहीं.

८ महादेवाच्या पश्चात् त्याच्या आमणदेव नामक पुत्रास बाजूस सारून कृष्णदेवाचा पुत्र **रामदेवराव** हा देवगिरीच्या सिंहासनावर बसला. यानें ३७ वर्षें राज्य केलें. याचा महाप्रधान अच्युत नायक हा शके ११९४ मध्यें साष्टी प्रांताचा महाप्रधान होता. सालुवदेव याजकडे शके ११९९–१२०२ पर्यंत मुख्य सेनापतीचा अधिकार होता. शके १२१२ मध्यें **कृष्णदेव** नामक भारद्वाजगोत्री यजुर्वेदी ब्राम्हण हा कोंकणचा महाप्रधान होता. **रामदेवरावाच्या** वेळचे २४ लेख हल्लीं उपलब्ध आहेत. शके १२१९ मध्यें ताडपत्रावर लिहिलेली अमरकोशाची एक प्रत पुण्याच्या डेक्कनकॉलेज–पुस्तकालयांत आहे. याच्या वेळीं फारशा लढाया झाल्या नाहींत, पण महाराष्ट्रांत भागवतधर्माचा उदय झाला व ज्ञानेश्वर, नामदेव वगैरे संतरत्नांनीं महाराष्ट्रदेश भक्तिसुखांत निमग्न केला. रामदेवराव जाधवाचें व पर्यायानें या देवगिरीच्या जाधवराज्याचें ज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्ञानेश्वरीच्या शेवटीं जें गौरव केलें आहे त्यांत रामदेवरावास त्यांनीं ' सकलकलानिवास' व 'न्यायपोषक' हीं विशेषणें लाविलीं आहेतः—

**ऐसें युगीं परि कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं ।**
**श्रीगोदावरीच्या कूळीं । दक्षिणलिंगीं ॥ १८०३ ॥**
**त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोशक्षेत्र ।**
**जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ ४ ॥**
**तेथ यदुवंशविलास । जो सकळकळानिवास ।**
**न्यायातें पोषी क्षितीश । श्रीरामचंद्र ॥ १८०५ ॥**
**तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।**
**केलें ज्ञानदेवें गीते । देशीकारलेणें ॥ १८०६ ॥**

या ओव्यांचा स्पष्टार्थः—" ह्याप्रमाणें ह्या कलियुगांत आणि महाराष्ट्र लोक जेथें राहतात अशा ह्या देशांत गोदावरीच्या दक्षिण प्रांतांत ब्रह्मांडसूत्रधार श्रीमहालया उर्फ महालसा ( म्हणजे म्हाळसा किंवा मोहनीराज ) नांवाचें त्रिभुवनांत अत्यंत पवित्र, अनादि पंचक्रोशक्षेत्र आहे. यदुवंश-

विलास म्हणजे जाधवांच्या घराण्याला भूषविणारा, सकल कलांचें केवळ निवासस्थान असा व न्यायानें प्रजापालन करणारा श्रीरामचंद्र नांवाचा राजा ह्या ( महाराष्ट्र ) देशावर सांप्रत राज्य करीत आहे. त्याच्याच सत्तेखालीं असलेल्या ह्या महालसाक्षेत्रांत म्हणजे मोहिनीचें रूप घेऊन नांदणाऱ्या श्रीविष्णूच्या ( नेवासेंनामक ) क्षेत्रांत महेश म्हणजे आदिनाथशंकर यांच्या परंपरेंतल्या निवृत्तिनाथांचा शिष्य जो मी ज्ञानदेव त्यानें गीतेच्या अंगावर ( ज्ञानेश्वरीरूपी ) हा प्राकृत अलंकार चढविला आहे. " हा ग्रंथ शके १२१२ मध्यें झाला अशाबद्दलची ओवी पुढें आहेच. असो. ह्या अलौकिक ग्रंथाचे कर्ते श्रीज्ञानेश्वरमहाराज ह्यांचें सविस्तर चरित्र पुढें येणारच आहे. रामदेवाच्यासंबंधीं आणखी दोन गोष्टी सांगून हें प्रकरण संपवूं.

९. शके १२१६ पासून देवगिरीच्या राज्यास उतरती कळा लागली व तें शके १२४० मध्यें नामशेष झालें. उत्तर हिंदुस्थानांत दिल्ली येथें मुसलमानी राज्य स्थापन होऊन शंभर वर्षें झालीं होतीं. दिल्लीपतीचा पुतण्या अल्लाउद्दीन खिलजी हा शके १२१६ मध्यें आठ हजारांची घोडेस्वारांची तुकडी घेऊन वऱ्हाडांतील एलिचपूर शहरावर आला. तेव्हां हा प्रांत देवगिरीच्या राजांच्याच ताब्यांत होता. म्हैसूरच्या सीमेपर्यंत त्यांचा या वेळीं अंमल होता, म्हणजे देवगिरीच्या यादवांचें राज्य रामदेवरावाच्या वेळींही फार पसरलें होतें. पण दरबारीं पाहिजे तितकी फौजेची तयारी नसावी व नर्मदेच्या उत्तरेस मुसलमानांचें बलाढ्य राज्य स्थापन झालेलें असून त्यापासून आपल्यालाही पुढेंमागें उपसर्ग होण्याचा संभव आहे ही कल्पनाही रामदेवरावाच्या किंवा त्याच्या मुत्सद्यांच्या मनाला शिवली नव्हती असें दिसतें. त्यांची सद्दी संपली. जाधवांचा काळ फिरला. महाराष्ट्रमंडळाचें दुर्दैव ओढवलें. अल्लाउद्दीन तडक देवगडावर चाल करून आला. आपल्यामागून दिल्लीपतीचें प्रचंड सैन्य येत आहे अशी त्यानें हूल उठविली व रामदेवरावाची गाळण उडाली. कांहीं खटका उडाला व रामदेवरावानें अपार संपत्ति देऊन तह केला व यशस्वी अल्लाउद्दीन परत दिल्लीस गेला. दिल्लीपती झाल्यावर शके १२२८ मध्यें अल्लाउद्दीन खिलजीनें तीस

हजार घोडेस्वार बरोबर देऊन मलिक काफरास देवगडावर पाठविलें. त्यानें रामदेवरावाचा मुलूख लुटून त्याला कैद करून दिल्लीस नेलें. तेथें सहा महिने कारागृहवास भोगल्यावर रामदेवराव परत आला. पण तो पुढें तीन वर्षांनीं म्ह० शके १२३१ मध्यें आटोपला. त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा शंकरदेव गादीवर बसला. त्यानें तीन वर्षें करभार पाठविला नाहीं म्हणून पुनः मलिक काफरानें शके १२३४ मध्यें देवगडावर स्वारी करून लूट व जाळपोळ केली व ह्या प्रसंगीं शंकरदेव मारला गेला. रामदेवरावाचा जांवई हरपाल यानें पुन्हां राज्य मिळवण्याचा उद्योग केला, पण श० १२४० मध्यें दिल्लीचा बादशहा मुबारिक ह्यानें त्याला पकडलें व क्रूरपणानें त्याच्या अंगचें कातडें काढून त्याला ठार मारलें व ह्याप्रमाणें देवगडच्या जाधवांच्या राज्याचा शेवट झाला.

---

## २ विद्या.

१० देवगिरीच्या यादवांच्या अंमलांत ज्योतिष, वैद्यक, धर्मशास्त्र व व्याकरण ह्या शास्त्रांचा [1]विशेष जारीनें अभ्यास व प्रसार झाला. प्रथम आपण ज्योतिषाकडे वळूं. ह्या काळीं भास्कराचार्यप्रमुख कित्येक नामांकित ज्योतिषी उदयास आले व कांहींना यादवांचा चांगलाच आश्रय होता. भास्कराचार्यांचें घराणेंच विद्वानांचें होतें. त्यांची वंशावळ बाजूस लिहिल्याप्रमाणें निघते. पहिला पुरुष त्रिविक्रम हा 'दमायंतीकथा' नामक ग्रंथाचा

त्रिविक्रम. कर्ता होय. त्याचा पुत्र भास्करभट्ट हा शके ९३६ च्या सुमा-
| रास जन्मलेला असून तो भोजराजाचा विद्यापति होता. त्या-
भास्करभट्ट. पासून पांचवा पुरुष महेश्वर हा आपल्या काळीं नामांकित
| विद्वान् होऊन गेला. यानें शके १०३० च्या सुमारास चार

---

१ ही माहिती कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांच्या 'भारतीय ज्योतिषशास्त्रांचा इतिहास' ह्या बहुमोल ग्रंथावरून घेतली आहे.

गोविंद.
|
प्रभाकर.
|
मनोरथ.
|
महेश्वर.
|
भास्कराचार्य.
|
लक्ष्मीधर.
|
चंगदेव.

ज्योतिषग्रंथ लिहिले. त्याचा पुत्र जगप्रसिद्ध **भास्कराचार्य** हे होत. यांचा जन्म शके १०३६ मध्यें झाला. यांचे सिद्धांतशिरोमणि, करणकुतूहल व लीलावती हे ग्रंथ सर्वमान्य आहेत. सिद्धान्तशिरोमणि हा ग्रंथ त्यांनीं आपल्या वयाच्या ३६ व्या वर्षीं म्हणजे शके १०७२ मध्यें रचला व करणकुतूहल रचण्यास वयाच्या ६९ व्या वर्षीं म्हणजे शके ११०५ मध्यें प्रारंभ केला. यांनीं सारा जन्म ज्योतिषाच्या अध्ययनांत घालविला व पूर्वकालीन आर्यभट्ट, वराहमिहिर यांच्याप्रमाणें ज्योतिषविद्येंत चिरंतन यश मिळविलें. भास्कराचार्यांचा पुत्र लक्ष्मीधर याला जैत्रपाल राजाचा आश्रय होता. राजानें त्याला दरबारीं सन्मानानें बोलावून नेलें व सभापंडित म्हणून ठेविलें. लक्ष्मीधराचा पुत्र चंगदेव हा सिंघणराजाचा ज्योतिषी होता. चंगदेवानें खानदेशांत चाळिसगांवच्या नैऋत्येस १० मैलांवर पाटण म्हणून एक खेडें आहे तेथें भास्कराचार्य व त्यांच्या वंशांतील इतर ग्रंथकार यांच्या ग्रंथांचें अध्ययन जारीनें प्रचालित व्हावें म्हणून एक मठ बांधला. सांप्रत तो मठ नाहीं, पण तेथें मठाचीं चिन्हें आहेत. पाटण गांवांत भवानीच्या देवळांत एका शिळेवर चंगदेवाचा एक लेख आहे त्या लेखांत वरील सर्व हकीकत दिलेली आहे. लेखांतील संस्कृत श्लोक प्रथम डॉ. भाऊ दाजी यांनीं शोधून लाविले. 'शांडिल्यवंशे कविचक्रवर्ती' त्रिविक्रम झाला, त्याच्या भास्करभट्ट नामक पुत्रास भोजराजानें 'विद्यापति' केलें, त्याचा गोविंद, गोविंदाचा प्रभाकर, प्रभाकराचा मनोरथ, त्यापासून 'कवीश्वर' महेश्वर व महेश्वराच्या पोटीं भास्कराचार्य जन्मास आले असें सांगून तो शिलालेख म्हणतोः—

**तत्सनुः कविवृन्दवंदितपदः सद्वेदविद्यालता-**
**कंदः कंसरिपुप्रसादितपदः सर्वज्ञविद्यासदः ।**
**यच्छिष्यैः सह कोपि नो विवदितुं दक्षो विवादी क्वचि-**
**च्छ्रीमान् भास्करकोविदः समभवत्सत्कीर्तिपुण्यान्वितः ॥**

भास्कराचार्य आपल्या काळींच किती मान्य झाले होते तें यावरून समजतें. कविवृंद त्यांच्या चरणीं लीन असत. त्यांच्या शिष्यांबरोबर वादास उभे राहायला सुद्धां पट्टीचे विद्वान्ही भीत. ते वेदविद्यापारंगत असून कृष्णभक्त असत, व एकंदरीनें ते सत्कीर्तिपुण्यान्वित होते. असें हा लेख म्हणतो. त्यांचा पुत्र लक्ष्मीधरही त्यांच्याचसारखा मान्यपुरुष होताः—

**लक्ष्मीधराख्योऽखिलसूरिमुख्यो वेदार्थवित् तार्किकचक्रवर्ती ।**
**क्रतुक्रियाकांडविचारसारविशारदो भास्करनन्दनोऽभूत् ॥ २१ ॥**
**सर्वशास्त्रार्थदक्षोऽयमिति मत्वा पुरादतः ।**
**जैत्रपालेन यो नीतः कृतश्च विबुधाग्रणीः ॥ २२ ॥**

त्याचा पुत्र चंगदेव हा सिंघणराजाचा आश्रित होताः—

**तस्मात्सुतः सिंघणचक्रवर्ती दैवज्ञवर्योऽजनि चंगदेवः ।**
**श्रीभास्कराचार्यनिबद्धशास्त्रविस्तारहेतोः कुरुते मठं यः ॥२३॥**

चंगदेवानें त्या मठांत भास्कराचार्यांचे ग्रंथ व तद्वंश्यकृत अन्य ग्रंथ ठेवले व ह्या 'ग्रंथसंग्रहालयाची' स्थापना केली. सिंघणचा भृत्य ( मांडलिक ) निकुंभवंशांतला साईदेव यानें शके ११२९ मध्यें ह्या संग्रहालयास नेमणूक करून दिली. भास्कराचार्यांना कोणा तरी राजाचा आश्रय होता असें मानावयाला यद्यपि आधार नाहीं, तथापि त्यांच्या पुत्रपौत्रांस यादव राजांनीं आश्रय दिल्याचें यावरून स्पष्ट दिसतें. असो. भास्कराचार्यांनीं आपल्या जनकाबद्दल सिद्धांतशिरोमणि ग्रंथांत म्हटलें आहेः—

**आसीत् सह्यकुलाचलाश्रितपुरे त्रैविद्यविद्वज्जने**
**नानासज्जनधाम्नि विज्जडविडे शांडिल्यगोत्रो द्विजः ।**
**श्रौतस्मार्तविचारसारचतुरो निःशेषविद्यानिधिः**
**साधूनामवधिर्महेश्वरकृती दैवज्ञचूडामणिः ॥ ६२ ॥**
**तज्जस्तच्चरणारविंदयुगलप्राप्तप्रसादः सुधी—**
**मुग्धोद्बोधकरं विदग्धगणकप्रीतिप्रदं प्रस्फुटम् ।**
**एतत् व्यक्तसदुक्तियुक्तिबहुलं हेलावगम्यं विदां**
**सिद्धांतग्रथनं कुबुद्धिमथनं चक्रे कविर्भास्करः ॥ ६२ ॥**

—गोले प्रश्नाध्यायः

ह्यावरून भास्कराचार्यांना त्यांच्या थोर जनकापासूनच विद्याप्राप्ति झाली असें दिसतें. भास्कराचार्यांचें वसतिस्थान सह्याद्रिपर्वताच्या सन्निध विज्जडविड हें होतें. विज्जडविड म्हणजे बीड किंवा बेदर नव्हे. हीं दोन्ही शहरें सह्याद्रिसंन्निध नाहींत. शिलालेखांतील वर जो २२ वा श्लोक दिला आहे, त्यांत जैत्रपालानें लक्ष्मीधराला 'पुरादानीतः' असें म्हटलें आहे. पुर म्हणजे पाटण हें गांव देवगिरीपासून जवळच आहे व तें सह्याद्रीचे फांटे जे चांदवडचे डोंगर त्यांच्या लगतच आहे म्हणजे भास्कराचार्यांनीं म्हटल्याप्रमाणें सह्याचलाश्रित आहे. ह्यावरून त्यांचें वसतिस्थान पाटण हेंच होय किंवा पाटणाजवळ विज्जडविड ह्या नांवाचें एखादें गांव असावें असें दिसतें. वरील दोन श्लोकांत भास्कराचार्यांनीं आपल्या घराण्याबद्दलचा अभिमान व आपली पितृभक्ति उत्तम प्रकारें व्यक्त केली आहे. श्रौतस्मार्तविचारांचें सार काढण्यांत चतुर, अनेक विद्यांचें आगर व साधूंचें मुकुटमणि हीं विशेषणें त्यांनीं आपल्या पूज्य पित्यास लाविलीं आहेत, व त्यांस ज्योतिषरत्न असें म्हणून त्यांच्या चरणकमलापासून मला प्रसाद प्राप्त झाला असें म्हटलें आहे. बाप विद्वान् व सदाचरणी असून तोच आपल्या पुत्रास शिकविणारा त्यांचा गुरू असणें व बापाच्या विद्येचा पुत्रानें लौकिक वाढविणें ही गोष्ट विरळ ठिकाणीं आढळते! भास्कराचार्यांचें घराणें विद्वान् व मुख्यतः ज्योतिषविद्येंत पारंगत असें होतें. भास्कराचार्यांचा भाऊ श्रीपति त्याचा पुत्र गणपति व त्याचा पुत्र अनंतदेव हा सिंघणराजाच्या आश्रयाला होता. त्यानें कोरवलेला एक शिलालेख खानदेशांत चाळीसगांवच्या उत्तरेस १० मैलांवर बहाळ ह्मणून एक गांव आहे तेथें सारजादेवीच्या देवळांत आहे. ह्या अनंतदेवानेंही कांहीं ग्रंथ ज्योतिषावर लिहिले आहेत. भास्कराचार्यांच्या घराण्याशिवाय दुसरेंही एक ज्योतिषांचें घराणें ज्योतिषविद्येंत निष्णात म्हणून निवडून आलेलें आहे. भारद्वाजगोत्री राम नांवाचा ज्योतिषी देवगिरी यादवांपैकीं शेवटला जो रामदेवराव त्यांच्या सभेंत असे. हा पैठणच्या पूर्वेस ७० मैलांवर गोदेच्या उत्तरतीरावर असणाऱ्या पार्थपूर

उर्फ पाथरी येथील राहणारा होता. पाथरी देवगिरीच्या आग्नेयेला ८५ मैलांवर आहे. ह्या रामज्योतिष्याच्या वंशांत शके १४३०—१४७० पर्यंतच्या काळांत ज्ञानराज, सूर्य, धुंडिराज इत्यादि अनेक ज्योतिषी झाले व त्यांनीं ज्योतिषावर अनेक मान्य ग्रंथही लिहिले. मौजेची गोष्ट ही कीं, देवगिरीचा शेवटला राजा रामदेवराव याच्या दरबारचा ज्योतिषी वरील राम पाथरीकर याच्या वंशांतला ११ वा पुरुष विज्ञानेश्वर हा शेवटल्या बाजीराव पेशव्यांच्या दरबारचा ज्योतिषी होता ! ! त्याचे वंशज सध्यां बीड येथें हयात आहेत असें म्हणतात.

सिंघणाचा 'श्रीकरणाधिप' सोढल नामक काश्मिरी ब्राह्मण असून त्याचा पुत्र शार्ङ्गधर ह्यानें 'संगीतरत्नाकर' नांवाचा सुंदर ग्रंथ केला होता. कृष्णदेवाचा गजसेनाधिप शूर व विद्वान् होता व त्यानें सुभाषितावर 'सूक्तिमुक्तावली' नामक ग्रंथ केला असून तो उपलब्धही आहे. त्याच कृष्णदेवाचा आश्रित अमलानंद ह्यानें आचार्यांच्या वेदांतसूत्रभाष्यावर 'वेदान्तकल्पतरु' नामक ग्रंथ केला आहे.

११. वीर महादेव व रामदेवराव जाधव यांच्या कारकीर्दींत त्यांचा मुख्य मंत्री **हेमाद्रि** ह्याचें नांव मुख्यतः लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हा हेमाद्रि हेमाडपंत ह्या नांवानें अद्याप महाराष्ट्रांत प्रसिद्ध असून त्यानें बांधलेल्या देवळांस हेमाडपंती देवळें म्हणतात. हा माध्यंदिन शाखेचा वत्सगोत्री, पंचप्रवरी यजुर्वेदी ब्राह्मण मोठा विद्वान् असून मुत्सद्दी होता. ह्याच्या बापाचें नांव कामदेव, आजाचें वासुदेव व पणज्याचें वामन असें होतें. ह्याचा कुळस्वामी महालसा उर्फ मोहनीराज. हा राजकारणधुरंधर ब्राह्मण धर्मशास्त्रांतही फार निष्णात होता. ह्यानें धर्मशास्त्रावर अनेक ग्रंथ केले असून त्यांत '**चतुर्वर्गचिंतामणी**' हा ग्रंथ मुख्य होय. ह्या ग्रंथाचे

१ शके ११९४ च्या ताम्रपत्रांत त्याला 'श्रीकरणाधिप' ही पदवी दिलेली असून तिच्यासंबंधानें डॉ. भांडारकर म्हणतातः—"This office seems to have been that of chief secretary or one who wrote and issued all orders on behalf of his master and kept the record."

व्रतखंड, दानखंड, तीर्थखंड व मोक्षखंड असे चार भाग आहेत. ह्या भागांच्या नांवावरूनच त्यांत कोणकोणत्या विषयांचें विवरण केलें आहे तें समजतें. परिशेषखंड नांवाच्या पांचव्या खंडांत देवतापूजा, श्राद्धविधि, मुहूर्तनिर्णय, प्रायश्चित्त इत्यादि विषयांचें सविस्तर विवरण केलें आहे. हे ग्रंथ अलीकडे छापलेले आहेत. हेमाद्रीचे ग्रंथ आज सातशें वर्षें विद्वन्मान्य झालेले असून धर्मशास्त्रविषयक चर्चेंत हेमाद्रीचें नांव व त्याच्या ग्रंथांतलीं अवतरणें हमेष उच्चारण्यांत येत असतात. आयुर्वेदरसायन, मुक्ताफल इत्यादि अनेक ग्रंथ त्यानें लिहिले असून कित्येक ग्रंथ तर त्याचा आश्रित जो बोपदेव त्याजकडून त्यानें लिहविले व आपण स्वतः बोपदेवाच्या कित्येक ग्रंथांवर टीका लिहिल्या ! ! 'राजप्रशस्ति' नामक सुंदर श्लोकमय ग्रंथांत तर त्यानें 'देवगिरीच्या यादवांचा संक्षिप्त इतिहासच' दिलेला आहे. ही राजप्रशस्ति फार विश्वसनीय आहे. हेमाद्रीनें मोडी लिपी लंकेहून महाराष्ट्रांत आणली व तेथून एक जातीचें धान्य आणून रामदेवाचा दुष्टिपात दूर केला असें म्हणतात. हेमाद्रि राजकारणी, विद्वान्, धर्मशास्त्रज्ञ, ग्रंथकार व कलावान् होता. ज्या मुत्सद्दीपणाबद्दल महाराष्ट्र ब्राह्मणांची जगभर प्रसिद्धि झाली आहे त्याचा हेमाद्रि हा सर्वांत जुना व पहिला असा आदर्श आहे.

१२. हेमाद्रीचा आश्रित आणि समशील असा परम मित्र म्हणजे **बोपदेव** हा होय. हा मोठा कृष्णोपासक होता. ह्याचें घराणें मूळ वैद्यांचें होतें. ह्याचा आजा महादेव व बाप केशव होता. हे दोघेही प्रख्यात वैद्य होते. केशवाचा 'सिद्धमंत्र' नांवाचा 'निघंटु' प्रसिद्ध झालेला असून यावर बोपदेवानें 'सिद्धमंत्रप्रकाश' नांवाची टीकाही लिहिलेली आहे. केशवानें सिद्धमंत्रांत लिहिलें आहेः—

> **लेभे जन्म महादेवात् आयुर्वेदं च भास्करात् ।**
> **सन्मानं सिंहराजाच्च केशवः कारकोऽस्य सः ॥**

**अर्थः**—ह्या सिद्धमंत्रग्रंथाचा कारक म्ह०कर्ता जो केशव त्याचा जनक महादेव होता, त्याचा वैद्यकींतला गुरु भास्कर हा होय. त्याचा आश्रयदाता

सिंहराज किंवा सिंघण हा होता. ह्या वरील श्लोकावर टीकाकरतांना बोपदेवानें 'महादेवो वेदपदाभिधानमहाराष्ट्रनिवासी विप्रः' असें म्हटलें आहे, म्ह० महादेव वेदपद नामक गांवांत राहणारा '**महाराष्ट्र ब्राह्मण**' होता. बोपदेवानें शतश्लोकी नामक आपल्या ग्रंथांत पुनः वेदपद गांवाचा उल्लेख केला असून स्पष्ट म्हटलें आहे कीं, विदर्भ ( वऱ्हाड ) देशांत वरदा नदीच्या कांठच्या वेदपदाख्य गांवांत केशव व धनेश नामक दोन प्रख्यात वैद्य असून बोपदेव हा धनेशाचा शिष्य व केशवाचा पुत्र होय. तात्पर्य, बोपदेव हा केशवाचा पुत्र असून धनेशापासून वैद्यकी शिकला होता. त्याला हेमाद्रीचा आश्रय असून उभय पंडितांची मैत्री निरुपम होती. बोपदेवाचा जन्मशक ११८२ हा होय. हेमाद्रि बोपदेवाहून वडील होता. बोपदेवाच्या मुक्ताफलावरील टकिंत हेमाद्रि प्रेमानें म्हणतातः—

**" यस्य व्याकरणे वरेण्यघटना स्फीताः प्रबंधा दश ।**
**प्रख्याता नव वैद्यकेऽथ तिथिनिर्धारार्थमेकोऽद्भुतः ।**
**साहित्ये त्रय एव, भागवततत्वोक्तौ त्रयस्तस्य भू- ।**
**म्यंतर्वाणि शिरोमणेरिह गुणाः के के न लोकोत्तराः " ॥**

ह्या श्लोकावरून बोपदेवानें व्याकरणावर दहा प्रबंध, वैद्यकावर नऊ, तिथिनिर्णयावर म्ह० ज्योतिषावर एक, साहित्यशास्त्रावर तीन व भागवत-तत्वावर तीन मिळून २६ प्रबंध लिहिले असें सिद्ध होतें ! ! बोपदेवाची बुद्धिमत्ता व हेमाद्रीची गुणज्ञता हे दोन्ही गुण लोकोत्तर असून उभयतांची विद्वत्ता व मैत्री असामान्य कोटींतली होती. हेमाद्रीनें बरेच ग्रंथ बोपदेवाकडून करविले व बोपदेवानेंही ते 'मन्त्रिहेमाद्रितुष्टये' म्ह० हेमाद्रीच्या संतोषार्थ आनंदानें व उत्साहानें केले. मुक्ताफलांत बोपदेव म्हणतोः—

**विद्वद्धनेशशिष्येण भिषक्केशवसूनुना ।**
**हेमाद्रिर्बोपदेवेन मुक्ताफलमचीकरत् ॥**

तसेंच हरिलीलेंत तो म्हणतोः—

**श्रीमद्भागवतस्कन्धोऽध्यायार्थादि निरूप्यते ।**
**विदुषा बोपदेवेन मन्त्रिहेमाद्रितुष्टये ॥**

हेमाद्रि धर्मशास्त्रांत निपुण होते व बोपदेव व्याकरण व वैद्यक यांत विशेष निष्णात होते. दोघेही श्रीकृष्णभक्त होते व श्रीमद्भागवतावर दोघांचीही पूर्ण श्रद्धा होती, तथापि त्यांतल्या त्यांत बोपदेव यांच्या ठायीं प्रेमळपणा विशेष होता असें दिसतें.

१३. **बोपदेवानें श्रीमद्भागवतावर पुढील तीन सुंदर ग्रंथ रचले.** १ **हरिलीला**—ह्या ग्रंथांत बोपदेवानें भागवताचें स्कन्धशः सार दिलें आहे. २ **मुक्ताफल**—हा असाच भागवताचें तात्पर्य सांगणारा ग्रंथ आहे. ३ **परमहंसप्रिया**—ही मात्र भागवतावर बोपदेवीय टीका आहे. पहिल्या दोहींवर वृद्धपणीं हेमाद्रीनें हरिलीलाभाष्य व कैवल्यदीपिका नामक टीका लिहिल्या. हेमाद्रि व बोपदेव यांनीं भागवतधर्माच्या प्रसाराच्या कामीं ह्या ग्रंथांच्या योगानें फार मोठें साह्य केलें. भागवत ग्रंथावरचें आपलें प्रेम बोपदेवानें पुढील सुंदर श्लोकांत व्यक्त केलें आहे:—

**वेदः पुराणं काव्यं च प्रभुर्मित्रं प्रियावचः ।**
**बोधयंतीति ह प्राहु स्त्रिवद्भागवतं पुनः ॥**

**अर्थ**—वेद, पुराणें व काव्यें हीं क्रमेंकरून प्रभु, मित्र व प्रियेचें वचन ह्याप्रमाणें आहेत, म्हणजे त्यांचा हेतु जीवांना बोध देऊन जागे करण्याचा आहे. पण भागवतांत हा श्रेष्ठपणा आहे कीं, तें वेदाप्रमाणें प्रभुत्व गाजवतें, म्हणजे अधिकाराच्या वाणीनें आज्ञा करितें; पुराणांप्रमाणें गोष्टीमाता सांगून मित्रत्वाच्या नात्यानें आत्महिताचा सल्ला देतें व काव्याप्रमाणें प्रियेच्या मनोहर संवादासारखा प्रेमळ सद्बोध करितें ! असो. हेमाद्रि व बोपदेव यांनीं आपल्या विद्वत्तेच्या व अधिकाराच्या जोरावर भागवतधर्माच्या प्रेमांकुरास पाणी घातलें खरें, पण धर्मप्रसाराचें खरें काम विद्वानांकडून व धर्मशील पंडितांकडून फारसें होत नसतें, त्यास परमेश्वरी विभूतिच लागत असते व तशी विभूति अवतरण्याला योग्य अशी धर्मप्रीतिची

शुभेच्छा सामान्य जनांत आधीं पुष्कळ पसरावी लागते. तसा प्रकार श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या अवतारकालीं महाराष्ट्रांत कसा झालाव महाराष्ट्रधर्माचें आगर जें श्रीपंढरपूरक्षेत्र तेथें भाविकांनीं काय उद्योग केले तिकडे आपण यापुढें वळूं.

१४. बोपदेवानें श्रीमद्भागवतावर तीन स्वतंत्र ग्रंथ लिहून व शेवटीं त्यावर 'मुकुट' चढवून म्ह० मुकुट नामक भागवतसाररूप ग्रंथ लिहून भागवताची लोकप्रियता वाढविण्यास पुष्कळ साह्य केलें खरें, पण त्यांनीं कांहीं भागवत ग्रंथ रचिला नाहीं. भागवत ग्रंथ बोपदेवाच्या फार पूर्वींपासून प्रसिद्ध आहे. अठरा पुराणांत सर्वोत्कृष्ट पुराण म्हणजे भागवतच असून त्याचे कर्ते व्यासच होते अशी पूर्वींपासून प्रसिद्धि आहे. कांहीं विरुद्धमतवादी व अलीकडचे कांहीं पंडित यांनीं भागवतावर वक्रदृष्टि ठेविली असून भागवत अगदीं अलीकडचें आहे व तें बोपदेवानेंच रचिलें आहे असा त्यांनीं आक्षेप काढला आहे. त्याचें सप्रमाण खंडण माझे मित्र रा. रा. त्र्यंबक गुरुनाथ काळे यांनीं आपल्या समालोचक मासिकांत (अंक २५ व २९) व केसरींतल्या दोन अंकांत (२८।२।११ व ९।५।११) उत्तम प्रकारें केलें असून श्रीमद्भागवत हें फार प्राचीन असून व्यासकृतच आहे असें पूर्ण सिद्ध केलें आहे. भागवतटीकाकार श्रीधरस्वामी शके १०२२ च्या सुमारास हयात होते; दुसरे टीकाकार चित्सुख व हनुमान् हे त्याहून प्राचीन म्हणजे सातव्या शतकापर्यंतचे आहेत; आचार्यांचे गुरु गौडपादाचार्य यांनीं आपल्या उत्तरगीतेवरील टीकेंत भागवताचा स्पष्ट उल्लेख केला आहे; इ० स० ४००,५०० इतक्या प्राचीन असलेल्या शौनकाच्या ऋग्विधानांतही भागवताचा उल्लेख आहे; इ० कारणांवरून भागवत ग्रंथ फार प्राचीन आहे असें रा. काळे यांनीं सिद्ध केलें आहे. ज्ञानेश्वरींतही भागवतांतील अनेक प्रसंगांचे स्पष्ट उल्लेख असून "ते हे कल्पादिभक्ति मियां। श्रीभागवतमिषें ब्रह्मया। उत्तम ह्मणोनि धनंजया। उपदेशिली" ॥ अ० १८–११३२ असें स्वच्छ सांगितलें आहे.

## ३ धर्म.

### ( पंढरीचा भागवतसांप्रदाय. )

१५. श्रीज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ व तुकाराम हे चार संत महाराष्ट्रांतील भागवतसांप्रदायाचे मुख्य प्रवर्तक आहेत, तरी पंढरीचा भक्तिपंथ हा ह्या सर्वांच्या पूर्वींपासून चालत आलेला आहे. पांडुरंगकथा मूळ पद्मपुराणांत आहे व ज्ञानेश्वरनामदेवांच्याही पूर्वीं पंढरिनाथाचे अनेक भक्त महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत. आळंदीस ज्ञानेश्वरांच्या समाधिमंदिराच्या खालीं नदीतीरावर हरिहरेंद्रस्वामींचा मठ आहे. तेथें शके ११३१ चैत्र वद्य १० भौमवासरीं कोरलेला एक शिलालेख १०।१२ वर्षांपूर्वीं जमिनींत सांपडलेल्या एका देवळावर आहे. तो कोणा कृष्णस्वामींच्या समाधीवर कोरला असून तिच्या पाठीवर विठ्ठलरखुमाईच्या प्रतिमा आहेत. पंढरीस श्रीविठोबाच्या मंदिरांत गरुडपाराचा भव्य चौक ओलांडून सोळखांबीकडे जाण्यासाठीं ३।४ पायऱ्या आहेत. त्या चढून गेल्यावर जो मंडप लागतो त्याच्या वरच्या बाजूस एक ७॥ फूट लांब व १ फूट २ इंच रुंद अशी जुनी शिळा आहे. त्या शिळेच्या तीन बाजूंला देवनगरी लिपींत एक संस्कृत शिलालेख शके ११५९ सालचा आहे. तो स्पष्ट वाचतां येत नाहीं, पण त्याचीं जीं अक्षरें लागलीं आहेत त्यावरून सोमेश्वरनामक यादव धराण्यांतील राजानें तो खोदलेला आहे व त्याच्या नांवास 'पृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज, सर्वराजचूडामणि' हीं बिरुदें लाविलेलीं आहेत. हें द्वारपाळच्या बल्लाळांचें राज्य काबीज करून व पन्हाळच्या भोजराजास जिंकून दक्षिणचा अधिपति होणाऱ्या दुसऱ्या सिंघण यादवाचें ( शके ११३१–११६९ ) दुसरें नांव असेल किंवा तें त्याच्या हयातींत कांहीं वर्षे देवगिरीचें राज्य चालविणारा त्याचा पुत्र 'दुसरा जैतुगी' याचें दुसरें नांव असेल. सोमेश्वर नांवाचा यादव घराण्यांतील कोणी तरी बलाढ्य महाराष्ट्रीय राजा शके ११५९ सालीं पंढरीस आला होता एवढी गोष्ट त्यावरून सिद्ध होते. त्या

शिलालेखावरून "सोमेश्वरानें सभोंवारच्या दुसऱ्या राजांस जिंकून शके ११५९ सालीं भीमरथीच्या तीरावर पंडरिगे नामक महाग्रामांत तळ दिला होता, पुंडलिकाचें 'मुनि' म्हणून लोक प्रेमपूर्वक चिंतन करीत होते व पंडरिगेपासून १५ मैलांवर असलेल्या हिरियगरंज (पुलुंज ?) गांवचे लोक दरसाल देवाला कांहीं वर्षासन देत होते," इतकी गोष्ट निर्विवाद सिद्ध होते; असें म्हणून सोलापूर गॅझेटियरमध्यें भगवानलाल म्हणतात कीं, 'ह्यावरून विठ्ठलाची उपासना त्याच्याही पुष्कळ पूर्वींपासून सुरू होती हें निर्विवाद आहे.' ह्या शके ११५९ च्या शिलालेखांत पुंडलिक मुनि, पंडरिगे (पंढरपूर) महाग्राम हे शब्द स्पष्ट दिसतात. 'गे' हा कानडी प्रत्यय आहे.

पंढरपुरास शके ११९२ प्रमोद संवत्सरांतील एक कोरीव लेख आहे त्यांत 'प्रौढप्रतापचक्रवर्ती महादेव यादव' ह्या देवगिरीच्या राजाच्या कारकीर्दींत एका काश्यपगोत्री ब्राह्मणानें आप्तोर्यामनामक यज्ञ केल्याचा उल्लेख आहे.

१६. श्रीक्षेत्र पंढरपूर हें हजार वर्षें तरी महाक्षेत्र म्हणून गाजत आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादि भक्तांनीं पंढरीचा महिमा वाढविण्यापूर्वीं पंढरी 'विठ्ठलदेवराया'ची नगरी म्हणून दक्षिणभर गाजत होती. पुंडलिकाच्या पुण्याईनें ही विटेवर उभी राहिलेली साजिरी मूर्ति हजार वर्षें तरी कोट्यवधि प्रेमळ भक्तांना मोक्षदात्री झाली आहे. पुंडलिकाचा काल निश्चित करण्यास कांहीं एक साधन उपलब्ध झालेलें नाहीं. पुंडलिकाचा काल निश्चित झाल्यास पंढरीच्या भक्तिपंथाचा आरंभ केव्हां झाला तें समजेल. तूर्त तरी 'युगें अठ्ठावीस विटेवरी उभा' ही श्रद्धा निश्चळ ठेवण्यास हरकत नाहीं. तेराव्या शतकांत ज्ञानेश्वर—नामदेवप्रभृति संतमंडळानें पंढरीचा महिमा भूमंडळावर पसरला, पण त्यापूर्वींच विठ्ठलाचे समचरण भक्तभ्रमरांचें चित्त आकर्षितें झाले होते. **पंढरीस विठोबाच्या देवळांत 'चौऱ्यायशी'चा शिलालेख प्रसिद्ध आहे त्यावरून**

शके ११९५ मध्यें विठ्ठलमंदिराचा जीर्णोद्धार करण्यास भाविकांनीं प्रारंभ केला असून शके ११९९ पर्यंत श्रद्धालु माणसांकडून वर्गण्या घेण्याचें काम चाललें होतें असें स्पष्ट दिसतें. सदर शिलालेख ज्या शिळे-वर खोदलेला आहे, तिच्यावर वारकऱ्यांना पाठ घांसण्यास बडवे सांगत असतात. सदर शिळा ४ फूट १० इंच लांब व २ फूट ९ इंच रुंद आहे. तिच्यावर प्रथम तीन ओळी शिळेच्या सबंद लांबीभर खोदल्या आहेत, व पुढें ८ रकान्यांत वर्गण्यांची नांववार व खातेवार यादी दिली आहे. पहिल्या तीन ओळींपैकीं दुसऱ्या ओळींत पुढील संस्कृत श्लोक आहे:—

**स्युत्यं नित्यमशेषसिद्धविबुधैर्भूत्यां विपृष्टं परं ।**
**श्रीकांतं कमलेक्षणं सुरगणैर्गेयं मुदा कोमलम् ।**
**कीर्त्यं भक्तजनैर्भृशं पुलकितानंदांबुपूर्णेक्षणै- ।**
**वदनेद (सु) तं मुदा घननिलं भक्तानुगं (श्री) विठ्ठलम् ॥**

तिसऱ्या ओळीवर तत्कालीन मराठींतिलें पुढील वाक्य आहे.

**"स्वस्ति श्री सकु ११९५ श्रीमुख संवत्सरे फागनिपुर श्री विठ्ठलदेवरायासि तिसासिति फुलें दांडें आचंद्रार्क चालावेंआ नाना भक्तिमालिआं दत्त पैकाचा विवरु."**

"स्वस्ति श्री शक ११९५ श्रीमुखनाम संवत्सरीं [1]फागनिपुर (फाल्गुनी पूर्णिमेस ?) श्रीविठ्ठलदेवरायास फुलें व दांडे समर्पण करण्याचें काम यावच्चंद्रादिवाकर चालू राहावें म्हणून अनेक भक्तमंडळींनीं दिलेल्या द्रव्याचा तपशील."

---

१ फागनिपुर हें नांव त्या वेळीं पंढरपुरास असावें असें राजवाड्यांचें मत आहे. 'फागनि' हें 'फाल्गुनी' ह्या संस्कृत शब्दाचें प्राकृतरूप आहे. त्यांच्या मतें पंढरपूर व गोपाळपूर यामधील ओढ्याचें फाल्गुनी हें नांव असावें व त्या ओढ्याच्याजवळ असणारें जें गांव तें फागनिपुर. फागनिपुर याचा अर्थ 'फाल्गुनी पूर्णिमा' असा असेल काय ? वरील शिलालेख रा. वि. का. राजवाडे यांनीं पुन्हां प्रसिद्ध केला आहे.

१७. ह्यापुढें आठ रकाने गद्यान नामक १५ रुपये किंमतीचें सोन्याचें नाणें वगैरे देणग्या देणाऱ्यांच्या नांवांनीं भरलेले आहेत. हीं सर्व नांवें येथें देण्याचें कारण दिसत नाहीं; तथापि त्यांतील कांहीं नांवांवरून जो बोध होतो तो घेतल्यावांचून मला पुढें जाववत नाहीं. ह्या नांवांत कांहीं पुरुषांचीं नांवें आहेत, व कांहीं स्त्रियांचीं नांवें आहेत. कांहीं नांवें महाराष्ट्रीय स्त्रीपुरुषांचीं आहेत व कांहीं कानडी व तेलंगी स्त्रीपुरुषांचीं आहेत. प्रत्येक रकान्यांत कोणाच्या मार्फत पैसे वसूल झाले त्याचेंही नांव दिलें आहे, त्यावरून पैसे वसूल करण्यासाठीं कांहीं निवडक शिष्टांचें मंडळ नेमलें गेलें होतें असें दिसतें. श्रीपतिद णाक ( नाईक ), गंगाधर नायक, मांघोली येथील बाबा सेणवै ( फौजेचा नायक=फौजदार? ), विजापूर येथील गौरुबाहू, मांईबाई दामोदरभट, कोकणा केंसवदेव, बामरसचा नावैए जोइसि ( नामअय्या जोशी ), विठनायक, विनायक व देऊबाई हे त्रय, आंवळ्याचा जातिदेव, आंबे येथील कृष्णदेव, हौगल येथील मलोदेव, पैठणचा चांगदेव, सिध ( शिदू ) नायक, सालीव येथील यादो सेणवै, आवडे येथील रासपंडित, पुराणिक हयवाह अय्या, वाडदेव गुरु, वाजसनेयसुत व चंगदेवसुत ही त्रयी, जाईदेव सेठवल, देंपेरु ( तेलंगी ) नामक हूलिक ( शेतकरी ), सांय येथील बोपिसेठ, म्हैसगी येथील जगदेवराणा, अर्जुनभट व रामेश्वरभट, कैतोर येथील विठ्ठलदास, कोकणा महादेव, रूपदेवसुत तारदेव, रामणंदेव; गिरिपंडित, पदुबाई कराणिक, वैराग येथील दांठीनायक, विजापूर येथील बळिदेव पंडित, वोडवंग येथील भणगें, झिंबदेव दलवै ( दळवी ), भिंगिआर ( भिंगार ) येथील हत्तिदेव सेंडा सेट्ठे ( शेंडे आडनांवाचे श्रेष्ठी ), मेहकर नागंणा, वणखेडचा महादेव पंडित, मरवाडी बादेवण्णा, उभेमार्गी ( उभाघर? ) येथील तिंगवदेव, लाड हरिदेव, कान्हो राईआपा, श्रीधरदासी, यादो गणसेन इ० इ० ह्या नामावळीवरून कर्नाटक, तेलंगण, पैठण, कोंकण, नगर इत्यादि सर्व भागांतून भाविक लोक 'श्रीविठ्ठलदेवराया'च्या दर्शनास

शके ११९५ च्या पूर्वींपासून जमत असत असें स्पष्ट दिसतें! प्रस्तुतच्या ८४ च्या शिलालेखावरून आणखी ४।२ गोष्टी लक्ष्यांत येतात, त्या येथें नमूद करून ठेवितों. शके ११९५ मध्यें ही शिला खोदण्यास प्रारंभ झाला व ११९९ मध्यें सदर शिलेचें खोदणें संपलें. ह्या पुढील सालच्या शिला कदाचित् पंढरीस कोठें जुन्या इमारतींना लावलेल्या किंवा जमिनींत अद्याप पुरलेल्या असण्याचा संभव आहे! भक्तमंडळीनें आपापसांत वर्गणी जमवून श्रीविठ्ठलदेवरायाच्या मंदिराचा जीर्णोद्धार याप्रमाणें चालविला, व त्यासाठीं त्यांनीं व्यवस्थापक मंडळाचीही स्थापना केली, हें चांगलेंच झालें; पण विशेष आनंदाची गोष्ट ही कीं, ह्या राष्ट्रीय देवतेच्या जीर्णोद्धाराच्या कामास तत्कालीन महाराष्ट्र भूपतीनेंही मनःपूर्वक साहाय्य केलें होतें. वरील यादींत दोन प्रमुख नांवें आलेलीं आहेत. महाराष्ट्राचा तत्कालीन राजा '**रामदेवराव जाधव**' व त्याचा प्रख्यात मुत्सद्दी हेमाद्रिपंडित उर्फ **हेमाडपंत** यांनींही ह्या राष्ट्रीय देवकार्यास साह्य केलें आहे. 'सकु ११९८ धाता संवत्सरे माग वदि ३ ( माघ वद्य ३ ) वृषे ( सोमवारीं ? ) सोडवीकार ( सोडवी गांवचा राहणारा ) हेमाडपंडित' पंढरपुरास गेला होता व त्यानंतर १० महिन्यांनीं "**स्वास्ति श्री सकु ११९८ ईश्वर संवछरे मार्गसीर सुदि १५ सुक्रे (शुक्रवारीं) श्रीविठ्ठलदेवरायासि पांडरीफडमुख्य ( पांढरीच्या सभेचा अध्यक्ष ) श्री जादवनारायण प्रौढप्रतापचक्रवर्ति श्रीरामचंद्र देवराय**" यांनीं कांहीं आचंद्रार्क टिकणारी देणगी दिली पण त्या देणगीचा आंकडा बरोबर समजत नाहीं! ही देणगी मोठीच असली पाहिजे. राजाचे सर्वाधिकारी यांनींही कांहीं देणगी दिली आहे. राजघराण्यांतील कोणा स्त्रीनें 'बलदेवबायकें' मोठी विहीर ( वाव ) बांधण्यास ' भहूसी ' ( भूयसी—मोठी दक्षिणा ) दिली. हीं राजभेटींचीं सर्व अक्षरें इतर अक्षरांपेक्षां मोठीं असून राजाबद्दल व्यवस्थापक मंडळानें आपली पूज्यबुद्धि दाखविण्याकरितां त्यांचा प्रारंभ 'स्वस्ति' ह्या अक्षरानें केला असून शेवट 'श्रीमंगलमहाश्री' ह्या अक्षरानें केला आहे. लोकांनीं

आपण होऊन आरंभिलेल्या कार्यांत राजानें याप्रमाणें आनंदानें मिसळणें ही गोष्ट राजा व प्रजा या उभयतांसही फार भूषणावह आहे. अशा लोकानुरंजनतत्पर देवप्रिय राजाचा ज्ञानेश्वरासारख्या विरक्त महात्म्यानें जो गौरव केला आहे तो यथार्थच असला पाहिजे.

श्रीविठ्ठलदेवरायाच्या भक्तांनीं फार काळजीनें पैका गोळा केला होता. सातु, गहू, तूप इत्यादि देवाचे जिन्नस जो कोठारी इमानाला न जागतां लांबवील त्यास ह्या शिलालेखांत 'कोठारी ठाकवी तेयासि श्रीविठ्ठलाची आण' ह्याप्रमाणें शपथ घातली आहे! श्रीविठ्ठलावर याप्रमाणें शके ११९५ च्या सुमारास संपूर्ण महाराष्ट्राची पूर्ण भक्ति जडली होती. ह्याच शिलालेखांत आषाढ सुध (शुद्ध) व बहुल (कृष्ण) एकादशी, अश्विन शुद्ध प्रतिपदा, पौर्णिमा इत्यादि तिथींलाच बहुशा देवाला देणग्या दिल्याचें लिहिलें आहे, त्यावरून आषाढी एकादशीला व अन्य पौर्णिमेला यात्रा अधिक जमत असून तेव्हां अश्विनाच्या नवरात्राच्या उत्सवासही प्रारंभ झाला असावा असें वाटतें. साऱ्या शिलालेखांत रुक्मिणीचें नांव नाहीं! विठ्ठलाला मात्र 'श्रीविठ्ठलदेवराय' ह्याप्रमाणें मोठ्या प्रेमानें जागोजाग संबोधिलेलें आहे. ह्या शिलालेखानंतर ३४ वर्षांनीं (श. १२३३) खोदलेला एक शिलालेख पंढरीसच एका घराला लावलेला चोखामेळ्याच्या समाधीजवळ आहे. त्यांत श्रीविठ्ठलदेवरायाला "पंढरीपुरवराधीश्वर पुंडरिकवरद पांडवप्रजापालक भगतजनसेवित सदाप्रसन्नसमुज्जीवलोकैकनाथ वैकुंठाधिपति देवराय" इत्यादि प्रेमळ विशेषणांनीं संबोधिलें असून 'पंडारिपुर' नगरीला 'श्रीमद्दक्षिणद्वारावति' अशी पदवी दिली आहे.

१८. सदर हकीकतीवरून दक्षिणेंतील भक्तभाविकांनीं श्रीविठ्ठलदेवरायाच्या पूजेअर्चेचा प्रकार वाढत्या प्रमाणावर शके ११९५–९९ मध्यें सुरू केला व त्यास हेमाडपंतासारख्या विद्वान् व कर्त्या मुत्सद्यानें आणि रामदेवरायांसारख्या तत्कालीन महाराष्ट्रभूपतीनें मनःपूर्वक साह्य करून प्रोत्साहन करून दिलें हें स्पष्ट दिसतें. यापुढील हकीकत ह्याही-

पेक्षां जास्त चित्तवेधक आहे. भाविक लोकं व राजमंडळ हे एखादी संस्था काढतील व द्रव्यबळावर कांहीं काळ ती चालवितीलही, पण त्या संस्थेस आंतून जें ईश्वरी तेज लागत असतें तें संतांच्या पाठबळाशिवाय प्राप्त होत नाहीं. कोणत्याही संस्थेस जिवंतपणा आणण्यास ईश्वरी विभूतिच लागत असतात. भाविकांच्या अत्युत्कट प्रेमानें सद्गदित होऊन पंढरिनाथानें आपल्या भक्तांना वैकुंठाहून महाराष्ट्रांत आणलें. स्वतः पंढरिनाथ श्रीज्ञानेश्वररूपानें प्रकट झाले व विसोबा खेचर, नामदेव, गोराकुंभार, सांवतामाळी, नरहरि सोनार, बंका महार, चोखामेळा, जनमित्र, कूर्मदास, जनाबाई, चांगदेव, इत्यादि संतरत्नांच्या साह्यानें त्यांनीं महाराष्ट्रावर भक्तिज्ञानानंदाचा वर्षाव केला. ह्या संतांनीं महाराष्ट्रास सनाथ केलें. यांनीं भागवतधर्मांचीं अत्युच्च तत्वें समाजांत पिकविलीं, व सर्वांभूतीं भगवद्भाव वाढविला. पंढरपूर हें भक्तिपंथाचें केंद्र ठरविलें. रेड्याकडून वेद बोलविणें, चांगदेवाचा गर्व हरण करण्याकरितां जडभिंत चालविणें, स्वर्गींचे पितर जेवाविणें इत्यादि चमत्कारांनीं पैठणच्या ब्राह्मणांचा गर्वपरिहार करून त्यांजकडून आपल्या वयाच्या बाराव्या वर्षीं म्हणजे शके १२१४ च्या सुमारास शुद्धिपत्र मिळवून ज्ञानोबाराय पंढरीस गेले व तेथील भाविकांना विठ्ठलभक्तीचें रहस्य शिकवून सगुणनिर्गुणांचें व भक्तिज्ञानांचें ऐक्य त्यांनीं त्यांच्या मनावर ठसविलें. विठ्ठल आणि कृष्ण एकच, तेव्हां श्रीकृष्णमुखानें जी गीता संस्कृतांत प्रगट झाली होती तिचा महाराष्ट्रमंडळांत प्रसार व्हावा म्हणून ज्ञानोबामाउलीनें शके १२१२ मध्यें आपली भावार्थदीपिका प्रकट केली. नामदेवांच्या विठ्ठलभक्तीच्या कथा महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. परमभक्त नामदेव हे प्रथम सगुणभक्तच होते, पण सगुण-निर्गुण एक असून पंढरीचा विठ्ठल हाच विश्वात्मक देव किंवा क्षराक्षरातीत पुरुषोत्तम हें ज्ञान त्यास विसोबा खेचराकडून झालें.

---

# २ कुलवृत्तांत.

**पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती.॥**

—तुकाराम.

१ महाराजांचे पूर्वज आपेगांवचे कुळकर्णी. २ पणजे त्र्यंबकपंत. ३ आजे गोविंदपंत व हरिपंत. ४ वडील विठ्ठलपंत. ५ त्यांच्या पश्चिम तीर्थयात्रा. ६ आळंदीस आगमन. ७ त्यांचा विवाह. ८ दक्षिण तीर्थयात्रा. ९ वैराग्य. १० काशीचे रामानंदस्वामी व विठ्ठलपंतांचा संन्यास. ११ रुक्मिणीबाईचें तपाचरण. १२ रामानंदस्वामी विठ्ठलपंतांस पुन्हां गृहाश्रम देतात. १३ त्यांचा छळ. १४ त्यांच्या गृहाश्रमाची अपूर्वता. १५ निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई यांचे जन्म व यांच्या जन्मकाळाबद्दल संतांचीं वचनें.

## वंशावळ.

हरिहरपंत ( आपेगांवचे कुळकर्णी )

| | | |
|---|---|---|
| रामचंद्रपंत | केशवपंत | मोहनाबाई |
| | ० | × नरहरपंत माचवे ( देवगडकर ) |
| गोपाळपंत | | |

गोपाळपंत

त्र्यंबकपंत ( हयात शके ११२९ )

| | |
|---|---|
| गोविंदपंत × निराबाई ( पैठणच्या कृष्णाजीपंत देवकुळ्यांची बहीण ) | हरिपंत ( मृत्यु शके ११३५ ) |

विठ्ठलपंत × रुक्मिणीबाई (आळंदीचे कुळकर्णी सिधोपंत यांची कन्या)

| | | | |
|---|---|---|---|
| निवृत्तिनाथ | ज्ञानेश्वरमहाराज | सोपानदेव | मुक्ताबाई |
| (जन्म शके ११९५) | (श. ११९७) | ( श. ११९९ ) | ( श. १२०१ ) |

१. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे पूर्वज पैठणापासून चार कोसांवर गोदावरीच्या उत्तरतीरीं असलेल्या आपेगांवचे कुळकर्णी होते. ही कुळकर्णीपणाची वृत्ति त्यांच्या पूर्वजांकडेस कित्येक पिढ्या चालत आलेली होती. हे माध्यंदिन शाखेचे देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण. ह्यांचें गोत्र पंचप्रवरान्वित वत्स हें होतें. ज्ञानेश्वरमहाराजांच्या पणज्यांचे पणजे हरिहरपंत कुळकर्णी हे शके १०६० च्या सुमारास आपेगांवचें कुळकर्ण पहात होते. हरिहरपंतांना तीन अपत्यें झालीं, त्यांपैकीं वडील मुलाचें नांव रामचंद्रपंत, धाकट्याचें केशवपंत, व मुलीचें मोहनाबाई असें होतें. केशवपंत मुंज झाल्यावर एक वर्षानेंच वारले. मोहनाबाई देवगडास नरहरपंत माचवे यांच्या पुत्रास दिल्या होत्या. रामचंद्रपंतांनीं बापाच्या पश्चात् कुळकर्णीपणाची वृत्ति चालविली व तेहि यथाकाल मृत्यु पावले. त्यांचे पुत्र गोपाळपंत हेंही वडिलांच्या कित्यानेंच चालत होते. गोपाळपंतांना त्र्यंबकपंत नांवाचा एकच मुलगा झाला. त्र्यंबकपंत हे ज्ञानेश्वरमहाराजांचे पणजे होत. हे मोठे कर्तबगारीचे निघाले व पुढें भगद्भक्त म्हणून निवडून आले. त्यांच्या चरित्राकडे आतां आपण वळूं.

२. **त्र्यंबकपंतांचें** मौंजीबंधन झाल्यावर त्यांनीं देवगडावर जाऊन वेदशास्त्रांचें अध्ययन केलें. त्यांचें पूर्ववय तत्कालीन देवगडकर जाधव राजाच्या सेवेंत गेलें व उत्तरवय श्रीगोरक्षनाथांच्या कृपेनें भगवच्चिंतनांत गेलें. त्यांनीं पांच वर्षें बीड देशाच्या देशाधिकाऱ्याचें काम केलें. शके ११२९ प्रभवनाम संवत्सर, चैत्र शुद्ध ५ इंदुवासर प्रातःकाळ घटि ११ ह्या वेळचें एक राजाज्ञापत्र भिंगारकरबुवांनीं छापलें आहे, त्यावरून असें दिसतें कीं, जैत्रपाळमहाराजांनीं 'दशसहस्र जाधव मुद्रिका उखित्या घ्यावयाचें ठरवून त्यांस बीड देशचे अधिकारी नेमलें' व त्यांस आज्ञा केली कीं, "प्रांत बीडदेशीं प्रतिवर्षीं क्षेत्रफळ उत्पन्न होईजेल तें तुम्हीं घेत जावें. सेवक, हत्ती, घोडे, उंट इत्यादिकांचा निर्वाह उत्तम करावा. श्रीराजाधिराज दयाळु होऊन अग्निहोत्री व गुणीजनांस अग्रहार क्षेत्रोत्पन्न दिन्हलें असेल त्यांस दुःख न होईल ऐसें वर्तावें. प्रजेचें पुत्राऐसें पालन करावें,

राजाज्ञेनें वरिष्ठ त्यांचें अनुसरण करावें. राजाज्ञेस सादर राहणें, विरोध न करणें" इ० ह्यानंतर वरील राजाज्ञेप्रमाणें त्र्यंबकपंतांनीं पांच वर्षें बीड देशाधिकाऱ्याचें काम केलें. ह्या पांच वर्षांपैकीं तीन वर्षें दुष्काळ पडून त्यांचें फार नुकसान झालें. पदरचे पैसे खर्चून त्यांनीं दुष्काळांत अनेकांचे प्राण वांचवून त्यांचा दुवा घेतला.

. ३. यांना गोविंदपंत व हरिपंत या नांवाचे दोन पुत्र होते, त्यांपैकीं गोविंदपंत हे घरीं राहून कुळकर्णपणाचें काम पहात असत. हरिपंतांनीं मर्दुमकी गाजवून बापाचें यश वाढविण्याची उमेद धरिली. शके ११३५ श्रीमुखनाम संवत्सर मार्गशीर्ष शुद्ध ७ गुरुवार ह्या दिवसाच्या देवगिरि-वराधिप सिंघणराज महाराजांच्या अज्ञापत्रावरून असें दिसतें कीं, देवगि-रीच्या दक्षिणेस दहा योजनांवर डोंगराळ मुलुखांत करंजे आडनांवाच्या देशमुखानें पुंडाई केली, 'राजसभेचा द्रोह संपादिला,' व तीन हजार लोक चाकरीस ठेवून वाटसरूंस लुटण्याचा क्रम आरंभिला; तेव्हां त्यास शासन करण्याकरितां सिंघणराजांनीं जसवंतसिंग व हरिपंत 'सेनानायक' यांस पायदळ ५०००, अश्वरोहक २०००, हत्ती १००, उंट ५००, लुंठकजेठी १०००, भेरीकाहलादि रणवाद्य वाजविणारे ४००, सेवक-जन १०००, हतियारे ऐसा शस्त्रांसह दळभार देऊन पाठविले, दळ-निर्वाहार्थ दोन लक्ष जाधवमुद्रिका दिल्या, व 'डोंगर आघाडमुखीं सैनि-कांसह राहणें; शत्रूंस पृष्ठभाग दाखवितां कामा नये, रिपुपराजय करणें, निकरें झुंज करावें, श्रीचे कृपें हिंवसा पूर्ण होईल' अशी आज्ञा केली. ह्याप्रमाणें 'हरिपंत पिते त्र्यंबकपंत कुळकर्णी सेनानायक' हे त्या पुंड देशमुखावर चालून गेले, पण त्या शूराशीं युद्ध करीत असतां धारातीर्थीं पतन पावले. होतकरू पुत्राचा नाश झालेला पाहून त्र्यंबकपंत उदास झाले व परत आपेगांवीं येऊन राहिले. राजसेवा व कुटुंबभरण ह्यांत आयुष्य व्यर्थ गेल्याचा त्यांस पश्चात्ताप झाला व उत्तरवय तरी हरि-चरणीं रंगून सार्थकीं लागावें अशी त्यांस उपरति झाली. पूर्वभाग्ययोगानें

गोरक्षनाथांची स्वारी तीर्थाटन करीत आपेगांवीं आली. त्र्यंबकपंतांनीं त्या महात्म्याच्या पायावर लोटांगण घातलें व त्यांनीं त्यावर अनुग्रह केला. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वंशांत भगवद्भक्त या नात्यानें त्र्यंबकपंत हा त्यांचा मूळपुरुष होय. नामदेवरायांनीं मुक्ताबाईच्या समाधीच्या अभंगांत "भक्त त्र्यंबकपंत मूळपुरुष आधी। तयाची समाधी आपेगांवीं" असें म्हटलें आहे. आपेगांवीं त्र्यंबकपंतांची समाध आहे.

४. त्र्यंबकपंतांचे ज्येष्ठ पुत्र गोविंदपंत ह्यास त्यांची भार्या निराबाई यांजपासून वयाच्या ५५ व्या वर्षीं एक पुत्र झाला. त्याचें नांव विठ्ठलपंत हें होय. हेच **विठ्ठलपंत** ज्ञानेश्वरमहाराजांचे जनक होत. निराबाई ह्या पैठणकर कृष्णाजीपंत देवकुळे यांच्या भगिनी होत. या देवकुळ्यांचें घराणें अद्याप पैठणास आहे. वेदमाता जी गायत्री तिच्या पुरश्चरणानें गोविंद-पंतांस विठ्ठलपंत झाले ( 'श्रीवेदमातुः सुतं' ) असें पैठणकर ब्राम्हणांनीं ज्ञानेश्वरमहाराजांस पुढें जें शुद्धिपत्र दिलें त्यांत म्हटलें आहे. विठ्ठलपंत हे बाळपणापासूनच वैराग्यशील होते. गोविंदपंत व निराबाई ह्या उभयतांस गोरक्षनाथांचे शिष्य गैनीनाथ यांजपासून ब्रह्मोपदेश झाला होता. गैनी-नाथांनीं आपल्या झोळींतून रक्षा काढून ती पाण्यांत टाकून घेण्यास निरा-बाईस सांगितलें. त्यांच्या प्रसादानें निराबाईस गर्भ राहिला. 'श्रीज्ञाने-श्वरांची आदि 'या ग्रंथांत नामदेव म्हणतातः—

**बैसलीं दोघे भ्रतारवल्लभें । उदरींच्या गर्भें सेवी ध्यान ॥ १ ॥**
**भक्तिनवमास भरले पूर्ण दिवस । आलें वैराग्य डोळस मूर्तिमंत २**
**विठ्ठल आवडीं ठेवियेलें नाम । निराईस प्रेम गैनीनाथीं ॥ ३ ॥**

विठ्ठलपंत हे 'मूर्तिमंत वैराग्य' जन्मास आले असें नामदेवराय म्हण-तात. तें वैराग्यही अंधळें नव्हे तर डोळस होतें. 'डोळस' वैराग्य म्हणजे सविवेक वैराग्य. विवेकयुक्त वैराग्यच खरें वैराग्य होय व तेंच कायम टिकतें. ज्ञानावांचून वैराग्य केवळ अंधळें होय. विठ्ठलपंत हे विवेक-वैराग्य सवें घेऊनच जन्मास आले. सातव्या वर्षीं विठ्ठलाचा व्रतबंध

झाला व त्यास गायत्रीचा उपदेश मिळाला. यानंतर पैठणास मातुलगृहीं त्यानें ‘ केलें वेदपठण काव्य आणि व्याकरण । झालासे निपुण शास्त्रवक्ता ॥ १ ॥ ’ विठ्ठलपंतांचें अल्पकाळांतच वेदशास्त्राध्ययन पूर्ण झालें, तेव्हां तीर्थाटन करण्यास त्यांनीं वडिलांची आज्ञा घेतली.

५. ज्ञानानें डोळे उघडले असल्यामुळें तीर्थयात्रेचें सुख भोगण्याचे व मार्गांत जे संतमहंत भेटतील त्यांच्या सहवासानें ज्ञान अंगीं मुरविण्याचें सामर्थ्य त्यांस प्राप्त झालें होतेंच. शास्त्राध्ययनाला तीर्थाटनाची जोड देण्याची पद्धत प्राचीन कालापासून चालत आलेली आहे. पावलोपावलीं. हरिचिंतन करीत विठ्ठलपंत तीर्थयात्रा करूं लागले. प्रथम ते मुमुक्षूंची विश्रांति जी श्रीकृष्णमूर्ति तिच्या दर्शनास द्वारकेस गेले व तेथून ते पिंडारकास गेले. तेथून त्यांनीं सुदामपुरी ( पोरबंदर ) पाहून जेथें रुक्मिणीचा विवाह झाला तें मूळमाधव तीर्थ पाहिलें. तेथून श्रीकृष्णांनीं आपलें अवतारकृत्य जेथें संपविलें त्या भालुकातीर्थास ते गेले. आणि तेथून प्रभास, ( सोरटी सोमनाथ ), मुचकुंदगुंफा इत्यादि तीर्थें करीत करीत ते नाशिक जिल्ह्यांतील सप्तशृंगीस गेले. पुढें त्र्यंबकेश्वरीं जाऊन त्यांनीं कुशावर्तीं स्नान केलें व गंगाद्वार वंदून ब्रह्मगिरीला सव्य प्रदक्षिणा घातली. त्र्यंबकेश्वरीं असतांना पुढें आपला मुलगा भागवतधर्माची गुढी उभारून याच ठिकाणीं समाधि घेण्यास येईल हें विठ्ठलपंतांस त्या वेळीं कळलें नसेल, पण ह्या भक्तकुळांतील भावि दीपकाचें भावि चरित्र—त्रिकालांतील सर्व गोष्टी आपल्या त्रिनेत्रांनीं पाहणाऱ्या श्रीत्र्यंबकेश्वरास समजून मोठा आनंद झाला असेल ! मला वाटतें विवेकवैराग्यानें निर्मळ झालेली विठ्ठलपंतांची हृदयवृत्ति पाहून त्र्यंबकेश्वराची प्रेमवृत्ति उचंबळली व त्यांनींच त्यांच्या पोटीं जन्म घेण्याचा निश्चय केला आणि त्यांच्या आयुष्यक्रमाचा नकाशा पुढें वर्णन केल्याप्रमाणें रेखाटून टाकला. असो. पदोपदीं नामघोष करीत

१ म्हणोनि अनुताप धरोनियां मना । विठोबा चालिला तीर्थाटणा । मायाममता टाकूनि जाणा । हरिभजनीं विनटला ॥ २३ ॥

—भक्तिविजय अ० ८.

विठ्ठलपंतांची स्वारी भीमाशंकराहून अलंकापुरीस म्ह० आळंदीस येऊन दाखल झाली.

६. विठ्ठलपंतांचें पाऊल ज्या क्षणीं इंद्रायणीच्या तीरावर पडलें त्या क्षणाच्या पोटींत भविष्यकाळच्या किती तरी गोष्टी सांठविल्या होत्या ! अनेक तीर्थक्षेत्रें हिंडून सहजगत्या हा ब्राह्मण आळंदीस हें प्राचीन क्षेत्र म्हणून आलेला, पण याचा विवाहसंबंध तेथल्या कुळकर्ण्याच्या कन्येशीं व्हायचा, याला काळांतरानें तीव्र वैराग्य प्राप्त होऊन तो बायको टाकून जायचा, काशीस रामानंदस्वामींचा त्यावर अनुग्रह व्हायचा, चैतन्याश्रम हें नांव घेऊन तो संन्यासदीक्षा घ्यायचा, रामानंदस्वामी काशीहून तीर्थयात्रेस निघायचे, त्यांचा मुक्काम आळंदीस होऊन अश्वत्थप्रदक्षणा घालणाऱ्या विठ्ठलपत्नीस 'पुत्रवती हो' असा त्यांनीं आशीर्वाद द्यायचा, खरी गोष्ट कळल्यावर चैतन्याश्रमस्वामीवर गृहाश्रमस्वामी होण्याचा प्रसंग यायचा, शास्त्रोल्लंघन झाल्याबद्दल त्याचा छळ व्हायचा, ह्या संन्याश्याच्या पोटीं निवृत्तिज्ञानदेवसोपानमुक्ताबाईसारखीं अलौकिक रत्नें निपजायचीं, त्यांनीं भागवतधर्माचा डांगोरा पिटून जग भक्तिमार्गास लावायचें, संन्यासीपुत्र अशा ज्ञानेश्वरांच्या हातून ज्ञानेश्वरी-अमृतानुभवांसारखे अनुपम ग्रंथ निर्माण व्हायचे, नामदेवादि सर्वजातीय संत त्यांना मिळून भक्तिपंथाचा जयजयकार महाराष्ट्रभर व्हायचा, एकनाथतुकारामादि संतांनीं ज्ञानेश्वरांचा भक्तिमार्ग जोरानें पुढें चालवायचा व त्या कल्पवृक्षाच्या सुखशीतल छायेखालीं तुम्हां-आम्हांसारख्या लक्षावधि जीवांना स्वोद्धाराचा मार्ग सांपडायचा ! ही कारणपरंपरा यदृच्छेनें उत्पन्न झालेली नसून त्या जगच्चालक परमात्म्याच्या इच्छाबलानें ती चालली आहे असें मानणें प्राप्त होतें ! ! ईश्वरी सत्तेनेंच विठ्ठलपंतांचें पाऊल आळंदीच्या परिसरांत पडलें व त्या पावलावर पाऊल देऊन मागील कारणपरंपरा मोठ्या वेगानें दौडत पुढें चालली ! मागचा तरंग पुढच्या तरंगाला रेटीत येतो त्याप्रमाणें मागचें कारण पुढच्या कार-

णाला कार्य रूपत्व देत व आपण स्वतः मागच्या कारणाचें कार्य होत प्रवाहरूपानें चाललें आहे.

७. विठ्ठलपंत आळंदीस येऊन श्रीसिद्धेश्वरांच्या देवळांत उतरले. आळंदीचे कुळकर्णी त्रिप्रवरी वासिष्ठगोत्री सिधोपंत हे सदाचारी व ज्ञानीपुरुष होते. त्यांचें उत्पन्न चांगलें असून ते चोवीस गांवचे कुळकर्णी होते; त्यांची भार्या उमाबाई ही धर्मानुकूल असून त्यांचा गृहाश्रम उत्तम प्रकारें चालला होता. निरंजनमाधव म्हणतातः—

**सदाचारनिष्ठां करी अग्निहोत्रा । सदा मान्य जो विप्रधुर्यां पवित्रां ॥**
**स्वधर्मासि तो नित्य पाळोनि राहे । महा ज्ञानसंपन्न चिद्वस्तु पाहे ॥**
**घरीं सुंदरी धर्ममार्गानुकूला । पतीच्या मनासारिखी पुण्यशीला ॥**
**असे दिव्यदांपत्य धर्मी विराजे । सदाभ्यागता पूजितीं भक्तिभोजें ॥**

—ज्ञानेश्वरविजय अ० १ ( २७–२८ )

अशा त्या परोपकारी व अतिथिसत्कारांत नित्य तत्पर असलेल्या दांपत्यास एक उपवर कन्या होती. तिला वर शोधण्यांत सिधोपंत गुंतले होते. त्यांना विद्वान्, सदाचारी व भगवद्भक्त असा जांवई पाहिजे होता. विठ्ठलपंतांचें वय बेताचें असून ज्ञानवैराग्यबलाचें तेज त्यांच्या अंगावर फांकलें होतें. ते आळंदीस नित्याप्रमाणें स्नानसंध्यादेवपूजादि कर्में सारून तिसऱ्या प्रहरां उपनिषद्भाष्यादि पाहत बसत. सिधोपंतांनीं आपल्या गांवांत आलेल्या ह्या पांथस्थाची चालचर्या पाहिली, व त्याच्या कुलशीलाची त्याच्यापाशीं चौकशी केली तेव्हां तो त्यांच्या पूर्ण पसंतीस उतरला. घर चालून आलेला हा सुशील तरुण आपला जांवई करून घ्यावा असें त्यांच्या मनांत भरलें. पण तो पडला हाडाचा कुळकर्णी! पूर्ण परीक्षा होण्यास हा पंधरा दिवस आपल्या घरीं राहिला पाहिजे असा मनाशीं कयास बांधून त्यानें त्यास सन्मानानें आपल्या घरीं राहण्यास नेलें व पारखून घेतलें. "घरीं पूजिला ठेविला दीस कांहीं। तदा पाहिली रम्यचर्या तयांहीं" असें निरंजनमाधव म्हणतात. सिधोपंतास तोच ध्यास लागल्यामुळें म्हणा किंवा ईश्वरेच्छेनें म्हणा पण दृष्टांतही झाला कीं 'तूं आपली मुलगी ह्याच वराला दे

म्हणजे हिच्या पोटीं दिव्य प्रजा निपजून ती तुझ्या कुळाचा उद्धार करील.' दुसऱ्या दिवशीं चार शिष्ट बोलावून आणून त्यांच्या देखत सिधोपंतानें विठ्ठलपंताजवळ लग्नाची गोष्ट काढली व आपल्यास झालेला दृष्टांतही सांगितला. तें ऐकून विठ्ठलपंतांनीं हांसून उत्तर केलें कीं 'वडिलमातुश्री आपेगांवीं आहेत. मी तीर्थयात्रेच्या निमित्तानें साधुसंतांच्या गांठी घेण्यास बाहेर पडलों आहे. मला अजून रामेश्वरापर्यंत दक्षिणयात्रा करून यावयाचें आहे. शिवाय मला विवाह करण्याची अद्याप आज्ञाही झाली नाहीं.' हें उत्तर ऐकून सिधोपंत स्वस्थ बसले; पण मौज अशी झाली कीं, त्याच रात्रीं विठ्ठलपंत तुळशीवृंदावनावर निजले असतांना श्रीविठ्ठलानें त्यांस स्वप्नांत दर्शन देऊन सांगितलें कीं "तूं या वधूचा स्वीकार कर; इच्या उदरीं देव जन्म घेऊन येतील व तुझ्या कुळाचा आणि विश्वाचा उद्धार करितील. हा भाग तुझा नेमला आहे व तूंच तिचा अंगिकार केला पाहिजेस!" हें स्वप्न विठ्ठलपंतांनींही सरळ भावानें सिधोपंतांस सांगितलें. त्यांना तर तें ऐकून फारच आनंद झाला. ही ईश्वरी इच्छाच आहे असें मानून दोन्ही पक्ष लग्नास सिद्ध झाले. घटित छत्तीस गुण उतरले. लग्नमुहूर्त ज्येष्ठांतला शेवटलाच उरलेला असून आपेगांवाहून मातापितरांस आणवण्यापुरतीही सवड नव्हती. सिधोपंतांनीं थाटानें लग्नसमारंभ केला व सालंकृत कन्यादान केलें. मनासारखा जांवई मिळाल्याबद्दल सासूसासऱ्यांस धन्यता वाटली.

८. लग्नसमारंभ आटोपल्यानंतर आषाढी जवळ आल्याचें पाहून विठ्ठलपंतांनीं पंढरीस जाण्याचा आपला मनोदय सांगितला. तो ऐकून सिधोपंत कुटुंबांतील माणसें बरोबर घेऊन आपणही जांवयाच्या समागमानें निघाले. 'चालतां सुपंथीं हृदयीं विठ्ठलमूर्ति। मुखीं नामकीर्ति गात चाले.' हें विठ्ठलपंताचें प्रेम पाहून सिधोपंतांस समाधान वाटलें व ते पंढरीस पोंचले तेव्हां कन्याजामातांस त्यांनीं श्रीविठ्ठलाच्या पायांवर घातलें. स्वानंदपूर्ण असा चार दिवस तेथील कीर्तनसोहळा अनुभवून सिधोपंत

आळंदीस माघारीं फिरले, व त्यांची आज्ञा घेऊन विठ्ठलपंत दक्षिणयात्रेस निघाले. ते कृष्णा कावेरी तुंगभद्रा यांचीं स्नानें करून व श्रीशैल, वेंकटाद्रि, रामेश्वर, शिवकांचीविष्णुकांची, गोकर्णहटकेश्वर, कोल्हापूर, कऱ्हाड, माहुली इत्यादि क्षेत्रें फिरून परत आळंदीस आले व सिधोपंतांनीं त्यांचें सप्रेम स्वागत केलें.

९. चार दिवस आळंदीस राहून विठ्ठलपंत मातापितरांच्या दर्शनास उत्सुक होऊन निघाले. सिधोपंतांसही आपल्या व्याह्याची भेट घेण्याची इच्छा होऊन तेही कन्येसह बरोबर निघाले. बहुत दिवसांनीं मुलगा परत आलेला पाहून विठ्ठलपंतांच्या मातापितरांस फार आनंद झाला व त्यांतही तो सपत्नीक आलेला पाहून दुधांत साखर पडल्यासारखें झालें. व्याह्या-व्याह्यांचेही नमस्कार चमत्कार झाले. सिधोपंत वस्त्रालंकार देऊन स्वग्रामीं गेले. इकडे कांहीं काळ पुत्रस्नुषेचें सुख पाहून वृद्ध गोविंदपंत व निराबाई हीं निवर्तलीं. विठ्ठलपंत संसार आनंदानें करूं लागले. आनंदानें म्हणजे निश्चिंतपणानें. “संसाराची चिंता नाहीं विठ्ठलासी। अखंड वृत्तीसी समाधान ॥ १ ॥” पण ही नैराश्यता रुक्मिणबाईला तेव्हां तितकी मानवली नाहींसें दिसतें. नवरा संसारांत विरक्त आहे व नित्य हरिचिंतनांत निमग्न असतो ही गोष्ट तिनें बापास कळविली, सिधोपंत स्वतः आपेगांवास आले व प्रेमाची विनंति करून विठ्ठलरुक्मिणीस घेऊन ते आळंदीस जाऊन राहिले. विठ्ठलपंतांचा तेथील आयुष्यक्रम नामदेवराय सांगतातः—

**येउनि अळंकापुरीं केला क्षेत्रवास। देऊनी चित्तास समाधान ॥१॥**
**नित्य हरिकथा नामसंकीर्तन। संतांचें दरुशन सर्वकाळ ॥ २ ॥**
**पंढरीची वारी आषाढी कार्तिकी। विठ्ठल एकाएकीं सुखरूप ॥३॥**

निरंजन माधवही सांगतातः—

**यदृच्छालाभें जो परम सहजानंदभरितें**
**सदा योगाभ्यासीं हरिगुरुपदीं मानस रते।**
**मुखीं चाले ‘नारायण हरि’ अशी नामलतिका**
**यथान्यायें कालक्षपण करणें भाव इतुका ॥ २-१४ ॥**

असा कांहीं काळ क्रमिल्यावर अपत्यसंभव दिसेनासा वाटला तेव्हां विठ्ठलपंतांनीं रुक्मिणीबाईच्या मागें टुमणें लाविलें कीं 'मला काशीस जाऊन राहण्याची इच्छा आहे तरी संन्यास घेण्याची आज्ञा दे.' रुक्मिणीबाई पतीचें वैराग्य पाहून सावध होत्या व सिधोपंताकडून त्यास 'संततीवांचूनी न घ्यावा संन्यास' असें त्यानीं सांगविलें तरी एकदां त्या दुश्चित असतां 'मी गंगेस स्नानास जातों' असें विठ्ठलपंतांनीं विचारतां त्या 'जा जा म्हणून सहज म्हणाल्या!' तीच पडत्या फळाची आज्ञा मानून विठ्ठलपंत घराबाहेर पडले ते तडक काशीस जाऊन पोहोंचले.

१०. महिपतबावांनीं भक्तविजयांत (अ० ८) म्हटल्याप्रमाणें 'जैसा गारोड्यापासूनि नाग सुटला। अरण्यवारुळीं प्रवेशला। कीं पिंजऱ्यांतूनि रावा उडाला। जाऊनि बैसला वृक्षावरी ॥ ११० ॥ ह्याप्रकारचें समाधान विठ्ठलपंतांस वाटलें. प्रयागास माघस्नान करून ते काशीस गेले. तेथें रामानंद स्वामींकडून त्यांनीं अनुग्रह घेतला. व 'मी एकटा आहें व मला दारापुत्रादिपाश नसून अनुतापासरिसा मी स्वामीस शरण आलों आहें असें त्यांस खोटेंच सांगून दिलें! यांचें वैराग्य खरें आहे हें पाहून स्वामींनीं त्यांस मंत्रदीक्षा देऊन संन्यास दिला. हे रामानंद स्वामी त्या वेळीं काशींत प्रख्यात होते व यांचे शेंकडों शिष्य होते. कबीरमहाराजही यांचेच शिष्य होते असें म्हणतात.

११. असो. विठ्ठलपंतांनीं काशीस जाऊन संन्यास घेतला ही बातमी कर्णोपकर्णीं रुक्मिणीबाईच्या कानावर येऊन आदळली. तेव्हां त्यांना आपला संसार संपला असें वाटून फार दुःख झालें. तरी अहोरात्र दुःखच करीत न बसतां त्यांनीं आपल्या जन्माचें सार्थक करण्याचा निराळा मार्ग धरिला. त्यांनीं उषःकालीं उठून इंद्रायणीचें स्नान करावें, मध्यान्ह कालपर्यंत अश्वत्थाला प्रदक्षिणा घालाव्या, मुखानें नामजप चालवावा, एकवेणी व एकभुक्त रहावें, लौकिकवार्ता ऐकूं नये व बोलूं नये, व ह्याप्रमाणें अहोरात्र आपला देह भगवत्प्रीत्यर्थ झिजवावा. ह्याप्रमाणें बारा वर्षे, त्यांनीं

'उग्र अनुष्ठान' केलें. आधींचीच भूमि शुद्ध होती, त्यांत अशा तीव्रतर वैराग्यानें त्यांची काया लखलखित झाली. त्या महासतीचें हें अनुष्ठान निष्काम बुद्धीनें चाललें होतें तरी त्यांची ही सेवा हरीच्या घरीं रुजु झालीच.

१२. एके दिवशीं असें झालें कीं, रामानंद स्वामी हे बरोबर शेंपन्नास शिष्य घेऊन रामेश्वराच्या यात्रेस निघाले असतांना त्यांचा मुक्काम वाटेंत आळंदीस पडला. यतीचा मुक्काम आळंदीस कसा झाला ? ह्या शंकेस निरंजन माधवांनीं उत्तर केलें आहे—

**यती ओढिला सत्य ईच्या तपानें ।**
**अकस्मात अश्वत्थनारायणानें ॥**

ते मारुतीच्या देवळांत उतरले होते. रुक्मिणीबाई नित्याप्रमाणें सायंकाळीं श्रीमारुतिरायाच्या दर्शनास आल्या. देवदर्शन झाल्यानंतर तेथें रामानंदस्वामीस पाहून व हे कोणी महात्मे आहेत असें जाणून त्यांनीं त्यांस वंदन केलें. स्वामींनीं भगवत् प्रेरणेनुसार ' पुत्रवती भव ' असा आशीर्वाद दिला. तो ऐकतांच रुक्मिणीबाईस हंसूं आलें. स्वामींनीं हंसण्याचें कारण विचारलें. ' पतींनीं काशीस जाऊन संन्यास घेतला आहे तेव्हां आपल्या आशीर्वादास सत्यता कशी यावी ? असा विचार मनांत येऊन मला हंसूं आलें असें त्या सतीनें सांगितलें. स्वामींनीं सविस्तर हकीकत विचारली व ती ऐकतांच कालमर्यादा व शरीरावरच्या खाणाखुणा यांचा पडताळा स्वामींनीं आपल्या मनाशीं पाहिला तोंच त्यांच्या लक्षांत आलें कीं ' चैतन्याश्रमांचें हें कुटुंब दिसतें!' स्वामी मनीं दचकले. 'बाई ! तुमच्या घरीं कोण आहे ?' म्हणून स्वामींनीं रुक्मिणीबाईस विचारलें. तेव्हां ' घरीं आईबाप आहेत ' म्हणून त्यांनीं सांगितलें. स्वामी लगेच सिधोपंतांच्या घरीं गेले. सिधोपंतांनीं त्यांची सद्भावानें अर्घ्यपाद्यपूजा केली व त्यांस भोजनास ठेवून घेतलें. पतीची सुखरूपता ऐकून त्या माउलीस अत्यंत समाधान वाटलें. "तरुण स्त्री संतानहीन । टाकून करिती संन्यासग्रहण । तरी गुरुशिष्य दोघांकारण । शास्त्री दंड बोलिलें " ( भक्तविजय अ० ८—१४१ ) हें ध्यानांत येऊन

स्वामी सचिंत झाले. सिधोपंतांनीं कारण विचारतांच 'श्रीपाद म्हणती इच्या दोषास्तव । माझें पुण्य सर्व लया जातें ! ॥ १ ॥ असो. स्वामींनीं रामेश्वरयात्रेचा संकल्प सोडला व ते परत काशीस गेले. सिधोपंतही आपलें कुटुंब व कन्या घेऊन त्यांबरोबर काशीस गेले. त्यांना निराळ्या घरीं ठेवून स्वामी आपल्या मठांत गेले. स्वामी लवकर परत आले याचें आश्चर्य करीत चैतन्याश्रम उभे होते तोंच स्वामींनीं 'चैतन्या ! तुझी खरी हकीकत सांग; मी आळंदीहून परत फिरलों आहें' असें जरा उग्र स्वरानें विचारलें. आळंदीचें नांव ऐकतांच चैतन्याश्रम चपापले व त्यांनीं सर्व वृत्तांत सांगून स्वामींचे पाय धरिले. इतक्यांत सिधोपंत कन्येसह तेथें आले. नामदेव 'आदि' ग्रंथांत म्हणतातः—

**उठवुनि श्रीपादें दिधलें आश्वासन ।**
**" म्हणती करीं ग्रहण इचें आतां ॥ १ ॥**
**अविधी कर्माचें न धरावें भय ।**
**यासी आहे साह्य जगदीश ॥ २ ॥**
**स्वदेशा जाऊनी करावा आश्रम ।**
**सुखरूप स्वधर्म चालवावा " ॥ ३ ॥**
**श्रीपादें मस्तकीं हात ठेवियेला ।**
**निरोप दीधला चैतन्यासी ॥ ४ ॥**

गुरुवाक्यानुसार स्वस्त्रीचा अंगीकार करून चैतन्याश्रम पुन्हां गृहाश्रमी झाले, आणि विठ्ठलपंत व रुक्मिणी यांस घेऊन सिधोपंत आळंदीस आले.

१३. विठ्ठलपंत पुन्हां गृहाश्रमी झाले तेव्हांपासून त्यांच्या निंदाछलास साहजिकरीतीनें प्रारंभ झाला. नामदेवरायांनीं म्हटल्याप्रमाणें 'द्विजीं वाळियेलें जगीं सांडियेले । शेखीं उपेक्षिले आप्तवर्गीं' ॥ १ ॥ विठ्ठल-पंतांच्या गृहाश्रमाची ही द्वितीयावृत्ति पिशुनजनांच्या निंदेचा मुख्य विषयच होऊन बसली. 'संन्यासी झाला असून हा पुन्हां गृहाचारी कसा झाला' असा ज्याचा त्याचा प्रश्न निघूं लागला. कोणीं विठ्ठलपंताला विषयलंपट म्हणूं लागले, कोणी रामानंदस्वामीला निंदूं लागले, आणि

कोणी रुक्मिणीबाईला नांवें ठेवूं लागले. ह्याप्रमाणें बारा घरचीं बारा तोंडें बारा प्रकारें बोलूं लागलीं ! विठ्ठलपंतांचें वैराग्य, धैर्य, समता, व ज्ञान कसोटीला लागावयाचें होतें. भगवद्गीतेच्या बाराव्या अध्यायांत 'अद्वेष्टा सर्वभूतानां,' 'समदुःखसुखः क्षमी,' 'अनपेक्षः शुचिर्दक्षः,' 'यो न हृष्यति न द्वेष्टि,' 'तुल्यनिंदास्तुतिर्मौनी,' इत्यादि गुणांनीं युक्त असलेला पुरुष 'स मे प्रियः, तो मला प्रिय आहे, असें भगवंतांनीं स्वमुखानें सांगितलें आहे. ह्या गुणांत, ह्या विषयांत जो परीक्षेला उत्तम प्रकारें उतरेल त्यालाच देव आपल्या भक्तवर्गांत ओढून घेणार. ही परिक्षा देण्याला उमेदवारच आधीं कोणी नसतात, कोणी उभे राहिलेच तर फारसे शेवटपर्यंत टिकत नाहींत! खरे भक्त वरील प्रसंगाला डरत नाहींत, किंबहुना आपल्यास कस लागावा अशीही ते इच्छा करितात. देह प्रारब्धाच्या माथीं ठेवून बरेवाईट प्रसंग येतील ते आनंदानें सोसून भक्त आत्मानुसंधान अखंड ठेवतात. विठ्ठलपंत ह्या कठिण कसाला लागले व उतरले हें निराळें सांगणें नकोच. महिपतिबावा भक्तविजयांत (अ० ८) लिहितातः—

**जननिंदेचे येतां लोट । शांति उदरीं भरी दाट ।**
**कामक्रोधाची मोडिली वाट । करणी अचाट निरुपम ॥**
**द्विजीं घातलें वाळींत । आप्तवर्गीं सांडिलें त्वरित ।**
**खोंपट बांधोनि अरण्यांत । कांतेसहित राहिला ॥ १८१ ॥**
**कुटुंबपोषणाकारणें । भिक्षा मागून आणी कण ।**
**रात्रंदिवस नामस्मरण । नाहीं खंडण क्षणमात्र ॥ १८२ ॥**
**गीताभागवतश्रवणमनन । अखंड चित्तीं समाधान ।**
**ऐशीं द्वादश वर्षें लोटतां जाण । पोटीं संतान जाहलें ॥१८३॥**

निरंजनमाधवही सांगतातः—

**चैतन्याश्रम हा गृहाश्रम करी–हें ऐकिलें ब्राह्मणीं**
**केला त्याग तया कुळासि सकळीं त्या सौहृदांच्या गणीं ।**
**कोणी दर्शनही कदापि न करी, वंदील तैं कोणता ?**
**याच्या पाहुनि लोकनिंदित पथा मानी कसा जाणता ? ॥ ५६ ॥**

**झालां कीं उपहास फारचि जनीं भिक्षा मिळेना तदा**
**पाला भक्षुनि वृक्षसंभव कधीं तोयाशनें एकदा ।**
**भक्षी वायु कधीं कधीं करतळीं भिक्षान्न भक्षोनियां ।**
**ऐसा द्वादश वर्ष काळ क्रमिला माया न चित्तीं तया ॥ ५७ ॥**

१४. संन्यास घेतल्यानंतर पुन्हां गृहस्थाश्रमाचा स्वीकार करणें शास्त्रसंमत नसल्यामुळें लोकांनीं विठ्ठलपंताचा छळ केला हें अगदीं साहजिकच झालें. यांत लोकांना नांवें ठेवावयाला जागा नाहीं व विठ्ठलपंतांनाही दोष देणें कठिण आहे. 'तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते' ही देवाची आज्ञा असल्यामुळें कोणीही शास्त्रविरुद्ध वागूं लागल्यास त्याविरुद्ध गिल्ला करणें हें लोकांचें कर्तव्यच आहे, व तें त्यांनीं बजाविल्याबद्दल त्यांना दोष देतां येत नाहीं. आतां कांहीं व्यक्ति स्वभावधर्मानुरूप जास्त कडकपणानें वागल्या असतील, पण त्रिगुणात्मक लोकव्यवहारांत असे प्रकार व्हायचेच. बरें इकडे विठ्ठलपंतांकडे पाहिलें तरी केवळ गुर्वाज्ञापालन करणें हाच आपला स्वधर्म म्हणूनच ते पुन्हां प्रपंचांत पडले असल्यामुळें त्यांनाही तसा दोष देतां येत नाहीं. ते विषयलंपटपणामुळें कांहीं पुन्हां संसारी बनले नव्हते, उलट तीव्र वैराग्यामुळेंच त्यांना प्रथम घर सोडून जायचा मोह झाला होता. विठ्ठलपंतांना किंवा विठ्ठलपंतांच्या छलकांना जसा फारसा दोष देतां येत नाहीं तसा रामानंदस्वामींनाही दोष लावतां येत नाहीं. 'मला स्त्रीपुत्रादि कोणी नाहींत' असें खोटेंच सांगून संन्यास घेतलेल्या आपल्या शिष्याला त्या खोटें बोलण्याचें प्रायश्चित्त म्हणूनच त्यांना अशी शास्त्रविरुद्ध आज्ञा द्यावी लागली ! संतति झाल्यावर पत्नीच्या संमतीनें पतीनें संन्यास घ्यावा हा शास्त्रनिर्बंध त्यांनीं झुगारून दिल्यामुळें म्हणजे अकालीं संन्यास घेण्याची घाई केल्यामुळें अगदीं वृद्धावस्थेपर्यंत त्यांना गृहाश्रम पाळावा लागला ! ! असो. झालें तें सर्व योग्यच झालें. आणखी एक विचार करण्याची गोष्ट आहे. निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपानदेव व मुक्ताबाई यांच्यासारख्या उपजत ज्ञात्यांना जन्म घेण्यास योग्य अशी भूमिका पाहिजे होती. हे आपणांस योग्य अशी

मातापितरें पाहत होते, अशी कल्पना केल्यास विठ्ठलपंतांसारखा विवेक-वैराग्यशील पिता व बारा वर्षे तीव्रानुष्ठान केल्यामुळें निष्कलंक झालेली रुक्मिणीबाईसारखी माता त्यांना दुसरी कोठें आढळली असती ? मला तर वाटतें कीं, विठ्ठलपंतांना अकालीं संन्यास घेण्याची बुद्धि झाल्यामुळें रुक्मिणीबाईंना बारा वर्षे घोर तपश्चर्या करण्याची संधि मिळाली व पति-पत्नी ह्याप्रमाणें विवेक, वैराग्य, तप व भगवत्प्रेम ह्या गुणांनीं युक्त होतांच ज्ञानेश्वरादि ब्रह्मनिष्ठ हे त्यांच्या उदरास आले ! हे आपणायोग्य आईबाप शोधीत होते, ते त्यांना कोठें आढळले नाहींत; तेव्हां विठ्ठलरुक्मिणींना तीव्र तपाची संधि देऊन ते दोघे परमपावन झाले असें पाहतांच त्यांनीं त्यांच्या उदरीं जन्म घेतले. शास्त्राज्ञा आम्हां मानवांना पाळल्याच पाहि-जेत. त्या आम्ही न पाळूं तर पतन पावूं; पण वेद, शास्त्रें व पुराणें ज्याच्या गुणांचे भाट होऊन राहिले आहेत त्या विश्वात्म्याला किंवा त्याचा निरोप घेऊन येणाऱ्या महात्म्यांना आमच्यासारखेच शास्त्रनिर्बंध प्रति-बंधक होतील असें मानणें सर्वथा अयोग्य होईल. ह्या बाजूनें विचार करितां ज्ञानेश्वरमहाराजांनीं संन्याश्याच्या पोटीं जन्म कां घेतला हें समजतें, आणि सकळकामनात्यागरूप जो संन्यास त्याच्याच पोटीं ज्ञानानें उपजावें ! हेंही युक्त आहे. असो. ' शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते '। ' अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ' ( गीता अ० ६–४१–४२ ) ह्यावर ज्ञानेश्वरमहाराजांनीं पुढें जें भाष्य केलें तें पाहतांना त्या प्रसंगीं महाराज आत्मचरित्रापैकीं वरील भागाचेंच उद्घाटन करीत आहेत असें मला वाटलें ! योगभ्रष्ट महात्मा हा दैवी संपत्तीनें श्रीमंत अथवा ' मोक्षश्रिया अलंकृत ' अशा पवित्र घराण्यांत निष्पाप आईबापांच्या पोटींच जन्म घेतो, हें सांग-तांना महाराज म्हणतातः—

**जयातें नीतिपंथें चालिजे । सत्यधूत बोलिजे ।**
**देखावें तें देखिजे । शास्त्रदृष्टी ॥ ४४५ ॥**
**वेद तो जागेश्वरू । जया व्यवसाय निजाचारू ।**
**सारासारविचारू । मंत्री जया ॥ ४४६ ॥**

**जयाच्या कुळीं चिंता । जाली ईश्वराची पतिव्रता ।**
**जयातें ग्रहदेवता- । आदि ऋद्धि ॥ ४४७ ॥**
**ऐशी निजपुण्याची जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी**
**तिये जन्मे तो सुरवाडी । योगच्युत ॥ ४४८ ॥**

जे नीतिपंथानें चालतात, सत्यधूत बोलतात, शास्त्राज्ञेच्या डोळ्यानें दिसेल तेवढेंच पाहतात, ज्यांच्या घरीं वेद जागृत आहे, स्वधर्माचार ह्या ज्यांचा व्यवसाय आहे, नित्यानित्यविवेक हा ज्यांचा मंत्री आहे, ज्यांनीं चिंता ईश्वराला वाहिली आहे ह्म० जे ‘ हरिचिंतनावांचून दुसरें कसलेंच चिंतन ’ करीत नाहींत, अशा पवित्र पितरांच्या पोटींच योगभ्रष्ट महात्मे जन्म घेतात. आईबापांचे आहारविहार ज्या किमतीचे असतात त्या दर्जाचीं अपत्यें सामान्यतः होतात. महात्म्यांच्या आईबापांचें चरित्र सूक्ष्म तऱ्हेनें पाहिलें म्हणजे सर्वत्र असेंच दिसतें कीं, महात्म्यांचे पितर होण्याचीच योग्यता त्यांच्या अंगीं होती. ‘ भांगेंत तुळस ’ किंवा ‘ सूर्यापोटीं शनेश्वर ’ ह्या म्हणी अगदीं विरुद्ध टोकांचे अपवाद दर्शविणाऱ्या असून ‘ खाण तशी माती आणि बीज तसा अंकुर ’ ही म्हण सामान्य सिद्धांताची सिद्धता करणारी आहे असेंच स्पष्ट ठरतें. आनुवंशिक संस्कार आणि जिवाचें स्वतंत्र कर्म ह्या उभय तत्वांची ऐक्यता ‘ शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ’, ह्या सर्वोत्कृष्ट सिद्धांतांत होते. ज्ञानेश्वरमहाराज हे विशिष्ट कार्यासाठीं अवतरले व तेही आपल्या कार्यगौरवाचें महत्व जेथें स्पष्ट होईल असे ‘ शुचि आणि श्रीमंत ’ पितर त्यांनीं निवडले. पितरांना प्रजा अनुरूप झाली आणि प्रजेनें अनुरूप पितरांच्या पोटीं जन्म घेतला; ह्या दोन्ही गोष्टी उचित झाल्या. ज्ञानेश्वर महाराजांप्रमाणेंच कापिल महामुनि श्रीविष्णूचा अवतार होते. विठ्ठलपंत आणि रुक्मिणीबाई यांच्याप्रमाणेंच कपिलमुनींचे पितर कर्दमऋषि आणि देवहूति यांच्या चारित्रांतही वैराग्य व तपश्चर्या ढळढळित दिसतात. पितरांचें वैराग्य, ज्ञान, पवित्रता, तपाचरण व निर्विषयता लोकोत्तर असल्या वांचून लोकोत्तर विभूतींचें जनकत्व

त्यांचेकडे येत नाहीं. देवहूतीसारखेंच रुक्मिणीबाईचें पातिव्रत्य व तपाचरण कडक होतें. रामानंदस्वामींना त्यांनीं प्रथम वंदन केलें तेव्हां त्यांची मूर्ति देवहूतीप्रमाणेंचः—

कालेन भूयसा क्षामा कर्षिता व्रतचर्यया ॥ ५ ॥
सरजं बिभ्रती वासो वेणीभूतांश्च मूर्धजान् ।
अंगं च मलपंकेन संछन्नं शबलस्तनम् ॥ २५ ॥
—( भागवत, स्कंध ३ अ. २३ ).

अशा प्रकारची पण तपस्तेजानें देदीप्यमान झालेली रामानंदस्वामींनीं पाहिली. तेव्हां त्यांच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन ते तीर्थयात्रा सोडून परत काशीस गेले व 'हिचा स्वीकार कर म्हणजे हिच्या पोटीं ईश्वरांश अवतरतील' असा त्यांनीं विठ्ठलपंतांस कानमंत्र सांगितला.

१५. असो. श्रीगुरुप्रसादानें व विठ्ठलरुक्मिणींच्या अत्युत्कट पुण्य-बलानें त्यांच्या पोटीं निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई हीं नररत्नें दोन वर्षांच्या अंतरानें जन्मास आलीं. जन्म आपेगांवास झाले असें वाटतें.

जन्मकाळ.

१ निवृत्तिनाथः—शके ११९५ श्रीमुखसंवत्सर माघ वद्य १ प्रातःकाळ.
२ ज्ञानेश्वरमहाराजः—शके ११९७ युवासंवत्सर श्रावण कृष्ण ८ मध्यरात्र.
३ सोपानदेवः—शके ११९९ ईश्वरसंवत्सर कार्तिक शुद्ध १५ प्रहररात्र.
४ मुक्ताबाईः—शके १२०१ प्रमाथिनाम संवत्सर आश्विन शुद्ध १ मध्यान्ह.

हे चार जन्म[1] म्हणजे चार सूर्यच प्रगटले असें म्हटलें पाहिजे. विठ्ठल-रुक्मिणी म्हणजे परमात्मा व त्याची शक्ति असून त्यांच्या पोटीं निवृत्ति-

---

१ चाऱ्ही भावंडांचे जन्मकाळ कोठें कोठें याहून थोडे निराळे दिलेले आढळतात. निवृत्तिनाथ शके ११९० ज्ञानेश्वर शके ११९३, सोपानदेव शके ११९६ व मुक्ताबाई शके ११९९.

ज्ञानदेवसोपानरूपानें हरिहरब्रह्मा जन्मास आले. हीं चार मुलें नसून हे चतुर्विध मोक्ष किंवा चतुर्विध पुरुषार्थच साकाररूपानें नटले असें वाटतें. श्रीज्ञानेश्वर महाराजांचा जन्म आपेगांवास झाला असून त्यांची समाधि आळंदीस झाली असें उद्बोधनाथ स्पष्ट म्हणतात व नामदेवांच्या समाधीच्या अभंगांतही त्याचा उल्लेख आहे. जन्मकाळासंबंधानें संतांचे आधारः—

( १ ) जनाबाईचा अभंगः—

**शके अकराशतें पंचाण्णववत्सरीं । निवृति उदरीं प्रगटले ॥ १ ॥**
**सत्याण्णवसालीं ज्ञानदेव झाले । नव्याण्णवीं देखिले सोपानदेव ॥**
**बाराशतें एकीं मुक्ताई जन्मली । जनी म्हणे केली मात त्यांनीं ॥३॥**

( २ ) नामदेवांचा अभंगः—

**अधिक सत्याण्णव शके अकराशतीं । श्रावण मास तिथी कृष्णाष्टमी**
**वर्षाऋतु युवा नाम संवत्सर । उगवे निशाकर रात्रिमाजी ॥ २ ॥**
**पंचमहापातकी तारावया जन । आले नारायण मृत्युलोकां ॥ ३ ॥**
**नामा म्हणे पूर्ण ब्रह्म ज्ञानेश्वर । घेतसे अवतार अलंकापुरीं ॥ ४ ॥**

( ३ ) त्याचसंबंधानें विसोबा खेचर म्हणतातः—

**महाविष्णूचा अवतार । श्रीगुरु माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥**
**शके अकराशें सत्याण्णव । युवासंवत्सर नांव ॥ २ ॥**
**वर्षाऋतु श्रावणमास । कृष्णपक्ष पर्व दिवस ॥ ३ ॥**
**अष्टमीच अपरराती । उदया आला निशापती ॥ ४ ॥**
**विठ्ठलरुक्माईचे कुशीं । अवतरले हृषीकेशी ॥ ५ ॥**
**विश्व तारावया आले । खेचर वंदितो पाउलें ॥ ६ ॥**

( ४ ) ज्ञानेश्वरविजयकर्ते सच्चिदानंदबावा म्हणतातः—

**श्रीशालिवाहन भूपती । अकराशें सत्याण्णव मिती ।**
**युवानाम वत्सराप्रती । श्रावण कृष्ण अष्टमी ॥ १२ ॥**
**गुरुवार रोहिणी । पर्वकाळ परार्ध रजनी ।**
**बैसोनि देवगण विमानीं । कुसुमवृष्टि करिताती ॥ १३ ॥**
**विठ्ठल रुक्मिणीचे पोटीं । अवतरले जगजेठी ।**
**ज्ञानदेव नामें सृष्टीं । श्रीगुरु माझा मिरवितसे ॥ ११४ ॥**

# ३ गुरुसंप्रदाय.

श्रीगुरु प्रसन्न होये । शिष्य विद्याही करि लाहे ।
परी ते फळ संप्रदाये । उपासिलिया ॥ १३८४ ॥

—ज्ञानेश्वरी अ० १९.

१ विठ्ठलपंतांचा छल. २ त्र्यंबकेश्वरीं गमन. ३ निवृत्तिनाथांस गैनीनाथांचा अनुग्रह. ४ ज्ञानेश्वरादि भावंडांस उपदेश. ५ ज्ञानेश्वरींतील संप्रदायाच्या ओंव्या व त्यांचा भावार्थ. ६ जालंदरनाथ, मैनावती व गोपीचंद. ७ मत्स्येंद्रनाथ आणि गोरक्षनाथ. ८ हा वैष्णवसंप्रदायच होय. ९ गुरुपरंपरेस नमन.

## गुरुपरंपरा.

( १ )



शिष्यपरंपरा.
|
ज्ञाननाथ
|
सत्यामलनाथ
|
गैबीनाथ
|
गुप्तनाथ
|
उद्बोधनाथ
|
केसरिनाथ
|
शिवदिननाथ

१. निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव व मुक्ताबाई हीं भावंडें आपापसांत खेळत, विनोद करीत, व बाळपणापासून परमार्थाच्या गोष्टी बोलत. त्यांची परिस्थिति वैराग्यपोषक होती. विठ्ठलपंतांना ब्राह्मणांनीं वाळींत टाकल्यामुळें त्यांचा सर्व काळ घरीं स्त्रीपुत्रांच्या संगतींतच जाई. रुक्मिणीबाई कोठें विहिरीवर पाणी आणण्यास गेल्या किंवा नदीवर धुण्यास गेल्या तर त्यांच्याकडे पाहून बायका अवाच्य गोष्टी बोलत. मुलें कोठें बाहेर पडलीं तर 'हीं संन्याशाचीं मुलें' म्हणून लहान थोर त्यांच्या मागें लागून सर्व प्रकारें त्यांना त्रास देत. जातिबहिष्कृत करण्याइतकी दुसरी कोणतीही जबर शिक्षा समाज देऊं शकत नाहीं. सर्व दंडांत अत्यंत असह्य दंड म्हणजे बहिष्कार होय. नित्य उपहास, छल, निंदा, कुत्सा यांचे तीक्ष्ण बाण बहिष्कृत मनुष्यास सोसावे लागतात, सर्व प्रकारचे प्रतिबंध त्यास प्राप्त होतात, किंबहुना त्याचा छळ करणें हें मर्दुमकीचें काम असून तें करणें म्हणजे धर्मसेवा करण्यासारखें पुण्यकारक आहे अशी अडाणी लोकांत समजूत पसरत असते! विठ्ठलपंतांस ब्राह्मणांनीं बहिष्कार घातल्यामुळें अन्यजातीय लोकंही त्यांचा संबंध

टाळूं लागले. अशा आपत्तींत विठ्ठलरुक्मिणींनीं कांहीं वर्षें काढिलीं. ह्या आपत्तीचा संसर्ग त्यांच्या मुलांलाही सोसावा लागला. निवृत्तिप्रभृति बाळें नामदेवरायांनीं म्हटल्याप्रमाणें 'उपजत ज्ञानी' असल्यामुळें त्यांची प्रगल्भता, त्यांचें ज्ञान, त्यांचे संवाद, संतपणाचीं त्यांच्या अंगीं उमटलेलीं लक्षणें हीं सर्व पाहून त्यांच्या मातापित्यांना परमानंद होई.

२. निवृत्तिनाथ सात वर्षांचे झाले तेव्हां त्यांचा व्रतबंध कसा होईल ही विठ्ठलपंतांस काळजी उत्पन्न झाली. संन्यास घेतल्यावर परत गृहस्थाश्रमांत आल्याचें उदाहरण विठ्ठलपंतापूर्वीं दुसरें कोणाचें झालें नसल्यामुळें संन्याश्याच्या मुलांची मुंज करितां येईल कीं नाहीं याचा निर्णय होणें आणि तोही विठ्ठलपंतांच्या तर्फेनें होणें शक्य नव्हतें. विठ्ठलपंतांनीं खूप खटपट केली पण त्यांच्याशीं कोणी धड बोलतही नव्हते, मग त्यांच्या बाजूनें मत द्यायला कोण तयार होणार ? शेवटीं रुक्मिणीबाईच्या मताप्रमाणें कांहीं अनुष्ठान करावें हा हेतु मनांत धरून विठ्ठलपंत स्त्रीपुत्रांसह त्र्यंबकेश्वरास गेले. तेथें ते रोज मध्यरात्रीं कुशावर्तीं स्नान करून मुलांसह ब्रह्मगिरीस सव्य प्रदक्षिणा करण्यास निघत. असा सहा महिने क्रम चालला. एके दिवशीं निवृत्तिनाथांचा भाग्योदय होण्याचा समय प्राप्त झाला. तो प्रकार असा:—

३. एके रात्रीं सर्वजण असेच प्रदक्षिणेस बाहेर पडले असतांना त्यांच्या समोरून एक विकाळ व्याघ्र उड्या घेत चाललेला त्यांनीं पाहिला; त्याबरोबर विठ्ठलपंत घाबरून गेले व मुलेंलेंकरें संभाळण्यांत ते गुंतले होते तोंच निवृत्तिनाथ वाट चुकले व भलतीकडच्या भलतीकडे पळत सुटले. ते पळतां पळतां अंजनीपर्वताच्या एका गुहेंत शिरले. आंत दोन शिष्यांसह श्रीगैनीनाथ तप आचरीत बसले होते. निवृत्तिनाथ वाट चुकून त्या गुहेंत आले, पण असें म्हणण्यापेक्षां भवारण्यांत वाट चुकून ते भलतीकडे हिंडत होते तें भ्रमण संपून त्यांना सद्गुरुनाथ वास्तव्य करीत असलेल्या दिव्य स्थानाची खरी वाट सांपडली असें म्हणणेंच जास्त चांगलें. मस्तकावर जटा, कानांत कुंडलें, कंठांत शैली, हातांत शिंगी व पुंगी धारण

केलेले व मुखानें श्रीगुरुनामाचा घोष करीत असलेले श्रीगैनीनाथ त्या सिद्धाश्रमांत निवृत्तिनाथांनीं पाहिले व त्यांच्या पायांवर लोटांगण घातलें. गैनीनाथांसही त्या कोमलवयवी बालास पाहून फार समाधान वाटलें. ध्रुवाला जसे नारद भेटले तसे निवृत्तिनाथाला गैनीनाथ भेटले व त्यांनीं त्याला पाहतांच हा अधिकारसंपन्न शिष्य आहे असें जाणून ब्रह्मबोध केला. सात दिवस निवृत्तिनाथ गुरुसन्निध राहिले. श्रीगुरूंनीं त्यास महावाक्याचा बोध केला व योगमार्गाची दीक्षा दिली. गैनीनाथांनीं शिष्यास कोणता बोध केला, योगमार्ग कसा शिकविला व स्वरूपानुभव कसा आणून दिला हें जे कोणी सांप्रदायांत प्रविष्ट होऊन कृतार्थ होतील त्यांनाच यथार्थ सांगतां येणार आहे. गैनीनाथ हे आदिनाथसांप्रदायांतले होते व त्यांनीं निवृत्तिनाथास आपल्या सांप्रदायांत मिळवून घेऊन श्रीकृष्णाची उपासना दिली व नामस्मरणाचा प्रसार करण्याची आज्ञा दिली.

४. निवृत्तिनाथांचें वय लहान होतें खरें पण 'न खलु वयस्तेजसो हेतुः' ह्या न्यायानें पूर्वसंस्कारबलानें गुरुकृत सर्व बोध त्यांनीं अंगीं मुरवला व तोच ज्ञानेश्वरप्रभृति आपल्या भावंडांस देऊन त्यांनाही आपणासारखेंच कृतार्थ केलें. अठराव्या वर्षीं ज्या महात्म्यानें ज्ञानेश्वरीसारखा अद्वितीय ग्रंथ निर्माण केला त्याला गुरुकृपाही लवकरच झाली. महात्म्यांचें सर्वच अलौकिक असतें. त्यांना ग्रंथ घोकून विद्यार्जन करायचें नसतें. त्यांचें विद्यार्जन म्हणजे केवळ स्मरण होय!! आचार्यांनीं आठव्या वर्षीं चतुर्वेदांचें व बाराव्या वर्षीं सकल शास्त्रांचें अध्ययन केलें आणि सोळाव्या वर्षीं भाष्य करून बत्तीस वर्षांच्या आंत आपलें अवतारकृत्य संपविलें:—

अष्टवर्षे चतुर्वेदी द्वादशे सर्वशास्त्रविद् ।
षोडशे कृतवान् भाष्यं द्वात्रिंशे मुनिरत्यगात् ॥

निवृत्तिज्ञानेश्वर हेही आचार्यांच्याच कोटींतले असून त्यांचें चरित्रही तसेंच हृदयंगम आहे. निवृत्तिनाथ कांहीं दिवसांनीं श्रीगुरूंची आज्ञा

न परत आले, आईबापांस व भावंडांस भेटले व ज्ञानेश्वरमहाराजांस ीं उपदेश केला. श्रीज्ञानेश्वरमहाराज आपल्या वयाच्या ८ व्या वर्षीच नेवृत्तिसद्गुरुपासून उपदेश घेऊन पूर्णतेस पावले. त्यांच्या गुरुसांप्र ाबद्दल आतां दोन शब्द सांगतों. आदिनाथ शंकर हे या सांप्रदायाचे गुरु होत. आदिनाथांचे मुख्य शिष्य मत्स्येंद्रनाथ, मत्स्येंद्रनाथांचे गोरक्ष-, गोरक्षनाथांचे गैनीनाथ, गैनीनाथांचे निवृत्तिनाथ व निवृत्तिनाथांचे य श्रीज्ञानेश्वरमहाराज किंवा नाथसांप्रदायाप्रमाणें बोलायचें म्हणजे नाथ हे होत. निवृत्तिनाथ एका अभंगांत म्हणतातः—

**अभंग.**

**दिनाथ उमाबीज प्रगटलें । मत्स्येंद्रा लाधलें सहजस्थिती ॥ १ ॥**
**ते प्रेममुद्रा गोरक्षा दिधली । पूर्ण कृपा केली गैनीनाथा ॥ २ ॥**
**ाग्यें तापला सप्रेमें निवाला । ठेवा जो लाधला शांतिसुख ॥३॥**
**द्ध निःशंक विचरतां मही । सुखानंद हृदयीं स्थिर झाला ॥ ४ ॥**
**त्कीचें पात्र अन्वयाचें मुख । देऊनी सम्यक अनन्यता ॥ ५ ॥**
**वृत्ती गयनी कृपा केली पूर्ण । कुळ हें पावन कृष्णनामें ॥ ६ ॥**

ह्याचा भावार्थः—“ आदिनाथ शंकरांनीं पार्वतीला स्वबोधाचें रहस्य गेतलें तें सहज मत्स्येंद्राला प्राप्त झालें. तोच प्रेमयुक्त बोध त्यांनीं गोर-क्ष दिला व त्यांनीं तो गैनीनाथाला दिला. वैराग्यानें तापलेले गैनीनाथ- बोधानें निवाले. त्यांना तो शांतिसुखाचा ठेवाच सांपडला. चित्तांत द्भावाचा उदय झाल्यामुळें ते पृथ्वीवर निःशंकपणानें पुष्कळ फिरले यामुळें तो सुखानंद त्यांच्या चित्तांत स्थिर झाला. निवृत्ति हा वैराग्य-ळ असून ह्याच्या चित्तांत अनन्यप्रेम उत्पन्न केलें तर हा अन्वयाचें मुख ाजे सांप्रदायाचा प्रसार करण्याचें उत्तम द्वार होईल असें जाणून गैनी ांनीं अनन्यप्रेम देऊन निवृत्तीवर पूर्ण कृपा केली व ( निवृत्तिनाथ ातात ). आम्हांला त्यांनीं दिलेल्या श्रीकृष्णोपासनेनें आमचें कुळ त्यांनीं ाझ्या द्वारें ) पावन केलें.” निवृत्तिनाथांनीं आपला बोध ज्ञानदेव,

सोपान व मुक्ताबाई ह्या तीनही भावंडांस देऊन त्यांना कृतार्थ केलें. निवृत्तिनाथ हेच तीनही भावंडांचे गुरु झाले. भगवत्तत्त्व हें 'निवृत्ती दिधलें आमुच्या करीं' किंवा 'निवृत्तीनें चोखाळ दाखविलें' अशा प्रकारचे उल्लेख त्यांच्या अभंगांतून सांपडतात.

ज्ञानेश्वरमहाराजांनीं 'ज्ञानेश्वरी'च्या उपसंहारांत आपल्या सांप्रदाया-संबंधानें लिहिलें आहे:—

क्षीरसिंधूपरिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं ।
नेणों कै श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जें ॥ १७५२ ॥
तें क्षीरकल्लोळाआंत । मकरोदरीं गुप्त ।
होतां तयाचा हात । पैठें जालें ॥ ५३ ॥
तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं । भग्नावयवा चौरंगीं ।
भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ॥ ५४ ॥
मग समाधि अव्यत्यया । भोगावी वासना यया ।
ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं ॥ ५५ ॥

---

१ नाथांनीं मात्र "ज्ञानदेवें उपदेश करुनियां पाहीं । सोपान मुक्ताई बोधियेली" असें म्हटलें आहे. वरील ज्ञानेश्वरांच्या सांप्रदायाची हकीकत पुष्कळांनीं अशीच दिली आहे. निवृत्तिज्ञानदेवांना सोपान व मुक्ताबाई सारख्याच सद्भावानें सद्गुरु मानीत असें दिसतें.

१

सांबें बोधियेला कृपावंत विष्णु । परब्रह्मपूर्ण सांब माझा ॥ १ ॥
सांब उपदेशी उमा-मच्छेंद्रासी । ब्रह्मरूप त्यासी केले तेणें ॥ २ ॥
मच्छेंद्रापासूनी चौरंगी गोरक्ष । एकाजनार्दनी अलक्ष्य दाखविलें

२

मच्छेंद्रानें मंत्र गोरक्षासी दिला । गोरक्ष बोळला गाहनीराजा ।
गाहिनीनें खूण निवृत्ती दिधली । पूर्णकृपा केली ज्ञानराजा ॥ २ ॥
ज्ञानदेवें बोध जगासी पै केला । एकाजनार्दनी धाला पुर्णबोधें ३

तेणें योगाब्जिनीसरोवर । विषयाविध्वंसैकवीर ।
तिये पदीं कां सर्वेश्वर । अभिषेकिले ॥ ५६ ॥
मग तिहीं तें शांभव । अद्वयानंद वैभव ।
संपादिलें सप्रभव । श्रीगैनीनाथा ॥ ५७ ॥
तेणें कळिकाळित भूतां । आला देखोनि निरुता ।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥ ५८ ॥
" ना आदिगुरुशंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा ।
बोधाचा हा संसरा । जाला जो आमुतें ॥ ५९ ॥
तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जीवा ।
सर्वप्रकारीं धांवा । करीं पा वेगीं " ॥ १७६० ॥
आधीच तंव तो कृपाळु । वरि गुरुआज्ञेचा बोलु ।
जाला जैसा वर्षाकाळु । खवळणें मेघा ॥ ६१ ॥
मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थग्रथनमिसें ।
वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथ ॥ ६२ ॥
तेथ पुढां मी बापियां । मांडला आर्ती आपुलिया ।
कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥ ६३ ॥

ह्या ओव्यांचा भावार्थ असा आहे:—क्षीरसागराच्या परिसरांत त्रिपुरारी ा आदिनाथ शंकर त्यांनीं पार्वतीच्या कानांत जें ज्ञान सांगितलें—केव्हां ांगितलें तें माहीत नाहीं—तें क्षीरकल्लोळांतल्या एका मत्स्याच्या पोटांत (स्वरूपानें असणाऱ्या मत्स्येंद्रनाथांना प्राप्त झालें. त्या ज्ञानाचा प्रताप ्वढा होता कीं मत्स्येंद्रनाथ संचार करतां करतां सप्तशृंगावर आले, तेव्हां ग्रंचे शरीरावयव भग्न झाले होते असे चौरंगीनाथ मत्स्येंद्रनाथांचें दर्शन ातांच पूर्णावयव झाले. पण अशी उपाधि जास्त वाढूं नये व अव्यत्यय ़० अचल समाधिसुख भोगतां यावें म्हणून मत्स्येंद्रनाथांनीं आपलें ज्ञान र्फ प्रेममुद्रा गोरक्षनाथांना दिली. गोरक्षनाथ हे योगकमलिनीचें सरोवर तें म्हणजे योगविद्येंत पारंगत होते व विषयविध्वंस करण्याच्या कामांत ंम शूर होते; अशा त्या योगनिष्ठ व विरक्त गोरक्षनाथांना स्वात्मपदावर

गुरूंनीं चढविलें. त्यांनीं तें शंकरापासून परंपरेनें आलेलें अद्वयानंदसुख सप्रभव ( सशक्तिक ) असें गैनीनाथांस दिलें. कलीनें सर्व प्राणी ग्रस्त झाले आहेत असें पाहून गैनीनाथांनीं निवृत्तिनाथांना आज्ञा केली कीं, " आदिगुरु शंकरापासून शिष्यपरंपरेनें जें हें बोधाचें ऐश्वर्य आमच्यापर्यंत आलें आहे तें आम्ही तुझ्या स्वाधीन करितों व तूं कलीनें गिळलेल्या जिवांना दुःखापासून सोडविण्याकरितां सर्व प्रकारचा धांवा कर म्ह० त्वरा करून त्यांचा उद्धार कर. आधींच निवृत्तिनाथ दयाशील होते आणि त्यांत श्रीगुरूंची अशी आज्ञा झाली ! मग काय विचारतां ? जसा वृष्टि करण्याविषयीं मेघ उत्सुक असून त्यांतच वर्षाकाळ आला म्हणजे तो जसा खवळतो तशी त्यांची स्थिति झाली. संसारानें ग्रस्त झालेल्या जीवांच्या कळवळीनें गीतार्थ प्रगट करण्याच्या मिषानें निवृत्तिनाथांनीं शांतिरसाचा जो वर्षाव केला तो हा ( भावार्थदीपिका ) ग्रंथ होय ! त्या वेळीं चातकासारखा अनन्य होऊन आपल्यावर प्रसाद व्हावा म्हणून उत्कंठित झालेला मी शिष्य जवळ होतों म्हणून त्यांनीं मजवर कृपा केली व मला ह्या यशाचें मालक केलें." ज्ञानेश्वरांचा पुढील अभंग सांप्रदायिकांत म्हणण्याची पद्धत असून आळंदीस तर रोज सकाळीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांची पंचपदी करितात तेव्हां म्हणतातः—

**आदिनाथ गुरु सकळ सिद्धांचा । मत्स्येंद्र तयाचा मुख्य शिष्य १**
**मत्स्येंद्रानें बोध गोरक्षासी दिला । गोरक्ष वोळला गहिनींप्रती ॥२**
**गहिनींप्रसादें निवृत्ति दातार । ज्ञानदेवा सार चोजवीलें ॥ ३ ॥**

६. ज्ञानेश्वरमहाराजांची गुरुपरंपरा आदिनाथ, गोरक्षनाथ, गैनीनाथ, निवृत्तिनाथ व ज्ञानेश्वर अशी आहे. ह्या परंपरेची थोडक्यांत आणखी माहिती देतों. आदिनाथांचे दोन शिष्य मत्स्येंद्रनाथ व जालंदरनाथ. आधीं जालंदरनाथांची गोष्ट सांगून मग मत्स्येंद्रनाथांकडे वळूं. शिवपार्वती विमानांतून क्षीरसमुद्राकडून हिंडत असतां त्यांनीं समुद्रांत तरतांना एक बालक पाहिलें. पार्वतीनें त्यास उचलून विमानांत घेतलें व शंकरांनीं

त्यावर अनुग्रह केला. हाच शिवानुग्रहीत सिद्धपुरुष पुढें जालंदरनाथ ह्या नांवानें प्रख्यात झाला. याचे शिष्य दोन:—एक कानीफनाथ व दुसरी गोपीचंदराजाची आई मैनावती. कानीफनाथ हा मद्रदेशच्या सुरथ-राजाचा मुलगा, अर्थात् जातीनें हा क्षत्रिय होता. त्याच्या मातेचें नांव भामिनी. हा राज्य न करतां जालंदरनाथाचा शिष्य होऊन वैराग्यवृत्तीनें हिंडूं लागला. जालंदरनाथाचा दुसरा शिष्य म्हणजे गौडबंगाल्यांतील कांचनपूरचा राजा जो गोपीचंद त्याची आई मैनावती ही होय. हा राजा आपला बाप त्रैलोक्यचंद्र याच्या पाठीमागून गादीवर बसला. मैनावतीनें जालंदरनाथाचा अनुग्रह घेतला व विमलभावानें ती त्याची सेवा करूं लागली, पण गोपीचंदाची पट्टराणी औमा इनें त्याच्या मनांत भलतेंच भरवून दिल्यामुळें संतापाच्या भरांत त्यानें कोणासही कळूं न देतां एक खळगा खणून त्यांत जालंदरनाथास पुरून वर माती पसरली. ही गोष्ट मैनावतीस कळली नाहीं. गुरु न कळ-वितां नाहींसे झाले याबद्दल मात्र तिला फार वाईट वाटलें. गुरु सन्निध असतांना मैतावती रोज गुरुपादोदक घेऊन मग जेवीत असे, पण गुरु दिसेनासे झाल्यापासून तिनें तीर्थोदक मिळत नसल्याकारणानें अन्न सोडलें. ह्या गोष्टीस कांहीं दिवस लोटले. एकदां गोपीचंद स्नान करीत असतांना ही माडीवर उभी होती, गोपीचंदाची लिंबासारखी अंगकांति पाहून एवढा सुंदर देहसुद्धां मृत्यूच्या मुखीं पडणार हा विचार मनांत येऊन देहाचें विना-शित्व लक्षांत येऊन तिच्या डोळ्यांतून अश्रूंचें कढत थेंब पडले, ते गोपी-चंदाच्या अंगावर पडून त्यावर तात्काळ फोड आले. गोपीचंद पराकाष्ठेचा सुंदर व सुकुमार होता. गोपीचंदानें वर पाहिलें तों मैनावती खिडकींत खिन्न-पणानें उभी असून अश्रु ढाळीत आहे असें त्याला दिसलें. गोपीचंद मोठा मातृभक्त होता. आईच्या डोळ्यांतून टिपें कां गळलीं हें त्यानें तिला विचा-रिलें. ती म्हणाली:—"तुझ्या बापाचा देह असाच सुकुमार असून तोही कालवश झाला. तुझ्यावर एक दिवस अशाचि हा मृत्युलोक टाकून जाण्याची पाळी येईल. पण देहाचें नश्वरत्व लक्षांत न घेतां अविचारानें तूं मर्दनाभ्यंगा-

दिकांनीं त्याच्याच शुश्रूषेंत गुंग झाला आहेस हें पाहून मला वाईट वाटतें." आईची ती प्रेमाची वाणी ऐकतांच गोपीचंदाचे डोळे उघडले व देह अमर होण्यास कांहीं साधन आहे काय असें त्यानें तिला विचारलें. 'माझे गुरु जालंदरनाथ येथें असते तर त्यांनीं योगबलानें तुझी मनीषा तृप्त केली असती' असें तिनें उत्तर केलें. हें ऐकतांच गोपीचंद कृतकर्माचा पश्चात्ताप पावून मनांत चरकला. यानंतर तोही उदासपणानेंच राहत होता. असें होतां होतां एके दिवशीं कानीफनाथांची स्वारी तीर्थयात्रा करीत फिरत असतांना त्यांची व गोरक्षनाथांची गांठ पडली. नाथसांप्रदायाप्रमाणें त्यांचा आदेश झाला; म्हणजे 'आदेश' शब्दानें त्यांचें नमन झालें. परस्परांची हीच पहिली भेट होय. 'मी आपले गुरु जालंदरनाथ यांस शोधावयास चाललों आहें' असें कानीफनाथ म्हणाले व 'मी आपले गुरु मत्स्येंद्रनाथ यांस शोधावयास चाललों आहें' असें गोरक्षनाथ म्हणाले. 'तुमचे गुरु स्त्रीराज्यांत सांपडले आहेत' असें कानीफनाथ म्हणाले; व 'तुमचे गुरु गोपीचंदानें लिदींत पुरले आहेत' असें गोरक्षनाथ म्हणाले. ह्याप्रमाणें एकमेकांस आपापल्या गुरूची हकीकत कळविल्यावर गोरक्षनाथ स्त्रीराज्याकडे चालते झाले व कानीफनाथ गोपीचंदाकडे गेले. कानीफनाथ आपल्या गांवांत आल्याचें मैनावतीस कळतांच ती त्यांच्या दर्शनास गेली. 'तुझ्या मुलानें जालंदरनाथांस लिदींत पुरलें आहे' हें कानीफनाथांच्या तोंडचें वाक्य ऐकतांच मैनावती फार घाबरून गेली व तिला महद्दुःख झालें. तिनें आपल्या मुलास अभय मागून घेतलें. कानीफनाथानें गोपीचंदास खूप जरब देऊन 'माझ्या गुरूस कोठें पुरलें आहेस तें लवकर सांग' असें म्हटलें. तेव्हां आपला अपराध कबूल करून त्यानें कानीफनाथांच्या पायीं लोटांगण घातलें. नंतर ते सर्व जालंदरनाथास पुरलें होतें तेथें गेले. कानीफनाथानें गोपीचंदाच्या आकृती-एवढे लोखंड, रुपें व सोनें यांचे तीन पुतळे जवळ उभे करून ठेविले व कानीफनाथ बाहेरून म्हणालेः—'महाराज, मी कानीफ आहें.' यावर 'बेटा! सुखी ऐस' असा आंतून ध्वनि निघाला! तो ऐकतांच मैनावतीस

अत्यंत आनंदाश्चर्य वाटलें. आंतून पुन्हां ध्वनि निघाला ' अरे कानीफ ! वर आणखी कोण आहे ? ' कानीफ म्हणालाः—'गोपीचंदराजा आहे.' आंतून ध्वनि निघाला, ' त्या चांडाळाचें भस्म होवो !' तात्काळ पहिला लोखंडाचा पुतळा भस्म झाला. असा प्रकार तीन वेळां होऊन तीनही धातूंचे पुतळे जळून भस्म झाले. स्थूल, सूक्ष्म व कारण ह्या तीनही देहांचे श्रीगुरूंनीं भस्म केलें ! नंतर गोपीचंदास हातीं धरून कानीफ खळग्याच्या तोंडाशीं आले. आंतून ध्वनि आला, ' कानीफा तुजबरोबर कोण आहे ?' कानीफ शांतपणानें म्हणाला, ' राजा गोपीचंद आहे !' यावर आंतून ध्वनि निघाला, ' अरे ! तो अजून जिवंत आहे ? बरें तर तो अमर होवो.' हें ऐकतांच गोपीचंदास निर्भयता वाटली व त्यानें कानीफाच्या आज्ञेवरून जालंदरनाथास बाहेर काढलें. दिव्य योगप्रभावानें ज़ालंदरनाथांच्या अंगाला लिदीचा बिलकुल स्पर्श झाला नाहीं व त्यांची अंगकांति पहिल्याहूनही सतेज दिसली. हें पाहून गुरुभक्तीनें भरलेल्या मैनावतीस परमानंद झाला. सर्व नगरांत गोपीचंदराजाचे प्राण वांचल्याबद्दल आनंदोत्सव झाले. गोपीचंदास यापुढें परमवैराग्य प्राप्त झालें व त्यानें कानीफनाथाचा अनुग्रह घेतला व योगदीक्षा घेतली. बैरागी होऊन लागलीच सर्व राण्यांच्या घरीं तो भिक्षेस गेला. राण्यांनीं आकांत केला पण तो वैराग्यसंपन्न झालेला राजा गुरुसमागमें तीर्थयात्रेच्या निमित्तानें त्या मोहमयी नगरींतून बाहेर पडला.

७. आतां आपण जालंदरनाथांचे गुरुबंधु जे मत्स्येंद्रनाथ त्यांच्याकडे व त्यांच्या शिष्यपरंपरेकडे वळूं. शिवपार्वती क्षीरसमुद्रतीरीं ब्रह्मचर्चा करीत असतांना शंकरांचें भाषण ऐकून पार्वती हुंकारे देत होती. कांहीं वेळानें तन्मयतेमुळें पार्वतीस समाधि लागली. हें पाहून मत्स्यरूपानें श्रीविष्णूंनीं तेथें हुंकारे देण्याचा सपाटा लाविला. पण ह्या हुंकाऱ्याचा निराळा स्वर पाहून शंकरानें पार्वतीकडे पाहिलें, तेव्हां ती समाधिस्थ झालेली त्यांना दिसली. तेव्हां विष्णूचें हें कृत्य आहे असें जाणून शंकरांनीं ' अलक्ष ' असा उच्चार

केला, त्याबरोबर मत्स्योदरांतून बाहेर येणाऱ्या कुमाररूपी विष्णूनें ‘आदेश’ असा प्रतिशब्द केला. हाच कुमार मत्स्येंद्रनाथ होय. मत्स्येंद्रनाथ हे फिरत फिरत एकदां अयोध्येकडे असणाऱ्या ‘जयश्री’ नांवाच्या नगरांत आले. तेथें विजयध्वज राजा राज्य करीत होता. त्या नगरांत सद्बोधनामक एक पवित्र ब्राह्मण आपल्या सद्वृत्तिनामक स्त्रीसह मोठा धर्माचार पाळून राहत होता. त्यास पोटीं संतान नव्हतें. एकदां त्याच्या द्वारीं भिक्षा मागत मत्स्येंद्रनाथ आले. ब्राह्मणपत्नीनें हा तेजस्वी योगी पाहून सत्कारपूर्वक त्याला भिक्षा घातली. मत्स्येंद्रनाथांसही त्या बाईच्या सतीत्वाचें तेज पाहून आनंद झाला. पोटीं पुत्र नसल्यामुळें तिच्या चेहऱ्यावर थोडी उदासीनतेची छाया होती. मत्स्येंद्रनाथांनीं विचारतांच पुत्र नसल्यामुळें संसारांत उदासीनता वाटते असें तिनें सांगितलें. यावर मत्स्येंद्रनाथांनीं आपल्या झोळींतून भस्म काढून तें अभिमंत्रित करून त्या सतीस दिलें व सांगितलें कीं, ‘तूं हें भक्षण कर म्हणजे पुत्रवती होशील.’ यानंतर मत्स्येंद्रनाथ आपल्या वाटेला लागले. इकडे त्या ब्राह्मणस्त्रीला शेजारणींनीं सांगितलें कीं, “हा कोण गोसावडा होता कोण जाणे? अगबाई! असले हे कानफाटे बैरागी कसलेसें मंतरलेलें भस्म बायकांना देतात, आणि बायकांनीं तें खाल्लें म्हणजे त्यांची बुद्धि भ्रष्ट होऊन त्या कुत्र्या वगैरे होऊन यांच्या मागें जातात.” हा शेजारणींचा बुद्धिवाद ऐकून त्या बाईची श्रद्धा चलता पावली व चित्त विकल्पानें घेरल्यामुळें तिनें ती रक्षा उकिरड्यावर नेऊन टाकली. या गोष्टीस बारा वर्षें लोटलीं. मत्स्येंद्रनाथांची स्वारी बारा वर्षांनीं पुनः त्या बाईच्या अंगणांत ‘अलख्’ म्हणून अकस्मात् येऊन उभी राहिली. त्यांनीं त्या बाईस पूर्वीच्या गोष्टीचें स्मरण देऊन विचारलें कीं, ‘तुझा मुलगा आतां बारा वर्षांचा झाला असेल. तो आतां कोठें आहे पाहूं?’ हें ऐकतांच ती बाई मनांत दचकली व तिनें झालेला खरा वृत्तांत सांगितला. तो ऐकतांच मत्स्येंद्रनाथ तिला घेऊन त्या उकिरड्याजवळ गेले. त्यांनीं ‘अलक्ष्य’ असा उच्चार करितांच आंतून ‘आदेश’ असा ध्वनि करीत तेजःपुंजकांतीचा एक बारा वर्षांचा मुलगा बाहेर आला व त्यानें मत्स्येंद्रनाथांच्या पायांवर

मस्तक ठेविलें. हें पाहतांच त्या ब्राह्मणस्त्रीस अत्यंत विस्मय वाटून सिद्धाच्या प्रसादाची हेळणा केल्याबद्दल पश्चात्ताप वाटून दुःख झालें. देवानें दिलें पण कर्मानें नेलें असें वाटून पुत्रसुखास अंतरल्याबद्दल ती फार कष्टी झाली. मत्स्येंद्रनाथांनीं त्या मुलास बरोबर नेलें. तेच आपले गोरक्षनाथ होत. मत्स्येंद्रनाथांनीं आपल्या जवळची सर्व विद्या ह्या श्रद्धाळू व विरक्त अशा आपल्या शिष्यास देऊन कृतार्थ केलें. गोरक्षनाथ योगविद्येंत अत्यंत निष्णात झाले. आपल्या अनुभवानें त्यांनीं योगविद्येचा आणखी उत्कर्ष केला. योगाभ्यास आणि वैराग्य ह्या गुणांत त्यांची गुरूवर कडी झाली. त्यांच्या सांगण्यावरून मत्स्येंद्रनाथांनीं वरील ब्राह्मणदांपत्यावर पुन्हा कृपा केली व त्यास पुत्र झाला त्याचें नांव गोरक्षनाथांनीं 'नाथवरद' असें ठेविलें. एकदां गोरक्षनाथ भिक्षेस गेले असतांना एका बाईनें भिक्षेंत घातलेला वडा मत्स्येंद्रनाथांस फार आवडला; तें पाहून गुरुभक्त गोरक्षनाथ दुसऱ्या दिवशीं त्याच बाईकडे भिक्षेस गेले व वडा मागूं लागले. ती म्हणाली, 'काल वडे केले होते. आज केले नाहींत.' गोरक्ष म्हणाले, 'मी येथून वडा घेतल्याशिवाय जाणार नाहीं.' ती बाई रागानें म्हणाली, 'रोज रोज वडे कोठले आणूं? तूं आपला एक डोळा काढून दे म्हणजे तुला वडा देईन.' हीं अक्षरें त्या बाईच्या तोंडून ऐकतांच त्यांनीं डोळा काढून तिच्यापुढें ठेविला! तो पाहून ती बाई फार घाबरली व तिनें लवकर वडे तळून त्यास घातले. भिक्षा घेऊन गोरक्ष घरीं आले, तेव्हां डोळ्यास काय झालें म्हणून गुरूंनीं विचारलें. त्यांनीं झालेली हकीकत सांगितली तेव्हां मत्स्येंद्रनाथ विनोदानें त्यास म्हणाले कीं, 'मला दुसरा डोळा दे.' गोरक्षांनीं तसें करतांच मत्स्येंद्रनाथ प्रसन्न झाले व त्यांनीं त्याच्या दोन्ही डोळ्यांवर -तीर्थ शिंपडलें व ते पहिल्यासारखे केले. मत्स्येंद्रनाथ स्त्रीराज्यांत सांपडले होते तेथून गोरक्षनाथांनीं त्यांस सोडवून आणलें. गोरक्षनाथांनीं आपली विद्या गैनीनाथास दिली. गैनीनाथांपासून ती निवृत्तिनाथास प्राप्त झाली आणि त्यांनीं ज्ञानेश्वरादि आपल्या भावंडांस दिली. असो. मत्स्येंद्रनाथांचा मत्स्येंद्रसंहिता नामक योगमार्गावरील

एक ग्रंथ आहे. गोरक्षनाथ विद्वान् होते. त्यांनीं बरेच ग्रंथ लिहिले आहेत. अर्वाचीन कोशकारांनीं म्हटलें आहेः—

"गोरक्ष हा विद्वान् कविही होता. यानें गोरक्षकल्प, गोरक्षशतक, गोरक्षसहस्रनाम; गोरक्षगीता इत्यादि ग्रंथ संस्कृतांत लिहिले. याशिवाय तीन हजार श्लोकांचा विवेकमार्तंडनामक ग्रंथ याच्याच नांवावर आढळतो. चर्पटीनाथ इत्यादि याचे बहुत शिष्य होते. गोरखपूर तर यानेंच वसविलें, आणि तेथें कांहीं काळानें गादी स्थापून तीवर आपला भाऊ जो नाथवरद याची स्थापना केली." याच्या सिद्धींविषयीं नाथलीलामृतांतील पांचव्या अध्यायांत येणेंप्रमाणें लिहिलेली ओवी सांपडतेः—

**असो योगसाधन पाताळीं । गोरक्षास साधलें ते काळीं ।**
**नंतर येऊन भूमंडळीं । चिरंजीवस्थिति पावला ॥ २० ॥**
**न ढळे ज्याचे निमिषोन्मेष । अधोगति नसे श्वासांस ।**
**पृथ्वीस न स्पर्शता ज्याचा वास । आणि छायापातही नव्हेची ।**

असो. गोरक्षनाथांचा 'गोरक्षकिमयागार' म्हणून ग्रंथ आहे त्यांत ते म्हणतातः——

**कहे गोरख मछेंद्रनाथसुत जोगसिद्धिके सार ।**
**गुरुमुखसे जो नर जानत सोहि तरे भवपार ॥ १ ॥.**

गहिनीनाथांनींही 'गहिनीप्रताप' नामक ग्रंथ लिहिला आहे त्यांत ते म्हणतातः—

**गोरखसुत गहिनी कहे नाथपंथकी बानी ।**
**ग्यानी जानत गुरुपुत होत सोहि चढे निरबानी ॥**

गुरुपुत्रावांचून म्हणजे संप्रदायप्रविष्ट झाल्यावांचून आमच्या पंथाचें मर्म दुसऱ्यास कळणार नाहीं असें सर्व नाथपंथी सांगतात. असो. पंजाबांत जालंदरप्रांत आहे व गोरखपूर आहे, यावरून जालंदरनाथ व गोरक्षनाथ ह्यांची पंजाबाकडे वस्ती विशेष होती असें वाटतें; तथापि मत्स्येंद्रनाथांची पालखी पंढरीस कऱ्हाडाजवळ रेटेंबुद्रुक म्हणून गांव आहे तेथून जषळच

असलेल्या 'मत्स्येंद्रगड' नामक डोंगरावरून येते व गोरक्षनाथांची पालखी औंढ्यानागनाथाजवळ असलेल्या त्यांच्या समाधिस्थानापासून येते यावरून यांनीं आपल्या महाराष्ट्रांतच देह ठेविले असल्याचें दिसतें.

८. हा आदिनाथसांप्रदाय म्हणजे वैष्णवसांप्रदायांपैकीं एक असून आदिनाथ शंकर हे त्याचे आदिगुरु होत. नाभाजीनें भक्तमालेंत वैष्णव-सांप्रदाय चार सांगितले आहेत—( १ ) रामानुज, ( २ ) विष्णुस्वामी, ( ३ ) निंबादित्य व मध्वाचार्य. यासंबंधानें भिंगारकरबोवांनीं आपल्या निबंधांत मार्मिक विवेचन केलें आहे. नाभाजि म्हणतो:—

**श्रीरमापति रामानुज । विष्णुस्वामि त्रिपुरारी ।**
**निंबादित्य सनकादिका । मधुकर गुरुमुख चारी ॥**

म्हणजे रामानुजसंप्रदायाचा मूळ उपदेश रमापतीनें रमेस दिला, तेव्हां रमापति हा सांप्रदायाचा आदिगुरु असून या संप्रदायास श्रीपद्धति असें नांव पडलेलें आहे; विष्णुस्वामीच्या संप्रदायास प्रकाशसंप्रदाय हें नांव असून त्याचा आदिगुरु त्रिपुरारि म्हणजे शंकर आहे; निंबादित्यसांप्रदायास स्वरूपसांप्रदाय हें नांव असून त्याचा आदिगुरु सनक आहे आणि मध्वा-चार्यसंप्रदायास चैतन्यसंप्रदाय हें नांव असून त्याचा आदिगुरु ब्रह्मदेव आहे. ही माहिती नाभाजीनेंच दिली आहे असें नसून त्याला पद्मपुरा-णांतही आधार आहे:—

**कलौ खलु भविष्यंति चत्वारः संप्रदायिनः ।**
**श्री-माध्वीरुद्रसनकाः वैष्णवाः क्षितिपावनाः ॥ १ ॥**
**रामानुजं श्रीः स्वीचक्रे मध्वाचार्यं चतुर्मुखः ।**
**श्रीविष्णुस्वामिनं रुद्रो निंबादित्यं चतुस्सनः ॥ २ ॥**

कलियुगांत श्रीप्रभृति चार वैष्णवसांप्रदाय झाले. रामानुजाचा श्रीनें स्वीकार केला, मध्वाचार्यांचा ब्रह्मदेवानें केला, विष्णुस्वामीचा रुद्रानें केला व निंबादित्याचा सनकसनंदादि ब्रह्मदेवाच्या चार पुत्रांनीं केला. असो. त्रिपुरारि म्हणजे शंकर यांनीं क्षीरसिंधुपरिसरीं शक्तीच्या ( पार्वतीच्या ) कर्णकुहरीं ( कानांत ) नेणों कें ( फार मागें किती मागें तें सांगतां येत

नाहीं ) जें ज्ञान सांगितलें तें विष्णूनीं मत्स्याचें रूप घेऊन श्रवण केलें व त्यापासून ( विष्णुरूपी मत्स्येंद्रनाथापासून ) तें ज्ञान परंपरेनें ज्ञानेश्वरमहाराजापर्यंत आलें; म्हणूनही ह्या संप्रदायाला वैष्णव संप्रदाय म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. आपल्या 'गोरक्षकिमयागार' नामक ग्रंथात गोरक्षनाथानीं मत्स्येंद्रनाथास 'महाविष्णु साई' ( महाविष्णु स्वामी ) असें म्हटलें आहे, त्यावरूनही मत्स्येंद्रनाथ 'विष्णुस्वामी' होते हें सिद्ध होतें ज्ञानदेव विष्णुस्वामीसांप्रदायांतील असून त्या संप्रदायाचे आदिगुरु त्रिपुरारि होते असें नाभाजीनें म्हटलें आहे. असो. ह्या विषयाचा यापेक्षां येथे जास्त विचार करायला नको. ज्ञानेश्वरमहाराजांच्या संप्रदायाचे आदिगुरु आदिनाथ शंकर होते तरी हा संप्रदाय वैष्णवसंप्रदायच होय.

९. शिवदिन केसरींचे शिष्य मालुनाथ यांनीं संप्रदायपरंपरेवर ११ श्लोक केले आहेत, त्यांतील पहिले सहा श्लोक पुढें देऊन हें प्रकरण पुरें करितों:—

**गुणातीत अव्यक्त विद्याविलासी। मुळारंभ आरंभ ऐश्वर्यतेसी ॥**
**सर्व सर्वदा सच्चिदानंद आस्था। नमस्कार माझा तया आदिनाथ**
**अतीसौख्यमाहेर जें सज्जनांचें। परंधाम विश्राम योगेश्वरांचें ॥**
**निरालंबदेशीं अनूपम्य राजा। नमस्कार मत्स्येंद्रनाथासि माझा**
**गुरूभक्ति जेथूनि रूपासि आली। महासिद्धि ज्यापासुनी व्यक्त झाली ॥**
**कसा धांवण्या धांवतो दीनकाजा। नमस्कार गोरक्षनाथासि माजा ॥ ३ ॥**
**अनाहात शिंगी स्फुरे लक्ष मुद्रा। अखंड स्वरूपस्थिती योगनिद्रा**
**जयाचा बहू आश्रयो योगयुक्ता। नमकार माझा तया गैनिनाथा**
**चळे ना ढळे नाटळे कर्ममार्गें। उपायाविणें सांपडे संतसंगें ॥**
**समाधानवृत्ती जया सत्यबोधी। नमो त्या निवृत्तीस भावेंचि आधीं ॥ ५ ॥**
**प्रतापें गुणें आगळा सूर्य जैसा। स्वयंज्योति शुद्धप्रकाशीत तैसा**
**जयाची असे या जगीं पूर्ण सत्ता। नमस्कार माझा तया ज्ञानना**

# ४ मुंज व वेदशास्त्रमर्यादा.

**शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें ।**
**जें घेयवी तें न म्हणावें । विषही विरु ॥ ४६० ॥**

—श्रीज्ञानेश्वरी अ० १६

१ मुलांच्या मुंजीबद्दलची विठ्ठलपंतांची चिंता व ब्रह्मवृंदाचा निकाल. २ प्रयागक्षेत्रीं गंगायमुनांच्या संगमांत विठ्ठलरुक्मिणींचें देहविसर्जन. ३ ब्रह्मवृंदाच्या निकालाच्या योग्यायोग्यतेचें विवेचन व विठ्ठलपंतांची स्वधर्मप्रीति, ब्रह्मनिष्ठा व मनोधैर्य. ४ ज्ञानेश्वरादिकांचें बाळपण. ५ वर्णाश्रमधर्म पाळणें अवश्यक कीं अनवश्यक याबद्दल निवृत्ति, ज्ञानेश्वर व सोपान यांचा संवाद व वेदविधि अवश्य पाळणेंच युक्त असा ज्ञानेश्वरांचा सिद्धांत.

१. मुलें मोठीं झालीं व त्यांचें मुंजीचें वय जात चाललें, तेव्हां विठ्ठलपंतांस काळजी उत्पन्न झाली. रुक्मिणीबाईनींही विठ्ठलपंतांमागें मुलांच्या मुंजीचा लकडा लाविला! गृहस्थाश्रमांत पुन्हां शिरल्यापासून विठ्ठलपंतांच्या कुटुंबावर ब्राह्मणांनीं कडकडित बहिष्कार घातला होताच; तथापि ब्राह्मणपणाला वैगुण्य येण्यासारखें आपल्या आचरणांत कांहींच निंद्य नसल्यामुळें ब्राह्मणांचा राग कालांतरानें कमी होऊन मुलांच्या मुंजीच्या वेळीं तरी प्रायश्चित्तानें पूर्ववत् आपल्या ब्राह्मणसमाजाला आपण मान्य होऊं अशी विठ्ठलपंतांस आशा होती. पण ब्राह्मण कांहीं ऐकेनात. संन्यासाश्रमांतून खालीं गृहस्थाश्रमांत घरंगळलेला ब्राह्मण पूर्वीं कोणीही न झाल्यामुळें अशा ब्राह्मणाच्या मुलांच्याबद्दल शास्त्रांत अनुकूल आधार सांपडणें अशक्य होतें. माझीं मुलें जातिकुळावेगळीं पडूं नयेत मग त्यासाठीं काय वाटेल तें प्रायश्चित्त घेण्याचा प्रसंग आला तरी हरकत नाहीं असा विठ्ठलपंतांचा निर्धार झाला; त्यांनीं ब्राह्मणवृंदासमोर साष्टांग नमस्कार घातला व प्रार्थना केली

कीं, " आम्हां पतितांना आपण पावन करून घ्या, माझे सर्व अपराध थोरपणानें पोटांत घाला, मीं केवळ गुर्वाज्ञापालन हा स्वधर्म म्हणून पुन्हां गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला, कामवासनेनें वश होऊन केला नाहीं, आपण कराल तो दंड भोगावयास मी तयार आहें. सांगाल तें प्रायश्चित घेतों, मला पावन करून घ्या व माझ्या मुलांच्या मुंजी होतील असा धर्मशास्त्रार्थ शोधून मला योग्य निर्णय द्या." विठ्ठलपंतास आपल्या मुलांना हा बहिष्कार जन्मभर भोगावा लागेल ही कल्पना मनांत येऊन महद्दुःख झालें व त्यांनीं शुद्ध भावानें व सद्गदितःकरणानें:—

**समस्तसंपत्समवाप्तिहेतवः । समुत्थितापत्कुलधूमकेतवः ।**
**अपारसंसारसमुद्रसेतवः । पुनंतु मां ब्राह्मणपादपांसवः ॥१॥**

असें म्हणून विठ्ठलपंतानें ब्राह्मणांपुढें लोटांगण घातलें व त्याप्रमाणेंच रुक्मिणीबाईनींही केलें. हें दांपत्य वैराग्यसंपन्न होतें खरें, पण हिऱ्यां-सारख्या आपल्या मुलांकडे पाहून या मुलांच्या मुंजी आपण असतांनाही जर झाल्या नाहींत तर हीं मुलें ब्राह्मणपणांतून उठतील व आपल्या वंशावळीचा ब्रह्मसंबंध सुटल्यामुळें कुळाचा अधःपात होईल ही कल्पना मनांत येऊन त्या उभयतांच्या अंतःकरणांत चर्र होई. वस्तुतः वैराग्य-ज्ञानसंपन्न स्त्रीपुरुषांस मोह होऊं नये, पण कोमल अर्भकांचे आणि त्यांतही स्वापत्यांचे निर्विकार, निर्मल व आनंदपूर्ण चेहरे पाहून मोठ्यामोठ्यांचेंही वैराग्य लटपटतें. आपल्या मुलांचें अवतारीपण—त्यानें आपल्या मुखांत चतुर्मुखभुवनें दाखविलीं तरी—विसरून जाऊन यशोदेला कृष्णाबद्दल पुत्र-भावाचा मोह होतच असे ! हीं आपलीं मुलें सामान्य कोटींतलीं नाहींत हें विठ्ठलरखुमाईस कळून चुकलें होतें. त्र्यंबकेश्वराच्या फेरींत वाघाच्या दर्शनानंतर पांगापांग झाली तेव्हां निवृत्तिनाथ चुकून गैनीनाथांच्या गुहेंत शिरले व त्या महात्म्यानें त्या अर्भकावर अनुग्रह केला ही गोष्ट विठ्ठलपंतांस कळल्यापासून तर मुलांच्या अलौकिकपणाबद्दल त्यास फारच कौतुक वाटत असे. रामानंदस्वामींनीं पुन्हा गृहस्थाश्रमांत शिर-

ण्याची आज्ञा केली तेव्हां एकांतांत ‘ तुला तुझ्या स्त्रीच्या संगापासून जीं मुलें होतील तीं त्रिभुवनविजयी होतील ’ असें सांगितल्याचेंही त्यांच्या स्मरणांत होतें. आधीं स्वतःचीं मुलें आणि त्यांत अशीं दिव्यगुणोपेत, मग कोणत्या बापाला त्यांच्याबद्दल प्रेम उत्पन्न झाल्याशिवाय राहील ? तेव्हां विठ्ठलरखुमाईंस आपल्या मुलांबद्दल साहजिकच प्रेम वाटे. पण त्यांच्या मुंजीसच प्रतिबंध होतोसें पाहून त्यांच्या मनोरथांच्या साऱ्या उतरंडी ढांसळल्या. ब्राह्मणांनीं त्यांस सांगितलें कीं, “ तुमच्या अपराधास शास्त्रांत कोठेंही प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं व तुमच्या मुलांच्या मुंजी होण्यास शास्त्राची अनुज्ञा नाहीं. तुमचा अपराध एवढा घोरतम आहे कीं त्यास देहांतप्रायश्चित्ताशिवाय दुसरी शिक्षा नाहीं ! !”

२. ब्राह्मणांचा हा निर्णय ऐकून विठ्ठलपंतांनीं त्या निर्णयास मान लवविली व तो आपण अंमलांत आणण्यास तयार आहोंत असें दर्शविलें. त्यांनीं आपलें मन घट्ट केलें, स्त्रीपुत्रादिकांचा मोह सोडला, ब्राह्मणांस वंदन केलें व पुन्हां मागें न पाहतां जे तडक निघाले ते वैराग्य आणि त्याग हे आपले सवंगडे बरोबर घेऊन प्रयागक्षेत्रीं गेले आणि तेथें शांतमनानें श्रीगंगायमुनांच्या ओघांत त्यानीं आपल्या देहाचें विसर्जन केलें ! त्यांच्याबरोबरच रखुमाबाईही प्रयागास गेल्या व जेथून पतिराजांनीं गंगोदकांत उडी घातली तेथूनच पतिस्मरणपूर्वक त्या महासतीनेंही अपत्यांचा किंवा स्वदेहाचा मोह न ठेवतां उडी घातली ! ! याप्रमाणें विठ्ठलरुक्मिणी यांनीं नश्वर देहाचा त्याग केला व अविनाश पदावर ते आरूढ झाले.

३. देहदंडाची शिक्षा ब्राह्मणांच्या मुखानें कानांवर पडतांच धर्मशास्त्रज्ञांना प्राणांहूनही प्रिय मानणारे विठ्ठलपंत प्रयागाकडे कसे चालले याबद्दल नामदेवराय म्हणतातः—

**देहांत प्रायश्चित्त असें या बोलिलें । विचारूनि भले हित करा ॥३॥**
**श्रीपाद म्हणती अवश्य करीन । देह हे दंडीन अनुतापें ॥ ४ ॥**
**त्रिवेणीसंगमीं घालीन कवतीं । गेला पूर्वस्थिती वीतरागें ॥ ५ ॥**
**दारा पुत्र गृह त्यजुनी निघाला । नमस्कार केला द्विजवृंदा ॥ ६ ॥**

**झडझडा जाती परतोनि न पाहती । नाहीं पुनरावृत्ति म्हणती द्विज त्याग आणि वैराग्य हेंचि प्रायश्चित्त । झाला शुचिर्भूत गुरुकृपें ॥८॥**

वेदशास्त्रज्ञ ब्राह्मणांनीं देहांतप्रायश्चित्ताची जी शिक्षा सांगितली ती ऐकून विठ्ठलपंतांनीं ब्राह्मणांना नमस्कार केला व 'आपण म्हणतां तसें अवश्य करीन' असें मोठ्या धैर्यानें सांगून ते प्रयागास गेले व खरोखरीच त्यांनीं देहांतप्रायश्चित्त घेतलें; यावरून त्यांची जाज्वल्य धर्मनिष्ठा, कडकडीत वैराग्य आणि तीव्र त्यागबुद्धि हे असामान्य गुण व्यक्त होतात. गृहाश्रमाचा व विषयांचा पूर्ण तिटकारा आला असूनही केवळ गुर्वाज्ञा म्हणून पुन्हां गृहाश्रम स्वीकारण्यांत त्यांनीं पूर्वीं जसें अलौकिक मनोधैर्य दाखविलें होतें, त्याचप्रमाणें शास्त्राज्ञेला मान लवविण्यासाठीं म्हणूनच त्यांनीं या वेळेसही स्त्रीपुत्रादिकांचा मोह सोडून प्राणिमात्रास अत्यंत प्रिय जो देह त्याचाही संतोषानें त्याग केला! ह्यावरून विठ्ठलपंतांना ज्ञानेश्वरादि महात्म्यांनीं पितृत्वाचा अधिकार दिला तो योग्य होता असेंच म्हणावें लागतें. गुरु आणि शास्त्र ह्यांविषयीं त्यांच्या मनांत किती पूज्यता वसत होती हें वरील दोन्ही प्रसंगांवरून चांगलें लक्षांत येतें. आपल्या सुखाला गुरुवाक्य आणि शास्त्र आड येत नाहींत तोंवर त्यांना मान देणारे लोक बरेच सांपडतील, पण सर्वस्वाची हानि होण्याचा प्रसंग प्राप्त झाला तरी त्यांच्या मर्यादा पाळणें हें अत्यंत श्रेष्ठ अशा विभूतींशिवाय कोणाच्याही हातून होणें शक्य नाहीं. सांप्रतकाळीं शास्त्राज्ञा झुगारून मनाला येईल तें करणें हेंच मनोधैर्याचें लक्षण मानलें जातें, पण धर्माचे, समाजाचे व देशाचे कायदे आपल्या हिताचे आड येत आहेत असें स्पष्ट दिसत असून त्या कायद्यांच्या, त्या शास्त्राज्ञेच्या पुढें आपलें सर्व ऐहिक सुख ओवाळून सांडायला तयार होणें हेंच खरें मनोधैर्य आहे, असें श्रेष्ठांच्या आचारावरून स्पष्ट दिसतें. ग्रीस देशाचा प्रख्यात तत्त्ववेत्ता व साधुपुरुष साक्रेटीस याच्यावर जेव्हां त्याच्या समकालीन क्षुद्रपुरुषांनीं बालंट उभें करून त्याला 'देहांतप्रायश्चित्ता'ची जबर शिक्षा दिली तेव्हां त्याला तुरुंगांतून सोडविण्यास त्याचे अनेक भक्त तयार असतांनाही

कोर्टानें दिलेली शिक्षा त्यानें संतोषानें सोसली व कोर्टाच्या हुकुमाप्रमाणें विषाचा प्याला घेऊन देहत्याग केला. साक्रेटिसावर मत्सरी लोकांनीं कुभांड तरी रचलेलें होतें. तसा प्रकार विठ्ठलपंतांना देहांतप्रायश्चित्ताची शिक्षा देणाऱ्या आळंदीकर वेदज्ञ व शास्त्रज्ञ ब्राह्मणांचा नव्हता. संन्यासानंतर गृहस्थाश्रमांत शिरणारा ब्राह्मण जर पूर्वीं कधीं झालाच नव्हता म्हणजे अशा रीतीचा गुन्हाच जर पूर्वीं कधीं झाला नव्हता तर त्याला शास्त्रांत प्रायश्चित्त तरी कोठून असणार ? आणि तसें नसल्यामुळें विठ्ठलपंताला कोणत्या आश्रमांतला व कोणत्या वर्णाचा पुरुष म्हणावें याची त्यांना पंचाईत पडली व तो परम पतित आहे असें ठरवून त्यांनीं त्याला जबर शिक्षा सांगितली. विठ्ठलपंतांचें वैराग्य, ज्ञान व योग्यता लक्षांत आणून त्यांनीं अपवादादाखल त्याला मुक्त केलें असतें किंवा शास्त्राला थोडेंसें चालन देऊन किंवा त्यांत अपवादप्रकरणीं स्वतंत्र नियम ठरवून जर क्षमा केली असती तर सोन्याहून पिंवळें म्हणतां आलें असतें; पण एवढें बुद्धिवैभव व धमक त्या ब्राह्मणांत नसल्यामुळें त्यांनीं रूढ शास्त्रार्थाप्रमाणें त्याला गुन्हेगार ठरविलें. जगाच्या इतिहासांत असे प्रसंग हरहमेष येतात व अपवादभूत विभूतींसाठीं अपवाद करावयाला पाहिजे असतात ते न केल्यामुळें त्यांना ह्या जगांत अपार दुःखें भोगावीं लागतात. स्त्रीनें परपुरुषाच्या गृहांत अल्पकाळही राहणें हा गुन्हा आहे व त्याला त्यागासारखी कडक शिक्षा असणें हेंही उचित आहे. पण हा न्याय सीतेसारख्या महासतीलाही लागू व्हावा काय ? परटाच्या शब्दावरून रामानें गरोदर व परमप्रिय स्त्रीला वनांत पाठविलें. सीतेची योग्यता माहीत असून व तिच्यावर त्याचें परम प्रेम असूनही त्यानें इक्ष्वाकुवंशाच्या धवल यशाच्या रक्षणासाठीं तिचा त्याग केला ! तेव्हां श्रीरामानें म्हटलें आहे:—

**कष्टं जनः कुलधनैरनुरंजनीय-**
**स्तन्मे यदुक्तमशिवं नहि तत्क्षमंते ।**

**नैसर्गिकी सुरभिणः कुसुमस्य सिद्धा**
**मूर्ध्नि स्थितिर्न चरणैरवताडनानि ॥ ५ ॥**
( —उत्तररामचरित्र अंक १. )

सुरभिपुष्पांची योग्यता डोक्यावर राहण्याची असून त्यांना पुष्कळदां जग हें पायाखालीं तुडवीत असतें. जग हें आहे असें आहे. विठ्ठलपंतांचा विवेकवैराग्य लक्षांत घेतां व ज्ञानेश्वरादि दिव्य पुत्ररत्नांचे ते जनक आहेत ही गोष्ट मनांत आणतां त्यांना जगानें ह्यापेक्षा किती तरी अधिक प्रेमानें व आदरानें वागवावयाला पाहिजे होतें असें आपणांस वाटतें. पण त्या वेळच्या त्यांना शिक्षा देणाऱ्या ब्राह्मणांनाही फारसा दोष देववत नाहीं. 'तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ' हा श्रीहरीचा कायदा हिंदुमात्राला मान्य आहे व त्याप्रमाणें त्यांनीं न्यायनिष्ठुर असा निर्णय दिला. विठ्ठलपंतही थोर मनाचे महात्मे असल्यामुळें 'शास्त्र म्हणेल जें सांडावें। तें राज्यही तृण मानावें। जें घेववी तें न म्हणावें। विषही विरु' (ज्ञानेश्वरी अ. १६–४६०) ह्या न्यायानें त्यांनीं देह तृणवत् मानून शास्त्र व त्याचा निर्णय सांगणारे ब्राह्मण यांच्याविषयींची आपली अपार पूज्यबुद्धि जगाला जाहीर केली. कोणी म्हणेल कीं, संन्यास घेतल्या-वर ते पुन्हां गृहाश्रमांत शिरले हा त्यांनीं शास्त्राज्ञाभंग पूर्वीं नव्हता कां केला ? तर यावर असें उत्तर देतां येईल कीं, ते आपल्या आवडीनें तेव्हां तसे वागले असते तर त्यांना कांहींच किंमत देतां आली नसती; पण ते आपल्या गुरूच्या आज्ञेनें वागले असल्यामुळें व 'गुरुवाक्यावांचून शास्त्र। हातीं न शिवे' (ज्ञानेश्वरी अ० १३–४४८) म्हणजे गुरु सांगेल तें शास्त्र किंवा गुर्वाज्ञा हेंच शास्त्र असें मानणारे ते गुरुभक्त असल्यामुळें त्यांनाही त्या बाबतींत बिलकुल दोष देतां येत नाहीं. ह्या दुसऱ्या प्रसंगीं त्यांचे गुरु विद्यमान असते तर त्यांनीं आळंदीच्या ब्राह्मणांना सल्ला विचारण्यापूर्वीं गुरूंनाच विचारला असता, पण त्यांच्या अभावीं शास्त्र-रक्षक ब्राह्मणांपुढें आपलें प्रकरण न्यायासाठीं ठेवणें त्यांना जरूर होतें. त्यांच्याइतका उज्वल ब्राह्मण त्यांच्या काळींही विरळच आढळला

असता व 'तीर्थोदकं च वन्हिश्च नान्यतः शुद्धिमर्हतः' ह्या भवभूतीच्या उक्तीप्रमाणें त्यांच्यासारख्या प्रखर नीतिमत्तेच्या पवित्र ब्राह्मणाला प्रायश्चित्तादिकांची अवश्यकताही नव्हती; तथापि अंगीं अलौकिक योग्यता असूनही सामान्य लोकांप्रमाणें शास्त्राज्ञा सर्व प्रकारें पाळण्याचें थोरांचें जें ब्रीद तें त्यांच्या अंगीं असल्यामुळें ते ब्राह्मणांकडे निकालासाठीं गेले व त्यांनीं दिलेला निकाल त्यांनीं शिरसावंद्य केला. राजाचे कायदे मोडणारे जसे राजद्रोही, तसे धर्माचे व समाजाचे कायदे मोडणारे पुरुष धर्मद्रोही व समाजदोहीच समजले पाहिजेत. कोणताही कायदा मोडणारा पुरुष बंडखोरच म्हटला पाहिजे. कायदे वरचेवर बदलूं नयेत असें नाहीं, पण पहिला कायदा बदलून सभ्य, सुशील व निरपेक्ष अशांच्या बहुमतानें दुसरा कायदा त्याच्या जागीं चालूं होईपर्यंत पहिल्या कायद्यापुढें मान वांकविणें हें सर्व सज्जनांचें काम आहे व त्यासाठीं हव्या त्या आपत्ति भोगाव्या लागल्या तरी त्या निमूटपणें—इतकेंच काय पण आनंदानें सोसणें हें धैर्याचें काम ज्या वीरपुरुषांच्या हातून होतें ते सर्व समाजांत सर्वकाळ परमवंद्यच समजले पाहिजेत. पुष्कळदां असें होतें कीं, सामान्य लोकांसाठीं केलेले नियम एखाद्या असामान्य विभूतीसाठीं बाजूला ठेवणें अवश्य होतें, पण तसें बहुधा घडत नसल्यामुळें त्या विभूतीला ह्या जगांत पुष्कळ दुःख भोगावें लागतें, व 'तुका म्हणे तोची संत। सोशी जगाचे आघात' ह्या न्यायानें आघात सोसल्यावांचून संतपणाही जगाच्या निदर्शनाला येत नाहीं. संत अशा आघाताबद्दल कुरकुर करीत नाहींत. विठ्ठलपंतासारख्या वैराग्यज्ञानसंपन्न सुब्राह्मणाच्या प्रकरणांत ब्राह्मणांनीं शास्त्राच्या कठोरपणाखालीं त्यांना चेपलें नसतें तर बरें झालें असतें असें सामान्यतः सर्वांस वाटतें, पण त्याबरोबर हाही विचार लक्षांत ठेविला पाहिजे कीं थोरांचा थोरपणा तरी अडचणीशिवाय कसा प्रकट व्हावा! क्लेश कोणासही नकोच असतात, पण क्लेशांना भिऊन जर थोर वागते तर खरे थोर व ढोंगी यांच्यांतला भेदही जगाला कळला नसता! आपत्तीच्या कसावरच थोरांचें थोरपण जगाच्या प्रत्ययास येत असल्यामुळें थोरांच्या

आपत्तीबद्दल वैषम्य वाटूनही उपयोग नाहीं. वीर आणि भ्याड, साव आणि चोर, सच्चा आणि लुच्चा, संत आणि ढोंगी यांच्यांतला फरक आपत्तीमुळेंच प्रकट होतो, नाहींतर त्यांची जगांत खिचडी झाली असती ! असो. ह्या विवेचनाचें तात्पर्य इतकेंच आहे कीं, विठ्ठलपंताची विरक्तता व धर्मनिष्ठा सर्व आळंदीकर ब्राह्मणांच्या न्यायनिष्ठुर निर्णयामुळें लोकांच्या निदर्शनास आली. वरील विवेचन विठ्ठलपंतांस जसें लागू आहे तसें तें रखुमाबाईसही लागू आहे. तीही माउली आपणांस विठ्ठलपंताइतकीच पूज्य आहे. ज्या रखुमाबाईच्या पवित्र कुशीला ज्ञानेश्वरमहाराज जन्मले ती कुशी धन्य होय. त्यांच्या संपूर्ण चरित्राचा विचार मनांत आला म्हणजे खास वाटतें कीं, निवृत्तिप्रभृति सूर्यासारखीं अपत्यें प्रसविण्याचा त्यांचा अधिकारच होता. त्यांत कार्यकारणसंबंध आहे. विठ्ठलपंतांचें वैराग्य व रखुमाबाईचें पातिव्रत्य आणि भक्ति खरोखर एवढ्या योग्यतेची होतीं कीं त्यांच्या पोटीं सामान्य मुलें जन्मणेंच अशक्य होतें! ती माउलीही आपल्या पतीबरोबरच प्रयागतीर्थीं मुक्त झाली. विठ्ठलपंत व रुक्मिणी म्हणजे मूर्तिमंत वैराग्य आणि भक्ति होत व वैराग्य आणि भक्ति यांच्या पोटीं निवृत्ति, ज्ञान, सोपान व मुक्ति उद्भवणें ही गोष्ट अगदीं सहजांतली सहज आहे!!

४. निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपानदेव व मुक्ताबाई यांना परमेश्वरी कृपेच्या स्वाधीन करून त्यांचे आईबाप निघून गेले तेव्हां निवृत्तिनाथांचें वय फार तर दहा वर्षांचें होतें. यानंतर हीं लहान लहान मुलें कांहीं दिवस आपेगांवास म्हणजे आपल्या पूर्वजांच्या गांवीं राहण्यास गेलीं. तेथें गेल्यावर त्यांच्या भाऊबंदांनीं त्यांना घरांत येऊं दिलें नाहीं व त्यांच्या इस्टेटीचा वांटाही त्यांस दिला नाहीं. त्यांना घर ना दार असें होऊन गेलें. मातीविटांचें घर व थोडासा जमिनीचा तुकडा एवढी त्यांची लहानशी इस्टेट नव्हती. त्यांचे भाऊबंद संकोचून लहान होऊन बसले होते, पण त्यांनीं ब्रह्मांडाचें आपोशन घेतलें होतें. भुवनत्रय हें त्यांचें घर होतें. ' हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण

जाहला' ( ज्ञानेश्वरी अ० १२–२१३ ) ह्याप्रमाणें ते मोठे होऊन विश्व भरून उरले. असो. तेथें असतांना निवृत्ति व ज्ञानेश्वर यांनीं कोरान्न-भिक्षेस बाहेर पडावें व सोपानदेवानें लहानग्या मुक्ताबाईस सांभाळावें असा क्रम होता.

**तात आणि माता गेलीसे येथून । तेव्हां आम्ही लहान पांडुरंगा**
**निवृत्ति ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न । सांभाळी सोपान मजलागीं**

असे उद्गार मुक्ताबाईनें आपेगांवास समाधिपूर्वी आल्यावेळीं काढले आहेत. विठ्ठलरुक्मिणी आपल्या मुलांस श्रीकृष्णाच्या दयेवर टाकून प्रयागास गेलीं तेव्हां तींही आपेगांवाहूनच गेलीं असें वरील उताऱ्यावरून स्पष्ट होतें. ह्या दोन्ही गोष्टींवरून असें वाटतें कीं, विठ्ठलपंतांनीं गुर्वाज्ञे-प्रमाणें पुन्हां गृहाश्रम स्वीकारल्यावर ते आपेगांवास स्वगृहींच राहिले व पैठणकर ब्राह्मणांनीं त्यांना देहांत प्रायश्चित्ताचा दंड सांगितल्यावर ते प्रयागास गेले आणि यानंतर निवृत्तिनाथादि भावंडें पैठणच्या चमत्कारा-नंतर आळंदीस जाऊन राहिलीं.

५. आपल्या तिघां भावंडांस सवें घेऊन निवृत्तिनाथ आळंदीस आले. आपला व्रतबंध अवश्य झालाच पाहिजे असें निवृत्तिनाथास वाटत नव्हतें. ते केवळ शिवस्वरूप झाले होते. देहाची कोणाला शुद्ध होती ? 'मी ब्राह्मण व माझी मुंज झालीच पाहिजे' असें त्यांच्या वृत्तीवरच उमटत नव्हतें. ते खरोखरी निवृत्तिच होते. सर्व वृत्तींच्या पलीकडचें जें आपलें निजरूप त्या निजरूपाच्या चिंतनांत ते निमग्न असत. 'आपण ब्राह्म-णांच्या पायां पडूं. त्यांना विनंति करून आपल्याला पावन करून घेऊं व व्रतबंधसंस्कार करून घेऊं' असें ज्ञानेश्वरांचें म्हणणें होतें. ते वर्णाश्रम-धर्माच्या रक्षणासाठीं अवतरले होते, तेव्हां त्यांनीं आपल्या अवतारकार्या-कडे लक्ष देऊन निवृत्तिनाथांच्या मागें निकड लाविली कीं ब्राह्मणांचा आपण निर्णय घेऊं या. यासंबंधीं त्या तिघांही भावंडांचा जो संवाद झाला तो मोठ्या मजेचा आहे. नामदेवराय, महिपतिबोवा व निरंजनमाधव ह्या

तिघांनींही तो आपापल्या ग्रंथांत अनुक्रमें अभंग, ओंवी व श्लोक ह्या वृत्तांत दिला आहे. आळंदीच्या ब्राह्मणांनीं निवृत्तिनाथास जेव्हां सांगितलें कीं, 'तुम्ही पैठणास जा व तेथील ब्राह्मणांकडून शुद्धिपत्र घेऊन या.' तेव्हां निवृत्तिनाथ प्रथम म्हणाले:—

## अभंग.

नाहीं जातिकुळ वर्ण अधिकार । क्षेत्री वैश्य शूद्र द्विज नव्हे ॥ १ ॥
नव्हों देवगण यक्ष ना किन्नर । ऋषि निशाचर तेही नव्हों ॥ २ ॥
ते आम्ही अविनाश अव्यक्त जुनाट । निजबोधें इष्ट स्वरूप माझें ३
नव्हे आप तेज वायु व्योम मही । महत्तत्त्व तेंही विराट नव्हे ॥ ४
नव्हे मी सगुण नव्हे मी निर्गुण । अनुभूतीं भजन होउनि नव्हे ५
निवृत्ति म्हणतसे ऐक ज्ञानेश्वरा । माझी परंपरा ऐसी आहे ॥ ६ ॥

## ओंवी.

निवृत्ति म्हणे ब्राह्मणांसी । काय जाऊन सांगूं त्यांसी ।
वर्णयातिकुळ आम्हांसी । बोलावयासी ठाव नाहीं ॥ १ ॥
वैश्य क्षत्रिय ना ब्राह्मण । अविनाश जुनाट पुरातन ।
निजबोध निघोट स्वरूप जाण । असे आमुचें सर्वथा ॥ २ ॥

## श्लोक.

नसे मातें कांहीं कुळ अकुळ मी ब्राह्मण नव्हे
नव्हे क्षत्री वैश्यांतरि वृषल जातीं न गणवे ।
नव्हे पक्षी नोहे मृगगणपशू वृक्ष जड ही
बटू संन्यासी हो वनचर नव्हे आश्रमगृहीं ॥ १ ॥
न हो आम्ही कांहीं त्रिगुणाचि, महत्तत्व अथवा
विराटात्मा नोहे, अगुण तरि मी जाण बरवा ।
नव्हे कांहीं जें जें वदति जन जें त्याहुनि पर
स्वरूपानंदीं मी निखिलसुखचैतन्य सपुर ॥ २ ॥
आम्हां धर्माधर्मीं किमपि तरि संपर्क न दिसे ।
निषेधाचा हो कां किमपि विधिनिर्बंध न दिसे ।

**नसे भेदाभेदीं अढळ निजरूपीं दिसतसे**
**अशा बोधानंदीं सहज सहजीं मी वसतसे ॥ ३ ॥**

यावर ज्ञानेश्वरमहाराज म्हणाले:—

**विधि वेद 'विरुद्ध' संपर्क संबंध । नाहीं भेदाभेद स्वस्वरूपीं ॥१**
**अविधि आचरण परम दूषण । वेदोनारायण बोलियेला ॥ २ ॥**
**स्वधर्म अधिकार जातिपरत्वभेद । उचित तें शुद्ध ज्याचें तया ३॥**
**म्हणोनियां संतीं अवश्य आचरावें । जनां दाखवावें वर्तोनियां ४**
**कुळींचा कुळधर्म अवश्य पाळावा । सर्वथा न करावा अनाचार ५**
**प्रत्यवाय आहे अशास्त्रीं चालतां । पावन अवस्था जरी जाली ॥६**
**ज्ञानदेव म्हणे ऐकाजी निवृत्ति । बोलिली पद्धती धर्मशास्त्रीं ॥७॥**

याच अर्थाचें ज्ञानेश्वरमहाराजांचें भाषण महिपति व निरंजनमाधव यांनीं दिलें आहे, पण त्यांचे उतारे विस्तारभयास्तव न देतां निवृत्तिनाथ व ज्ञानेश्वरमहाराज यांच्या वरील भाषणांचाच विचार करूं. निवृत्तिनाथ आपल्या सहजस्थितीच्या बाजूनें बोलले आहेत व ज्ञानेश्वरमहाराज धर्मशास्त्राच्या बाजूनें बोलले आहेत. "जातिकुळवर्णाचा विचारच आमच्या मनाला शिवत नाहीं. अविनाश, अव्यक्त, जुनाट म्ह० सर्वांचें आद्य तें माझें निजरूप आहे. तें सगुणनिर्गुणातीत आहे व अद्वैतानुभवांत होणाऱ्या अभेदभक्तीनेंही तें प्राप्त झालेलें नव्हे. तें सहजसिद्ध आहे. असें सहजपणानें असणारे आम्ही असल्यामुळें व्रतबंधादि विधि व प्रायश्चित्तादि संस्कार इत्यादिकांची आम्हांस कांहीं अवश्यकता नाहीं," हा निवृत्तिनाथांच्या भाषणाचा सारांश आहे. यावर ज्ञानेश्वरमहाराजांनीं जें उत्तर केलें तें असें:—"वेदविहित किंवा वेदविरुद्ध आचरण यांचा स्वस्वरूपीं संबंध नाहीं म्ह० स्वस्वरूपीं भेदाभेद नाहीं हें खरें आहे. सूर्य मेघानें लिंपत नाहीं किंवा सोनें माती धरीत नाहीं या गोष्टी मला मान्य आहेत. तथापि अविधि आचरण हें परमदूषणास्पद आहे अशी वेदोनारायणाची आज्ञा आहे व ती आपण पाळली पाहिजे. प्रत्येकानें आपापल्या स्वधर्माप्रमाणें वागलें पाहिजे. जें ज्याचें उचित म्ह० विहित आहे तोच

त्याचा शुद्ध धर्म होय. त्याप्रमाणें प्रत्येकानें वागावेंच, पण संतांनीं तर स्वधर्माचार अवश्य पाळले पाहिजेत. त्यांचा कित्ता लोक घेत असतात म्हणून त्यांनीं वर्णाश्रमजातिधर्माप्रमाणें स्वतः वागून इतरांना तसें वागावयाला शिकविलें पाहिजे. नाहींतर समाज निर्बंध होऊन अनाचार माजेल. 'जरी अवस्था पावन झाली' म्हणजे पूर्णबोधाचा उदय होऊन स्वरूपप्राप्ति झाली तरी सुद्धां अशास्त्र म्हणजे शास्त्रविरुद्ध वागण्यास प्रत्यवाय आहे. तात्पर्य "व्रतबंधादि विधि व प्रायश्चित्तादि सर्व संस्कार आम्हांला पाहिजे आहेत" हें ज्ञानेश्वरमहाराजांचें भाषण मनन करण्यासारखें आहे. सिद्ध पुरुषानें सुद्धां वेदबाह्य वागूं नये इतकेंच काय पण इतरांना मार्ग लागावा म्हणून त्यानें अधिकच आस्थेनें वागलें पाहिजे. 'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः' ह्या गीताश्लोकावर व त्याच्या पूर्वींच्या श्लोकांवर टीका करतांना महाराजांनीं स्पष्ट सांगितलें आहे:—

**देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले ।**
**तयांही कर्तव्य असें उरलें । लोकांलागीं ॥ १५५ ॥**
**मार्गीं अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा ।**
**अज्ञाना प्रकटावा धर्म तैसा । आचरोनी ॥ १५६ ॥**
**हां गा ऐसें न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे ।**
**तिहीं कवणेपरी जाणिजे । मार्गातें या ॥ १५७ ॥**
**एथ वडिल जें जें करिती । तया नाम धर्म ठेविती ।**
**येर तेंचि अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ १५८ ॥**
**हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न संडावें ।**
**विशेषें आचरावें । लागे संतीं ॥ १५९ ॥**

आणखी पुढें महाराजांनीं म्हटलें आहे:—

**आम्ही पूर्णकाम होउनी । जरी आत्मस्थितिं राहुनी ।**
**तरी प्रजा हे कैसेनी । निस्तरेल ? ॥ १६६ ॥**
**म्हणोनि समर्थ जो एथें । आथिला सर्वज्ञते ।**
**तेणें विशेषें कर्मातें । त्यजावें ना ॥ १६८ ॥**

'प्रजा कैसेनी निस्तरेल' ही जी महाराजांस काळजी होती तींतच त्यांच्या अवताराचें महत्व आहे. ते लोकसंस्थेचे खरे हितकर्ते होते. ते आणखी म्हणतात:—

**पुढतपुढती पार्था । हे सकळ लोकसंस्था ।**
**रक्षणीय सर्वथा । म्हणऊनियां ॥ १७० ॥**
**मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें ।**
**अलौकिक नोहावें । लोकांप्रती ॥ १७१ ॥**

ज्ञानेश्वरमहाराजांच्या अवतारकृत्याचें मर्म ह्याच गोष्टींत आहे. सर्व ज्ञानेश्वरीभर हीच गोष्टी त्यांनीं परोपरीनें सांगितली आहे. असो. ज्ञानेश्वर-महाराजांच्या भाषणानंतर सोपानदेव पुढें सरले. ते म्हणाले:—

**पांडवांचें कूळ शोधितां निर्मूळ । कुंडजार गोळ बुद्धि कैसी ॥१॥**
**भक्ति हे सरती जाति न सरती । ऐसी आत्मस्थिति स्वसंवेद्य ॥२॥**
**दुर्वास वसिष्ठ अगस्ति गौतम । हे ऋषि उत्तम कुळीचे कैसे? ॥३॥**
**व्यास आणि वाल्मीकि कोण कुळ त्यांचें । तैसेंचि आमुचें सोपान म्हणे ॥ ४ ॥**

सोपानदेवांचें म्हणणें असें पडलें कीं, "भक्ति हे सरती जाति न सरती' हा सिद्धांत सर्वमान्य असल्यामुळें आपण हरीच्या भक्तींतच रंगून आयुष्याचें सार्थक करावें व असल्या भानगडींत फारसें पडूं नये." यानंतर त्रिवर्गबंधूंचा एक विचार होऊन पैठणास ब्राह्मणांकडे शुद्धिपत्र मागण्या-साठीं जाण्याचाच विचार ठरला. हीं लहान मुलें पैठणास जाण्यास निघालीं अथवा हीं मुलें कसलीं?—

**जनांच्या नेत्रांतें लघु दिसति सर्वां वडिल हे!**
**परेच्याही होतीं पर नव्हति आलीकडिल हे ।**
**असे तीघे गेले हळुहळुच तें पैठणपुरा**
**विधी तीर्थस्नाना करिति आपणायोग्य सुकरा ॥ १ ॥**

# ५ पैठणचे चमत्कार.

अशक्य तों तुम्हां नाहीं नारायणा ।
निर्जीवा चेतना आणावया ॥ १ ॥

—श्रीतुकाराम.

१ पैठणच्या ब्रह्मवृंदासमोर! २ ब्राह्मणांचा उपदेश. ३ ज्ञानेश्वरमहाराज व पैठणचा रेडा. ४ ज्ञानेश्वरमहाराज रेड्याकडून वेद बोलवितात. ५ ब्राह्मण हतगर्व होतात. ६ ज्ञानेश्वरमहाराजांची सिद्धप्रज्ञा. ७ श्राद्ध-प्रसंग. ८ शुद्धिपत्र.

१. निवृत्तिनाथ आपलीं भावंडें बरोबर घेऊन हळूहळू चालत पैठणास जाऊन पोहोंचले. लहानगी मुक्ताबाईही त्यांनीं बरोबर घेतली होती. कारण त्यांच्याशिवाय तिला दुसरें कोण संभाळणार? गोदातीरीं स्नानविधि आटपून ते गांवांत शिरले. विठ्ठलपंतांचे मामा कृष्णाजीपंत देवकुळे हे पैठणासच राहत असत. त्यांच्या घरीं हे उतरले. चार दिवसांनीं पैठणकर ब्रह्मवृंदाची सभा भरली. तिच्यापुढें निवृत्तिनाथांनीं आळंदीकर ब्राह्मणांचें पत्र ठेवलें, त्यावरून हीं संन्याश्याचीं मुलें असून यांना व्रतबंधाचा शास्त्रार्थ पाहिजे, असें त्यांच्या लक्षांत आलें. निवृत्तिनाथांनीं ब्राह्मणापुढें साष्टांग नमस्कार घातला. आपला वृत्तांत 'होता तैसा स्पष्ट निवेदिला,' व 'आम्ही अनाथ, पतित, शरणागत, दीन आहोंत; आम्हांला कृपादृष्टीनें आपण सनाथ करून पदरांत घ्यावें' अशी त्यांनीं त्यांची प्रार्थना केली. ब्रह्मसभेंत मोठे मोठे वैदिक, शास्त्रज्ञ व श्रुतिस्मृत्यध्ययनानें विद्वान् झालेले अनेक ब्राह्मण बसले होते. हीं मुलें संन्याश्याचीं असून मुंजीचा शास्त्रार्थ मागण्यास आळंदीहून मुद्दाम आलीं आहेत असा गांवभर पुकारा होतांच शेंकडों ब्राह्मण सभास्थानीं येऊन दाखल झाले. शास्त्र्यांनीं अनेक स्मृतिग्रंथ पाहिले, पण कोठें कांहीं आधार सांपडेना.

निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपानदेव व त्यांची बहीण मुक्ताबाई हीं सभास्थानीं येऊन बसलीं होतीं. त्यांची आनंदवृत्ति, प्रसन्नता व दिव्यकांति पाहून पुष्कळ सभ्यांच्या मनांत त्यांच्याविषयीं प्रेमादर उत्पन्न झाला होता, तथापि अशा सामाजिक सभांतून कुटाळांच्या जिव्हांना मोठें अवसान चढत असतें, या नित्यानुभवाप्रमाणें याही प्रसंगीं झालें. 'संन्याश्याचीं मुलें' हे दोन शब्द त्यांच्या अंगांत विलक्षण स्फुरण आणण्यास कारण होत होते. शास्त्री लोक शास्त्रार्थ शोधीत होते, सात्विक वृत्तीच्या सदय अंतःकरणाच्या लोकांच्या मनांत त्यांच्याविषयीं प्रेम व अनुकंपा उत्पन्न झाली होती व कुटाळांच्या जिव्हांना नवी धार मिळाल्यामुळें त्या चमूचमू करीत होत्या. जनांच्या ह्या तीन वृत्तींचे खेळ पाहून निवृत्तिनाथ आपल्याशींच हंसत होते, ज्ञानेश्वरमहाराज धर्मशास्त्राचा निर्णय काय होतो व व ब्राह्मणांच्या मुखांतून काय अक्षरें निघतात त्याची मोठ्या उत्सुकतेनें वाट पाहत आहेतसें दिसत होतें व सोपानमुक्ताबाई नामजपयज्ञांत गर्क होऊन 'रामकृष्णहरी' चें चिंतन करीत होतीं. ह्या चाऱ्ही मुलांच्या मुखांवर दिव्य तेज चमकत होतें व अंतःसुख, अंतराराम आणि अंतर्ज्योति अशा ह्या बालविभूतींकडे पाहून फार थोड्या अंतर्मुख सज्जनांच्या हृदयांत कांहीं वेगळेच सुखकल्लोळ उठत होते. संतांचें वर्णन करावयाला आपणांपाशीं शब्द नाहींत म्हणून महाराजांच्याच शब्दांनीं वर्णावयाचें तर आपण म्हणूं कीः—

**ते ऐसेनि सुखें मातले । आपणपांचि आपण राहिले ।**
**ते मी जाणे निखिळ वोतले । सामरस्याचे ॥ १३७ ॥**
**ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर ।**
**कीं महाबोधें विहार । केले जैसे १३८ ॥**
**ते विवेकाचे गांव । कीं परब्रह्मींचे स्वभाव ।**
**नातरी अळंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥ १३९ ॥**

—( ज्ञानेश्वरी अ० ५ )

२. असो. त्या दिवशींच्या सभेंत खास निर्णय व्हावयाचा होता. पुष्कळ वाटाघाट आणि खल होऊन शेवटीं ब्राह्मणांनीं निर्णय सांगितला. तो आपण नामदेवरायांच्या तोंडूनच ऐकूं:—

**नाहीं प्रायश्चित्त उभयकुळभ्रष्ट। बोलियेले श्रेष्ठ पूर्वापार ॥ १ ॥**
**या एक उपाय असे शास्त्रमतें। अनन्यभक्तीतें अनुसरावें ॥ २ ॥**
**तीव्रअनुतापें करावें भजन। गो खर आणि श्वान वंदोनियां ॥ ३ ॥**

याचेंच विशेष स्पष्टीकरण निरंजनमाधव यांनीं केलेलें आहे तें असें:—

**महाजनीं निर्णय हाचि केला। नसेचि कीं निष्कृति या मुलांला**
**या धर्मशास्त्रीं विधि आढळेना। तें सांगिजे काय यया कळेना १॥**
**न सांगतांही गति साच नाहीं। महास्थळीं कीर्ति नुरेचि कांहीं ॥**
**या बोलिजे निष्कृति हेचि आतां। आहां तसें राहुनि राम चिंता २**
**अनन्यभक्ती हरिपादपद्मीं। निष्ठा धरा केवळ सौख्यसद्मीं।**
**तीव्रानुतापें भजनासि सारा। टाकोनि मायामय हा पसारा ॥ ३ ॥**
**श्रीकृष्णरूपें जग सर्व पाहा। द्विजादिचांडलखरांत देहा।**
**विलोकितां वंदन ते करावे। लेखों नये आप दुजें परावें ॥ ४ ॥**
**चित्तीं चिदानंद धरोनि राहा। चैतन्य तें एक अखंड पाहा।**
**या पद्धतीनेच तराल लोकीं। यावेगळा मार्ग तुम्हां नसे कीं ॥ ५ ॥**
**जितेंद्रियत्वेंचि वसा अखंड। न वाढवा संसृतिकाम-बंड।**
**वैराग्ययोगेंचि धरोनि पिंड। वर्ता, तुम्हां निष्कृति हे उदंड ॥ ६ ॥**

सर्वांचें तात्पर्य महिपतबावांनीं "श्रीहरीशीं जाऊनि शरण। सर्वांभूतीं करावें भजन। गोखरगजादि श्वान। समसमान वंदावे ॥" (भक्तविजय अ० ९-४२) ह्या एकाच ओंवींत सांगितलें आहे. ब्राह्मणांच्या निर्णयाचा सारांश असा आहे:—"संन्याश्याच्या मुलांची मुंज करण्यास धर्मशास्त्रांत कोठेंही विधि सांगितलेला नाहीं, म्हणून तुमच्या मुंजीस धर्मशास्त्राची आज्ञा नाहीं. प्रायश्चित्तानें तुम्हांस पावन करून घेतां येत नाहीं, म्हणून

तुम्ही आहांत असेच राहून रामाचिंतन करीत जा. सर्वाभूतीं भगवद्भाव ठेवून द्विजांपासून चांडालपर्यंत सर्वांस वंदन करीत जा. सर्व जग कृष्णस्वरूप पहा. जितेंद्रियपणानें रहा. लग्नें करून संसार वाढवूं नका. देह आहे तोंवर वैराग्यानें राहून श्रीहरीचें अनन्यभक्तीनें भजन करीत रहा म्हणजे सर्व पापांची निष्कृति होऊन तुम्ही शुद्ध व्हाल." ब्राह्मणांच्या मुखांतून हा निर्णय ऐकून निवृत्तिप्रभृतींना काय वाटलें असेल बरें! हे ब्राह्मण आपणांला पावन करून घेत नाहींत, मुंजीची परवानगी देत नाहींत, 'लग्न करून संसारांत पडूं नका' म्हणून सांगतात, याबद्दल केवळ प्रवृत्तिपरांना फार वाईट वाटून आपल्या आयुष्याची खास माती झाली असें वाटलें असतें व त्यांनीं शास्त्र व ब्राह्मण यांच्यावर खूप संतापानें दांतओंठही खाल्ले असते! पोटांत विषयलालसा असून 'विषय भोगूं नका' असें कोणीं सांगितलें तर तें मनुष्यास रुचत नसतें. पण ज्यांच्या सर्व विषयवासना जन्म जन्मांतरीच्या पुण्यकर्मानें दग्ध झाल्या आहेत ज्यांच्या हृदयमंदिरांत श्रीहरीनें कायमचें ठाणें दिलें आहे व जे आधींच निवृत्त होऊन बसले आहेत त्यांना वरील निर्णय ऐकून उलट परमानंद व्हावा यांत आश्चर्य तें काय? ज्यांना विषयांचें भानही नाहीं त्यांना विषयसेवन सोडून द्या म्हणून सांगणें ही कांहीं शिक्षा वाटणार नाहीं. "जन्मतेनि प्रसंगें। स्त्रीदेह शिवणें अंगें। तेथूनि जन्म आवघें। सोंवळें कीजे" (ज्ञाने० अ० १७–२११) हें ब्रह्मचर्याचें तत्व ज्यांच्या अंगांत खिळून राहिलें आहे त्यांना तुम्ही लग्न करून प्रपंचांत पडूं नका असें सांगणें म्हणजे कांहीं घोर दंड करणें नव्हे! तात्पर्य काय कीं, ब्राह्मणांनीं जो निर्णय दिला तो निवृत्तिज्ञानेश्वरांना उपदेशरूपच वाटला व प्रिय असाच होता. त्यांना हरिभजनांत आयुष्य खर्चण्यास व सर्वाभूतीं भगवद्भाव ठेवण्यास ब्राह्मणांनीं सांगितलें त्याप्रमाणें त्यांच्या अत्युच्च कल्पनेच्या भरारीपलीकडेही ते कसे राहिले हें सर्व जग जाणतच आहे. चारही भावंडांनीं आजन्म ब्रह्मचर्य पाळलें. व जन्मप्रसंगीं जो स्त्रीदेहस्पर्श त्यांना झाला त्यानंतर त्यांनीं सर्व जन्म सोंवळा केला आणि मायेच्या ओवळेपणाचा जेथें वाराही लागत

नाहीं अशा परमशुद्ध स्वरूपाशीं ते समरस होऊन गेले. ब्राह्मणांचा वरील निर्णय ऐकतांचः—

**ऐकोनी निवृत्ती संतोषला चित्तीं । 'धन्य तुमचे वदती तीर्थरूप'।**
**ज्ञानदेव म्हणे सांगाल तें मान्य । मुक्ताई सोपान आनंदलीं ॥ २ ॥**

तात्पर्य काय कीं चारी भावंडांना ' मनांतली गोष्टच मिळाली ! '

३. ब्राह्मणांचा आदेश ऐकून हीं मुलें आनंदीच राहिलीं आहेत हें पाहून सभासदांस आश्चर्य वाटलें. यांचीं मनें खट्टु होतील व हीं दुर्मुखलीं होऊन जातील असा बहुतेकांचा तर्क होता, पण त्यांची मुखश्री यत्किंचित्‌ही कोमेजली नसून त्यांचा आनंद कायम राहिलेला पाहून त्यांच्याविषयीं बहुतांच्या मनांत आदरभाव उत्पन्न झाला. सभा विसर्जन होण्याचा समय आला, इतक्यांत कोणी त्यांना त्यांच्या नांवांचा अर्थ काय म्हणून विचारलें. त्यांनीं नामार्थ कसा सांगितला तें आपण निरंजन माधवांच्या तोंडूनच ऐकूं—

**मी तों निवृत्ति न पडेचि प्रवृत्तिमार्गीं**
**भोगीं अखंड स्वसुखामृत राजयोगी ।**
**मी ज्ञानदेव म्हणिजे सकळागमाचा**
**वेत्ता असें कथिन मी पुसतां त्रिवाचा ॥ १ ॥**
**सोपान मी भजन दाउनि केशवाचें**
**वैकुंठ पावविन भक्तिमतांसि साचें ।**
**मुक्ताइ मुक्ति उघडी जगदीशलीला**
**दावावया प्रगटली भुवनैकलीला ॥ २ ॥**

' लघु ' मुलांच्या तोंडच्या या ' थोर ' गोष्टी ऐकून कित्येक सभासदांस अनिवार हंसू कोसळलें. इतक्यांत वाटेनें एक हल्या चालला होता त्याकडे पाहून कोणी म्हणाले कीं, " नांवांत काय आहे हो ! लोक वाटेल तीं नांवें देत असतात. हा वाटेनें पखाल वाहणारा रेडा चालला आहे याचें सुद्धां नांव ज्ञानदेव आहे ! " हें भाषण ऐकतांच ज्ञानेश्वर म्हणाले कीं, ' खरोखरच त्या रेड्यांत व आम्हांत भेद नाहीं, कारण तो रेडाही माझा आत्माच आहेः—

**रेडियांत आम्हांत कांहीं । भेद पाहतां किंचित नाहीं ।**
**आत्मा व्यापक सर्वांदेहीं । भूतमात्रा सारिखा ॥ ५४ ॥**
**अनंत घट भरले जीवनीं । तितक्यांत बिंबला वासरमणी ।**
**तैसा व्यापक चक्रपाणी । भूतमात्रीं सारिखा ॥ ५५ ॥**
**अठराभार वनस्पती देख । एकचि जळ मूळीं व्यापक ।**
**तैसाचि तो रमानायक । भूतमात्रीं सारिखा ॥ ५६ ॥**

सर्व देहांत एकच परमात्मा भरून राहिला आहे; सर्व एकाचीच वीण आहे; अनंत घटांतल्या पाण्यांत एकच सूर्य प्रतिबिंबित होतो तेव्हां उपाधिभेदानें कितीही प्रतिबिंबें दिसलीं तरी सूर्याच्या एकपणाकडेच डोळसाचें लक्ष जातें. कारणावर ज्याची दृष्टि जडली तो कार्याच्या दर्शनानें चकत नाहीं. प्रतिबिंबाचें अधिष्ठान जसें बिंब, विविध वनस्पतींच्या मूळांत जसें जळ, भिन्न अलंकारांत जसें व्यापक सुवर्ण किंवा पटांत जसा तंतु त्याप्रमाणें सर्व नामरूपात्मक विविध सृष्टीच्या पोटांत ओतप्रोत भरलेलें जें सर्वगत चैतन्य त्याच्याशीं तन्मय झालेल्या ज्ञानेश्वरांच्या दृष्टीला रेड्यांत व आपल्यांत भेद दिसलाच नाहीं. अंतरीं जो हा अभेदभाव उमटला होता त्याचें प्रत्यंतर पैठणकर ब्राह्मणांस लवकरच आलें. तें असें कीं, वरील ब्राह्मणानें त्या रेड्याच्या पाठीवर आसुडाचे तीन तडाखे लगावतांच सर्वात्मभावाच्या प्रतीतीनें ज्ञानेश्वरांच्या पाठिवर तीन वळ उठले व त्यांतून रक्ताचे पाट वाहूं लागले ! हें पाहतांच सर्व सभासदांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं.

४. पण एवढ्यानेंच झालें नाहीं. ज्ञानेश्वरमहाराजांना आणखी एक फार मोठा चमत्कार दाखवावयाचा होता. ब्राह्मणांना वंदन करून आपेगांवाकडे जाण्यासाठीं म्हणून ते गोदातीरावर जाऊन बसले. पुष्कळ ब्राह्मण ह्या बालयोग्याकडे कौतुकानें पहात तीरावर हिंडत होते, कांहीं हेकेखोर तरुण त्यांच्याकडे अजून उपहासबुद्धीनेंही पाहत होते. हे तरुण छलक ज्ञानेश्वरांच्या जवळ येऊन म्हणाले कीं, "तुला जर आपलें सर्व कुळ पावन करून घ्यावयाचें आहे तर ह्या रेड्याच्या मुखानें वेद बोलीव !"

हें ऐकतांच ज्ञानेश्वर उठून उभे राहिले व ब्राह्मणांना अभिवंदन करून विनयानें म्हणाले, " आपण भूदेव आहांत. आपल्या मुखांतून जीं अक्षरें निघतील तीं निष्फल होणार नाहींत " असें म्हणून ते रेड्याजवळ गेले व त्याच्या मस्तकावर त्यांनीं आपला पद्मकर ठेवला, तों त्या रेड्याच्या तोंडांतून चाऱ्ही वेदांच्या ऋचा भराभर बाहेर पडूं लागल्या ! ! मग काय विचारतां ! एकच कोलाहल उठला व तीरावरचे आणि घरीं गेलेलेही सर्व ब्राह्मण परत गोदातीरावर जमा झाले. ज्ञानेश्वरांचा वरदहस्त त्या सभाग्य रेड्याच्या मस्तकावर पडला असून सभोंवार हजारो ब्राह्मण गोळा झाले आहेत व त्या रेडयाच्या मुखांतून भराभर ऋचा निघत असून ते अत्यंत आश्चर्यचकित होऊन ऐकत आहेत असा अपूर्व देखावा शके १२०९ च्या माघ शुद्ध पंचमीस पैठणास गोदातीरावर दिसला ! स्वर व वर्ण चुकत नव्हते, उच्चार स्वच्छ होत होता, मोठमोठे पट्टीचे वेदपाठक लाजेनें खालीं माना घालून उभे राहिले होते—असा तो अपूर्व प्रसंग ज्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिला असेल ते डोळे धन्य होत ! रेड्याच्या मुखांतून एक प्रहरभर वेदघोष होत होता तो ऐकून ब्राह्मणवृंद लज्जित झाला, ज्ञानेश्वरमहाराज हे साक्षात् विष्णूचा अवतार आहेत असें त्यास कळून आलें, आपली योग्यता काय व शुद्धिपत्र मागण्यास आलेले हे देवांश किती उच्च कोटीचे आहेत हें तारतम्य मनांत येऊन ते ब्राह्मण गलितगर्व झाले व ज्ञानेश्वरादिकांची स्तुति करण्यास त्यांनीं प्रारंभ केला. ' देखिलें ऐकिलें नव्हतें कोणी । तें आजी प्रत्यक्ष देखिलें नयनीं ।' असे उद्गार सर्वतोमुखीं निघाले. या प्रसंगाबद्दल निरंजनमाधव म्हणतातः—

**जें अग्निमीळें स्वरयुक्त बोलें । हें ऐकतां विस्मित विप्र झालें ।**
**कांहीं यजुर्वेदहि साम कांहीं । ऐसा नयें सुस्वर सामकांहीं ॥ १ ॥**

**तें ऐकतां सकळ एक मुहूर्त सारे**
**तें चोज मानिति हल्या वदला कसारे ।**
**हे मुख्य देव हरि शंकर हा विधाता**
**लोकोद्धरा प्रकटले कलिमाजि आतां ॥ २ ॥**

हे चित्कळाचि अमुतें दिसते कुमारी
जीच्या प्रभेसि तुळणा न पवे तमारी ।
आम्हीं पहा कुटिल कर्मठ साभिमानें
या ईश्वरा न गणिलें मदमोहमानें ॥ ३ ॥

९. ज्ञानेश्वरांचें ब्रह्मतेज पाहून पैठणकर ब्राह्मणांना आपल्या खऱ्या स्वरूपाची ओळख पटली; त्यांची अभिमानानें धुंद झालेली दृष्टि जेव्हां आंत मुरडून पाहूं लागली तेव्हां गर्व वाहण्यासारखें आपल्याजवळ कांहींच नाहीं असें वाटून ते अनुतापानें तप्त झाले. ते ब्राह्मण कर्मनिष्ठ होते पण अकर्तात्मस्थितीचा त्यांना बोध झाला नव्हता. ते शब्दशास्त्र जाणणारे होते पण निःशब्दस्थितीचा त्यांना अनुभव नव्हता. ते विधिविधान यथाशास्त्र जाणत असत पण विधिनिषेध जेथें मावळतात त्या अवस्थेचा त्यांना साक्षात्कार नव्हता. ज्ञानेश्वररूपी आरशांत त्यांनीं आपलें तोंड पाहिलें तों तें त्यांचें त्यांनाच फार हिडिस व अमंगळ दिसलें. आपण वेदशास्त्रांचें अध्ययन केलें, पण वेद ज्याचे निश्वास आहेत त्याला आपण ओळखलें नाहीं याची त्यांना खंती वाटली. खरा ब्राह्मण म्हणजे ब्रह्मवेत्ता पुरुष. तो डोळ्यांपुढें दिसल्यामुळें त्यांचा देहबुद्धीच्या उकिरड्यांत फोंपावलेला मिथ्या जात्याभिमान लयास गेला. स्वरूपानुभव नसून आपण चावटी करीत व कुटुंब पोशीत आयुष्य व्यर्थ दवडिलें याबद्दल ते स्वतःचाच धिक्कार करूं लागले. नामदेवरायांच्या मुखांतून आपण त्यांचे उद्गार ऐकूं:—

**कर्मठ अभिमानें ठकलों देहबुद्धी । गोवियेलों विधि निःसंदेह ॥१**
**नेणों भक्ति ज्ञान वैराग्याचा लेश । कुटुंबाचे दास होउनि ठेलों ॥२**
**आणिकांसी सांगों आपण नाचरा । लटिकेंचि डुंबरों प्रतिष्ठेसी ॥३**
**धन्य यांचा वंश धन्य यांचें कुळ । धन्य पुण्यशीळ अवतार हे ।**
**सकळ द्विजवर करिती नमस्कार । आनंदें जयकार गर्जताती ॥५॥**

त्या ब्राह्मणांनीं ज्ञानेश्वरांचा एवढा जयजयकार केला तेव्हां:—

**ज्ञानदेव म्हणे तुमच्या चरणांचा महिमा । सामर्थ्य हें आम्हां अंगीं नाहीं ॥ ६ ॥**
**तुम्ही वेदस्वरूप भूदेव प्रत्यक्ष । तुमच्या दर्शनेंचि मोक्ष जडमूढां**
**ज्ञानदेवा ध्यान ब्राह्मणांचे चरण । कळिमळछेदन निवृत्ति म्हणे ॥**

ज्ञानेश्वरांचा विनय व ब्राह्मण्य किती अपूर्व आहेत बरें! अथवा त्यांच्या कोणत्या गुणाची स्तुति करावी आणि ती कशी करावी हें कोण सांगूं शकेल! 'तुका म्हणे नेणे युक्तीची ते खोली । म्हणोनि ठेविली पायीं डोई' ह्या तुकाराममहाराजांच्या उक्त्याप्रमाणें आपणही ज्ञानेश्वरांच्या पायीं परमात्मभावानें डोई ठेवावी हेंच आपणांस उचित आहे.

६. यानंतर निवृत्तिनाथप्रभृति संत कांहीं दिवस पैठणासच राहिले. तेथें गोदास्नान, वेदांतचर्चा, कीर्तन, पुराण इत्यादि सत्कर्माचरणांत काळ घालवीत व समस्त पैठणकरांस भगवद्भक्तीचा मार्ग दाखवीत ते तेथें राहिले. नामदेवराय म्हणतातः—

**अध्यात्मग्रंथ पाहती पैठणीं । गीता संबोधनीं जवळी असे ॥ १ ॥**
**सांगती पुराण रात्रीं हरिकीर्तन । पैठणीचे जन वेधियेले ॥ २ ॥**

हे बालभागवत योगवासिष्ठ गीतादि अध्यात्मग्रंथांवर पुराण सांगत, रात्रीं हरिकीर्तनाचा रंग भरीत व दिवसां एरवींच्या वेळांत वेदांतविषयक ग्रंथांचें श्रवणमननादि करीत. पैठणास असतांनाच ज्ञानेश्वरमहाराजांनीं आचार्यांचें भाष्य, भागवत, योगवासिष्ठ इत्यादि ग्रंथ पाहिले व पुढें त्यांच्या हातून जे ग्रंथ झाले त्यांची भूमिका तेथें तयार झाली. त्यांचें अध्ययन म्हणजे केवळ स्मरण होय. "दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां । बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥४५३॥ तिये सिद्धप्रज्ञेचोनि लाभें । मनाचि सारस्वत दुभे । मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ॥ ४५४ ॥" ( ज्ञानेश्वरी अ. ६ ) अशा कोटींतले ते सिद्धप्रज्ञ होते. ग्रंथाध्ययनानें प्रज्ञावंत होणाऱ्या लौकिक विद्वानांहून ते अर्थात फार वेगळ्या जातीचे होते. गुरुकृपेनें आधीं स्वानुभवसंपन्न होऊन मग

ते ग्रंथ पाहूं लागले. सामान्य पंडित ग्रंथाध्ययनानंतर म्हणजे परोक्षज्ञानानंतर अपरोक्षानुभव पाहतात, पण शंकराचार्य किंवा ज्ञानेश्वरमहाराज ह्या विरल कोटींतले महात्मे गुरुकृपेनें आधीं अपरोक्षानुभवसंपन्न होतात आणि स्वानुभवाच्या दृष्टीनें मग अध्यात्मग्रंथ पाहत असतात. ते आधीं अनुभव घेऊन मग ग्रंथ पाहत असल्यामुळें "धाराधरकाळें । महानदी उचंबळे । तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥" ( ज्ञाने० १४१२ ) याप्रमाणें त्यांची सिद्धप्रज्ञा शास्त्रें एकवार पाहतां पाहतांच त्यांचें लीलेनें आकलन करिते. ते स्वानुभवाच्या डोळ्यानें ग्रंथ पाहतात. बुद्धीच्या डोळ्यानें ग्रंथ पाहण्याचें काम तुम्ही आम्ही सर्वजण करीतच आहोंत. असो. पैठणास असतांना अध्यात्मग्रंथावलोकन, पुराण व कीर्तन हें काम ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या भावंडांसमवेत केलें.

७. पैठणास एका द्विजाच्या घरीं त्याच्या वडिलांचें श्राद्ध निघालें. तेव्हां ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्याला श्राद्धाची तयारी करण्यास सांगितलें. ऐनवेळीं 'पितर आगन्तव्यं' असें ते म्हणाले. तों काय चमत्कार सांगावा ! सर्व पितर आपापल्या जागीं येऊन बसले ! ज्ञानेश्वरांचें हें योगसामर्थ्य व सिद्धिबळ पाहून त्या ब्राह्मणास त्यांची धन्यता वाटली व हीं मुलें सामान्यांतलीं नसून अलौकिक आहेत अशी त्याची खात्री झाली. नामदेवरायांनीं ही गोष्ट एका अभंगांत सांगितली आहे:—

**तंव कव्ययज्ञ गृहस्थाचे घरीं । पितर मंत्रोच्चारीं आव्हानिले ॥ १ ॥**
**पशुमुखें वेद दृश्य पितरलोक । थोर हें कवतुक दाखवीलें ॥ २ ॥**

८. ज्ञानेश्वरमहाराजांनीं केलेले चमत्कार व त्यांची एकंदर योग्यता पैठणकरांच्या लक्ष्यांत येऊन "हे देव तिन्ही मूर्तिमंत । यांसी न चले प्रायश्चित्त । कीं जगद्‌गुरु मूर्तिमंत । जीवन्मुक्त असती हे ॥" ( भक्तविजय अ. ९-१० ) असें त्यांनीं ठरविलें व शुद्धिपत्र लिहून निवृत्तिनाथांच्या स्वाधीन केलें. नामदेवरायही लिहितात:—

हे परलोकींचे तारू देवत्रय यांसी ।
प्रायश्चित्त काय यासी कोणें द्यावें ॥ १ ॥
लिहोनियां पत्र दिलें तयाहातीं ।
समस्तांसी निवृत्ति नमस्कारिले ॥ २ ॥

## शुद्धिपत्र.

( पैठणच्या ब्राह्मणांनीं ज्ञानेश्वरमहाराजांस जें शुद्धिपत्र दिलें त्याची एक नक्कल भिंगारकरबुवांस जुन्या बळदांत सांपडलेली त्यांनीं छापली आहे ती मी पुढें देत आहें. ह्यांत ज्ञानेश्वरमहाराजांचे जनक विठ्ठलपंत यांची सर्व हकीकत आलेली असून ज्ञानेश्वरमहाराजांनीं पैठणास केलेले चमत्कार आपण डोळ्यांनीं पाहिले असें पैठणकर ब्राह्मणांनीं म्हटलें आहे. सदर शुद्धिपत्राची भाषा मोठी गोड आहे. नामदेवांच्या 'आदि' ग्रंथाप्रमाणेंच हें शुद्धिपत्र चरित्रपर असल्यामुळें महत्वाचें आहे. दोहींत एके ठिकाणीं मात्र थोडी तफावत आहे. ह्या शुद्धिपत्राच्या प्रामाण्याबद्दल विद्वानांत मत-भेद आहे, तरी कशा तऱ्हेचें शुद्धिपत्र पैठणकरांनीं महाराजांस दिलें असेल याची यावरून कल्पना करितां येते. शिवाय ह्यांतील माहिती इतरत्र मिळणाऱ्या हकीकतीशीं बहुतांशीं जुळणारी आहे. )

स्वस्ति श्रीमत्सकलभूमंडलमंडनीभूताः अखंडप्रचंडवैतंडिकवेतंडगंडस्थलखंडनैकहरयः गिरयोऽखिलतत्वप्रकाशकसूक्तिरत्नानां तरयोऽशेषशास्त्रजलधेः नानानीवृदलंकरणमणयो निखिलविद्वांसः शृणुध्वमेतां प्रणतिपरंपरोपेतां प्रतिष्ठानमधितिष्ठतां सर्वभूसुपर्वणामस्माकमभ्यर्थनाम् । यदद्भुततममुद्भूतमिहप्रत्यक्षमपक्षपातमनुभूतं तदेवं देववेदसाक्षिकं स्वाक्षिकलितं पुरतः शुभवतां भवतां प्रकाशयामः ।

## श्लोक.

आपेग्रामनिवासियाज्ञुषवरो गोविंदपंताभिधो
विप्रः कश्चन सत्पुरश्चरणतः श्रीवेदमातुः सुतम् ।

लेभे विठ्ठलपंतनामकमसौ जातोपनीतिर्गुरोः
संप्राप्तो निगमागमान् समगमत्सत्तीर्थसार्थेच्छया ॥ १ ॥
आलंदीति प्रथितनिगमे भव्यदिव्यप्रसंगात्
सिद्धोपंतद्विजनितनुजां रुक्मिणीं प्राप्य पत्नीम् ।
षड्भिर्वर्षैस्तनयमनया नैव लब्ध्वा प्रसुप्ता-
मेनां हित्वा निशि निशितया प्राप काशीं विरक्त्या ॥ २ ॥
रामानंदाल्लब्धसंन्यासदीक्षं तत्र श्रुत्वा हंत कांतं नितांतम् ।
शांतस्वांता सेवमाना विमाना स्वर्णाश्वत्थं नाथ नाथस्य दैवात्
तत्रैवामुं दैशिकं संप्रणम्यैतस्मात्पुत्राशीर्वचः प्राप्य खिन्ना ।
श्रुत्वा वृत्तं दत्तचित्तेन तेन नीताऽभीता प्रत्तधैर्याप काशीम् ॥ ४ ॥
स विठ्ठलं तत्र जगौ सगौरवं विहाय चानप्तसुतां पतिव्रताम् ।
तयापि नोक्तास्यृणवान्भवांच्छलात् बलात् विरक्ताश्रममाश्रितः
कुतः ॥ ५ ॥
ममाज्ञयाऽतो घृतकुंभसंभवस्वजातकर्मादिविधानसंस्कृतः ।
इमां पुनः प्रोद्वह तत्र पुत्रकांश्च त्रीन् हरेरंशभवान् भवानियात् ॥६

आर्या.

इत्थमसह्यमपि मुहुः प्रसह्य गुरुणारुणाक्षमुक्तः सः ।
विधिना पुनरपि विधिना गृहो तयाऽभूदगृहीतया नतया ॥ ७ ॥
प्रारब्धलेखनाविधौ विपर्ययादेव वर्णधर्मस्य ।
यतिरपि पुनः पतिरभूदित्युक्त्वासौ बहिष्कृतो विप्रैः ॥ ८ ॥
वृत्तांतस्याबोधात् श्रुत्वाप्यश्रद्धया पुनरशोधात् ।
शिष्टाचारविरोधात् समुज्झितो मत्सरात्परैः क्रोधात् ॥ ९ ॥
अभवन्निवृत्तिमुख्यं ज्ञानेश्वरमध्यमं सुतात्रितयम् ।
सोपानान्तं तुर्या तुर्यावस्थारता सुता मुक्ता ॥ १० ॥
जातोपनीतिसमयास्तनया इति विप्रमंडलीं समया ।
प्रोचे वाचा समया क्षम्यो दोषो ध्रुवं कृतः स मया ॥ ११ ॥

## श्लोक.

स विठ्ठलो विप्रवरैरगादि क्वापि प्रतिष्ठानपुरेऽत्र तस्मात् ।
शुद्धिं प्रतिष्ठानपुरे लभस्व निवेद्य सर्वं स्वकृतं विगर्ह्यम् ॥ १२ ॥
पुत्रैः समं सोऽथ समं स्वचित्तं कृत्वा प्रतिष्ठानमिदं प्रयातः ।
स्वमातुलस्यालयमध्यवात्सीत् सोप्युज्झितोस्माभिरमुष्य संगात् ॥ १३ ॥
कृष्णाभिधो विठ्ठलमातुलोसौ । श्राद्धे न लेभे द्विजमुक्तदोषात् ।
लोकांतरात्तस्य पितॄन् स साक्षात् आनीतवान्मध्यमवैठ्ठलिः सः ॥
श्राद्धे यदाऽभून्नहि विप्रयोगश्चिरात्पितॄणामपि विप्रयोगः ।
ज्ञानेश्वरेणेह निवारितोऽत्र दृष्टं चरित्रं तादिदं विचित्रम् ॥ १५ ॥
ज्ञानेश्वरो विठ्ठलनंदनानां स मध्यमोऽप्युत्तम एव चाद्यः ।
स्थितिप्रियो नित्यविशुद्धसत्वो यथाऽमराणां मुरजित्त्रयाणाम् ॥
कृत्वा नमो विप्रकुलाय गोदातीरे स्थितस्तातकुलाय हेतोः ।
तीराधिवासैः कृतभूरिहासैर्द्विजैरयासैः कथितो विलासैः ॥ १७ ॥
ज्ञानेश्वरस्त्वं यदि वास्तवोसि न वा स्तवोयं तव नाममात्रात् ।
प्रताडितेऽस्मिन्महिषे प्रतोदैस्तवापि गात्रे भविता तदंकः ॥ १८ ॥
अथेत्यवादीदथ तैः प्रताडितैस्तस्मिन्लुलायेऽरुणमस्य पृष्ठकम् ।
व्यलोकि रेखात्रितयं त्विहाखिलैः किलास्य कालत्रयबोध-सूचकम् ॥ १९ ॥
लुलायमेतं स्वकुलाय शुद्धये विधेह्यशेषश्रुतिवृंदपाठकम् ।
इतीरितस्तस्य निधाय मूर्धनि करं स वेदाकरमेनमातनोत् ॥ २० ॥

समक्षं सर्वेषां ध्रुवमभवदेषां द्विजनुषा-
मशेषाणां गोदातटभुवि तु मोदाय विदुषाम् ।
चरित्रं चित्रं तन्महिष इह संतर्जितवुधोऽ-
खिलानुच्चैर्वेदानुचितपदभेदान् समपठत् ॥ २१ ॥

एवंविधानि विविधानि विलोकितानि
ज्ञानेश्वरस्य चरितानि महाद्भुतानि ।

विप्रास्ततोऽत्र मिलिताः सकला विशुद्धेः
पत्रं पवित्रहृदयेन समर्पयामः ॥ २२ ॥
ज्ञानेश्वरस्मरणतः स्मरणेन मुक्तान्
मुक्ताग्रजोऽयमखिलान् खलु कर्तुमीष्टे ।
निंद्यो न बोधरहितैः स्वहितैकसिध्यै
वंद्यो ध्रुवं सुकृतिभिः कृतिभिः समस्तैः ॥ २३ ॥
निध्यंबरयमक्षोणीसंयुते शालिवाहने ।
माघे शुक्ले च पंचम्यां सर्वजिन्नामवत्सरे ॥ २४ ॥
श्रीमद्ज्ञानेशचरणयुगुले सुरसेविते ।
बोपदेवेन ग्रथितं शुद्धिपत्रं समर्पितम् ॥ २५ ॥

# ६ तीर्थयात्राप्रकरण.

तीर्थानि क्षेत्रमुख्यानि सेवितानीह भूतले ॥ ८ ॥
भवद्विधा भागवतास्तीर्थीभूताः स्वयं विभो ।
तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि स्वान्तःस्थेन गदाभृता ॥ ९ ॥

—श्रीमद्भागवत स्कंद १ अ० १३.

१ ज्ञानेश्वरमहाराज भावंडांसह नेवाश्यास येतात. २ नेवाश्याचा मोहनीराज. ३ लेखक सच्चिदानंदबावा. ४ विसोबा चाटी आणि मुक्ताबाईचे मांडे. ५ ज्ञानेश्वरीची रचना. ६ तीर्थयात्राप्रकरणाबद्दल ग्रंथाधार. ७ ते तीर्थयात्रेस निघतात. ८ पंढरीस ज्ञानदेवनामदेवांची भेट. ९ कऱ्हाडचा रामराय व त्याची ज्ञाननिष्ठ भार्या. १० ज्ञानदेवनामदेवसंवाद. ११ गोरोबाकाकांचें थापटणें. १२ देवाचें तोंड नामदेवाकडे. १३ वीरमंगळाची गोष्ट. १४ काशीचा सत्कार. १५ नामदेव कीर्तनांत गाय उठवितात. १६ नामदेवजीका कुवा. १७ परत पंढरीस.

१. पैठणच्या नारीनरांना आपल्या विभूतिमत्त्वाचें तेज दाखवून त्यांना ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या संगसुखाचा लाभ कांहीं काळ दिला व ब्राह्मणांनीं दिलेलें शुद्धिपत्र व वेद बोलणारा रेडा बरोबर घेऊन ते निघाले. त्या रेड्याला त्यांनीं आळें मुक्कामीं गेल्यावर समाधि दिली. चारी भावंडें ब्रह्मचर्चा करीत व आनंदविनोद करीत मार्गक्रमण करूं लागलीं. "मार्गीं चालती स्वानंदभरित । सप्रेम हरीचे गुण वर्णीत । नानापरी चातुर्य कवित्व । नवरस उत्पन्न करिताती ॥" असें महिपतबावांनीं म्हटलें आहे. त्या ब्रह्मनिष्ठ, ब्रह्मरूप, ब्रह्ममय भावंडांचा काय संवाद होत असेल, हरिगुणगानांत केवढा प्रेमरसाचा पूर वोसंडत असेल, त्यांच्या चातुर्यकवित्वाच्या काय काय गोष्टी होत असतील तें आपणांस आज कांहीं सांगतां येणार नाहीं; पण ह्या सर्व गोष्टींची कांहींशी कल्पना ज्ञानेश्वरमहाराजांनीं पुढील सालीं केलेल्या गीताभाष्यावरून होणार आहे. ही मंडळी हळू हळू चालत

व आपल्या संचारानें पायाखालील भूभागाला स्वर्गाला वाकुल्या दाख-विण्याचें सामर्थ्य देत नेवासें मुक्कामीं येऊन पोहोंचली.

२. नेवासें हा गांव नगरजिल्ह्यांत प्रवरानदीच्या तीरावर वसलेला आहे. नेवासें गांव वस्तुतः दोन गांव मिळून झालेला आहे. नेवासें-खंडोबाचें व नेवासें मोहनीराजाचें मिळून नेवासें क्षेत्र बनलेलें आहे. दोन्ही नेवाशांच्या-मधून प्रवरा दक्षिणोत्तर वाहत आहे. ज्ञानेश्वरीचा म्हणून प्रसिद्ध असलेला —पण वस्तुतः अगदींच वेगळ्या प्रकारचा—असा एक शिलास्तंभ हल्लीं मोहनीराजाच्या नेवाशाच्या पश्चिम कोनास गांवाबाहेर पाव मैलावर आहे. मोहनीराजाच्या नेवाशांत मोहनीराजाचें व खंडोबाच्या नेवाशांत खंडोबाचें देवालय आहे. मोहनीराज हें जरी पुरुषवाचक नांव दिसतें तरी मोहनी· नामक स्त्रीचें रूप धारण करणाऱ्या विष्णूचाच हा अवतार असल्यामुळें मोहनीराजाच्या हातांत बांगड्या व अंगांत चोळी वगैरे स्त्रीवेष असतो. समुद्रमंथनसमयीं समुद्रांतून चतुर्दश रत्नांपैकीं अमृत निघालें तेव्हां त्याच्या प्राप्तीसाठीं देवदैत्यांत भांडण सुरू झालें असतां व तो अमृतकलश दैत्यांच्या हातीं पडला असतां त्यांना मायेनें फसवून त्यांच्या हातून तो घेऊन देवांना देण्यासाठीं देवपक्षपाती भगवान् श्रीविष्णूनीं जें मोहनीरूप धारण केलें तोच हा मोहनीराज होय. ( ही कथा भागवत स्कंध ८ अध्याय ८ व ९ मध्यें पहावी.) असो. मोहनीराजास 'महालया' असें म्हणतात. महालया म्हणजेच म्हाळसा. मराठी संतकवींनीं नेवाशास महालयाक्षेत्र किंवा म्हाळसापूर हें याच अर्थानें म्हटलें आहे. ह्याच नेवासें क्षेत्रांत ज्ञानेश्वरी ग्रंथ झाला अस-ल्याबद्दल महाराजांनीं सदर ग्रंथाच्या उपसंहारांत स्पष्ट सांगितलें आहे:—

**ऐसें युगीं परि कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं ।**
**श्रीगोदावरीच्या कूलीं । दाक्षिणिलीं ॥ १८०३ ॥**
**त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोशक्षेत्र ।**
**जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ १८०४ ॥**

नेवासें हें साक्षात् प्रवरेच्या कांठीं आहे खरें, पण तें अनादि क्षेत्र असून त्याच्या पंचक्रोशींत चारी दिशांस प्राचीन क्षेत्रें आहेत व टोकें येथें

प्रवरा आणि गोदा यांचा संगम झालेला आहे. तात्पर्य, नेवासें हें क्षेत्र ज्ञानेश्वरमहाराजांनीं म्हटल्याप्रमाणें अनादि आहे व त्याच्या पंचक्रोशींत त्यांना परमप्रिय गोदावरी असल्यामुळें 'गोदावरीच्या दक्षिण तीरावरील पंचक्रोशी क्षेत्र' हें नेवाशाला त्यांनीं दिलेलें विशेषण बरोबर आहे त्यांत शंका नाहीं.

३. ज्ञानेश्वरमहाराज नेवाशांत शिरले तों एक सती आपल्या मृत पतीच्या शवाभोंवतीं आक्रोश करीत असलेली त्यांना आढळली. महाराजांनीं चौकशी केली तेव्हां मृतपुरुषाचें नांव 'सच्चिदानंद' असल्याचें त्यांना कळलें. तें ऐकतांच ते चमत्कारून म्हणाले, "काय ? सत्, चित् व आनंद यास कोणी कधीं मृत्यु ऐकिला आहे काय ? सच्चिदानंद हे सर्वोपाधिरहित आहेत, त्यांस मृत्यु कसा स्पर्शेल !" हीं वाक्यें मुखानें उच्चारून त्या शवाच्या अंगावरून महाराजांनीं हात फिरविला, तों तो मृत पुरुष जिवंत होऊन उठून उभा राहिला. त्यानें महाराजांच्या पायांवर मस्तक ठेवून तो सर्वभावें त्यांना शरण गेला. हाच पुरुष नेवाशाचा कुळकर्णी असून ज्ञानेश्वरीच्या अखेरीस 'सच्चिदानंदबावा आदरें लेखकु जाहला' म्हणून ज्याचा उल्लेख आहे तो ज्ञानेश्वरीचा लेखक होय ! यानेंच पुढें 'ज्ञानेश्वरविजय' नामक चारित्रपर ओवीबद्ध ग्रंथ लिहिला !

४. मध्यंतरीं ज्ञानेश्वरमंडळ आळंदीस जाऊन राहिलें होतें. पैठणास महाराजांनीं केलेले चमत्कार व तेथें झालेली त्यांची ख्याति आळंदीपर्यंत जाऊन पोहोंचली होती. ह्या खेपेस आळंदीकरांनीं त्यांचें मोठ्या प्रेमानें स्वागत केलें; तरी तेथें विसोबा चाटी म्हणून एक साधुद्वेष्टा कर्मठ ब्राह्मण होता. त्याच्या डोक्यांतलें 'हीं संन्याशाचीं मुलें' हें वेड कांहीं निघालें नव्हतें. हा ब्राह्मण विद्वान् व सदाचारी होता पण अनुभवाचें कांहींच अंग त्याला माहीत नसल्यामुळें त्याच्यांत दुरभिमान फार भरला होता. त्यानें घरींदारीं, वेळीअवेळीं ज्याच्यात्याच्याजवळ ज्ञानेश्वरादिकांची निंदा करावी. ज्ञानेश्वरांचें नांव निघालें कीं त्याच्या अंगांत निंदाद्वेषाचें भूत संचरे ! त्याची ज्ञानेश्वरांशीं स्पर्धा म्हणजे खद्योताची सूर्याशींच

स्पर्धा होती. ही टिटवी त्या कीर्तिसागराला उपसूं पाहत होती! पण हें व्हावें कसें? असो. विसोबा चाटी ह्याप्रमाणें ज्ञानेश्वरांचा द्वेष करीत असे, पण मौज काय कीं "अगा वरी फोडावयाचि लागीं। लोहो मिळो कां परिसाचे अंगीं। कां जे मिळतिये प्रसंगीं। सोनेंचि होईल॥" (ज्ञानेश्वरी अ० ९-४६४) ह्या लोहपरिसाच्या दृष्टांताप्रमाणें त्या निंदक विसोबाचेंच पुढें परमकल्याण झालें. तो प्रकार असा:—एकदां दिवाळीचा सण आला तेव्हां उत्तम मांडे करून आम्हांला आज खाऊं घाल असें निवृत्तिनाथ सहज मुक्ताबाईस म्हणाले. मुक्ताबाई मांडेरांधणें आणण्यासाठीं कुंभार-वाडयांत चालली. वाटेंतच विसोबा समोरून येतांना तिनें पाहिला तेव्हां ससाण्याला पाहून कोकिळा कांपते याप्रमाणें ती थरथर कांपूं लागली! त्यानें 'कुठें चाललीस गे पोरी' म्हणून जरा दरडावून विचारिलें तेव्हां तिनें आपला खरा हेतु सांगितला. विसोबानें लगेच कुंभारांस जाऊन बजाविलें कीं, 'खबरदार! कोणी या पोरीला खापर बिपर द्याल तर! माझें तुमच्या-कडून येणें आहे, त्याबद्दल नाहींतर मी तुम्हांला तगादा लावीन!' झालें! मुक्ताबाई हिंडहिंड हिंडली. तिला कांहीं कोणी रांधण (खापर) दिलें नाहीं. निवृत्तिनाथांनीं मांडे मागावेत व आपल्याला रांधण मिळूं नये या-बद्दल खिन्न होऊन ती रडतच घरीं आली. ज्ञानेश्वरांनीं तिचा रडका स्वर ऐकला व लगेच ते धांवत आपल्या बहिणीजवळ गेले. ज्ञानेश्वरांनीं तिला पोटाशीं धरून व कुरवाळून 'कष्टी कां झालीस' म्हणून विचारलें. तिनें सर्व वृत्तांत सांगितला, तेव्हां त्या योगेश्वर परमसमर्थ ज्ञानेश्वरमहाराजांनीं योगधारणेनें जठराग्नि पेटविला व आपली पाठ तप्तसुवर्णासारखी तापवून पाठीवर मांडे करण्यास सांगितलें:—

**मग योगधारणा करूनी। ज्ञानदेवें पेटविला जठराग्नी।**
**ज्वाला निघती मुखांतूनी। आरक्तनयन दिसती पै॥ १७९॥**
**जांबूनदतप्तसुवर्ण। तैसी पाठ आरक्तवर्ण।**
**विसोबा बाहेर उभा राहून। कौतुक दृष्टी पाहत॥ १८०॥**

मग मुक्ताईस म्हणे ज्ञानेश्वर। मांडे करावे पाठीवर।
तिणें साहित्य आणूनि सत्वर। लाटिलें अरुवार तेधवां॥

ह्याप्रमाणें ज्ञानेश्वरांच्या पाठीवर मुक्ताबाईनीं मांडे भाजलेले पाहून चोरट्या दृष्टीनें हा सर्व प्रकार पाहणाऱ्या त्या विसोबाच्या डोळ्यांत चांगलें अंजन पडलें व रत्नहिऱ्यांच्या खाणीला आपण कांचमणी समजलों याबद्दल त्याला फार फार अनुताप झाला. 'म्यां मूर्खानें विकल्पाची गोफण घेऊन चिंतामणी झोंकून दिले' म्हणून त्यास पश्चात्ताप झाला व तो धांवत धांवत झोंपडींत शिरला आणि ज्ञानेश्वरांचे पाय हातीं धरून त्यानें ते अनुतापाश्रूंनीं न्हाणले. हे महापुरुष आहेत असें ओळखून त्यानें त्यांच्या पानांतलें उच्छिष्ट प्रसाद म्हणून उचलून घेतलें व लगबगीनें आपल्या मुखांत घातलें! पुढें:—

मुखांत घालितां सत्वर। काय बोलती ज्ञानेश्वर।
'तूं कां होसी गा खेचर। सर परता वेगेसी'॥ १९४॥
ऐसी ऐकुनियां वाणी। तोचि उपदेश धरिला मनीं।
परा पश्यंती मध्यमेहूनी। वैखरीपरता सरतसे॥ १९५॥

ज्ञानेश्वरमहाराज 'सर परता खेचरा ऐसें' असें म्हणाले तेव्हां 'देवाप्रमाणें वाणीच्या पलीकडचा हो' असा त्याचा अर्थ मनीं आणून ते विसोबा चाटी खरोखर 'परेहून परते घर। तेथें राहूं निरंतर' असें म्हणण्यास अधिकारी झाले. गुरूपदिष्ट मार्गाचें अनुसरण करितां करितां त्यांचा अधिकार एवढा वाढला कीं कांहीं वर्षांनीं नामदेवरायांच्या गुरुत्वाचा मान ज्ञानेश्वरांनीं त्यांसच दिला. ज्ञानोबांचे निंदक विसोबा चाटी पुढें 'महाविष्णूचा अवतार। श्रीगुरु माझा ज्ञानेश्वर' असले अभंग बोलूं लागले!

५. वरील गोष्टी शके १२०९ ते १२१२ च्या दरम्यान झाल्या. ह्या तीन वर्षांत ज्ञानेश्वरमंडळ नेवासें, आपेगांव व आळंदी ह्या तीन ठिकाणीं जाऊनयेऊन असे. त्यांच्याविषयींचें विरुद्धत्व शके १२१२ च्या प्रारंभींच पार नाहींसें झालें. ज्ञानेश्वरांच्या वयास पंधरावें वर्ष लागलें. निवृत्तिनाथ

१७ वर्षांचे झाले, सोपानदेव १३ वर्षांचे व मुक्ताबाई तर अवघ्या ११ वर्षांच्या झाल्या. अशा वयांत हीं भावंडें नेवाशास असतांना निवृत्तिनाथ-सद्गुरुसन्मुख ज्ञानेश्वरमहाराजांनीं गीतेवर भाष्य सांगण्यास सुरुवात केली; त्यांचीं वयें काय व ज्ञानेश्वरींत प्रगट झालेलें ज्ञान कोणत्या पायरीचें! ज्ञानेश्वरमहाराजांच्या चरित्रांतले व इतर सर्व चमत्कार बाजूला ठेविले तरी रघु-किरातांचे पहिले सर्ग म्हणण्याच्या कोमल वयांत त्यांनीं ज्ञानेश्वरीसारखा हजार वर्षांत सुद्धां मानवलोकीं प्रगट न होणारा लोकोत्तर ग्रंथ निर्माण केला, हाच चमत्कार काय कमी लोकोत्तर आहे!! गीतेवर संस्कृत, प्राकृत व परकीय भाषांतून आजपर्यंत हजारों ग्रंथ झाले आहेत, पण त्यांतला एकही ग्रंथ ज्ञानेश्वरीची बरोबरी करण्यास समर्थ असा झालेला नाहीं. काव्यग्रंथ म्हणून, तत्वज्ञानाचा ग्रंथ म्हणून, धर्मरहस्य प्रगट करणारा ग्रंथ म्हणून, भाषाग्रंथ म्हणून, स्वानुभवाच्या तेजानें चमकणारा ग्रंथ म्हणून, गुरुभक्तीच्या अमृतरसानें ओथंबलेला ग्रंथ म्हणून—कोणत्याही दृष्टीनें ज्ञानेश्वरीकडे पहा; याच्या तुलनेला दुसरे ग्रंथ घ्यावयाचें म्हटल्यास 'अनामिका सार्थवती बभूव' ह्याप्रमाणें त्याचें अनन्यसाधारणत्व कोणाच्याही प्रतीतीस येणार आहे. ज्ञानेश्वरीनंतर अमृतानुभव, चांगदेवपासष्टी, हरिपाठ, योग-वासिष्ठ, स्वात्मपत्र इत्यादि ग्रंथ व शेंकडों अभंग इतकें वाङ्मय त्यांच्या तोंडून सहज निघालें. पण त्यांच्या ग्रंथांचा विचार पुढें एका स्वतंत्र प्रकरणांत करावयाचा असल्यामुळें येथें त्याबद्दल अधिक कांहीं लिहीत नाहीं. शके १२१२ ला ज्ञानेश्वरी झाल्यावर महाराजांनीं आपलें लक्ष पंढरपुराकडे वळविलें व पांडुरंगाचा निस्सीम सगुणभक्त म्हणून गाजलेल्या नामदेवाला संगतीला घेऊन तीर्थयात्रेस निघण्याचा त्यांनीं बेत ठरविला.

६. तीर्थयात्राप्रकरणासंबंधानें वारकऱ्यांत श्रीनामदेवरायांचे तीर्थावळीचे ५९ अभंग मुख्यतः प्रमाणभूत मानलेले आहेत; त्यांवरून पाहिलें असतां ज्ञानेश्वर व नामदेव हे दोघेच तीर्थयात्रेला निघाले होते असें वाटतें. परंतु ज्ञानेश्वरमहाराजांच्या तीर्थयात्रेसंबंधानें भक्तिकथासार, भक्तिकथामृत, धुंडि-

राजकृत भक्तिलीलामृत, कथाकल्पवृक्ष इत्यादि ग्रंथ पाहिले म्हणजे असें दिसतें कीं, निवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताबाई, नरहरि सोनार, चोखामेळा, गोराकुंभार, विसोबाखेचर इत्यादि संत बरोबर घेऊन ज्ञानेश्वर व नामदेव हे तीर्थयात्रेला बाहेर पडले होते. शिवाय ह्या ग्रंथांतून तीर्थयात्रेचें सविस्तर वर्णन दिलेलें असून वाटेंत घडलेले नानाविध चमत्कारही दिलेले आहेत. नामदेवांच्या तीर्थावळीच्या प्रेमळ अभंगांकडे वळण्यापूर्वीं आपण वरील ग्रंथांत सांगितलेल्या गोष्टी थोडक्यांत सांगून टाकूं.

७. निवृत्तिनाथांची आज्ञा घेऊन ज्ञानेश्वरमहाराजांनीं तीर्थयात्रेला निघण्याचा बेत मुक्रर केला. श्रीगुरु निवृत्तिनाथही बरोबर होतेच. सोपानदेव, मुक्ताबाई हे आणि इतर ज्या भक्तांना यांच्या सहवासाचा लाभ घ्यावासा वाटला ते सर्व मिळून आळंदीहून बरोबर निघाले. ते प्रथम चाकण मुक्कामीं आले. चाकणास महिपतराव नांवाचा एक भाविक श्रीमान् गृहस्थ रहात होता. त्यानें यांस आपल्या घरीं मोठ्या आनंदानें ठेवून घेतलें व थाटाचा भोजनसमारंभ केला. त्याची कन्या कऱ्हाडच्या रामरायास दिली होती. ‘ तिला जातांना आपल्या दर्शनाचा लाभ द्या ’ असें त्यानें ज्ञानेश्वरांस विनविलें व तें त्यांनीं मान्य केलें. महिपतरावाचा सत्कार स्वीकारून महाराज निघाले. पंढरपुरीं नामदेव राहतात, ते प्रेमळ व सगुणसाक्षात्कारी आहेत, श्रीविठ्ठलाशीं त्यांचा प्रत्यक्ष संभाषणादि संबंध होतो हें ज्ञानेश्वरांस अनुभवानें माहीत होतें. त्यांना बरोबर घ्यावें व पंढरीची यात्राही घडावी अशा दुहेरी हेतूनें त्यांनीं पंढरीकडे निशाण फिरविलें. पंढरीस चार दिवस मुक्काम करून व नामदेवास बरोबर घेऊन ज्ञानेश्वरमहाराज पुढें निघाले.

८. नामदेवरायांचें ‘तीर्थावळी’चे जे ५९ अभंग प्रसिद्ध आहेत त्यांकडे एकवार आपण वळूं. ज्ञानेश्वरमहाराज पंढरीस नामदेवांच्या भेटीस आले व त्यांना बरोबर घेऊन यात्रेस निघाले त्या प्रसंगाचें प्रेमळ वर्णन नामदेवांच्याच मुखानें ऐकलें पाहिजे.

नामयाचे भेटी ज्ञानदेव आले । लोटांगण घातलें नामदेवें ॥ १ ॥
देउनी आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । पूजिलें आदरें यथाविधी ॥२
संसारीं आसक्त मायामोहरत । तापत्रयसंतप्त जाले जीव ॥ ३ ॥
ऐसिया पतितांचा करावा उद्धार ।
यालागीं अवतार तुमचा जगीं ॥ ४ ॥
तरी मी एक दीनु मूढ मतिहीनू ।
चरणाचा रजरेणु संतांचिया ॥ ५ ॥

यावर ज्ञानेश्वरमहाराजांनींही नामदेवांचें प्रीतियुक्त गौरव केलें व आपल्याबरोबर तीर्थयात्रेस चलण्याविषयीं त्यांस विनंति केली:—

ज्ञानदेव म्हणे तूं भक्तशिरोमणी ।
जोडिले जन्मोनी केशवचरण ॥ १ ॥
प्रेमसुखगोडी तुजचि फावली ।
वासना मावळली समूळ तूझी ॥ २ ॥
धन्य तुझें जन्म धन्य तुझें कूळ ।
धन्य तुज राउळ जवळीं वसे ॥ ३ ॥
क्षण एक एकांतीं बैसोनी सहज ।
अंतराचें गूज बोलों कांहीं ॥ ४ ॥
जीवन्मुक्त ज्ञानी जरी झाले पावन ।
तरी देवतीर्थभजन न सांडिती ॥ ५ ॥
भूतळींचीं तीर्थें पहावया नयनीं ।
आर्त असे मनीं विष्णुदास ॥ ६ ॥
तुझिये संगतीचें नित्य सुख घ्यावें ।
सार्थक करावें संसाराचें ॥ ७ ॥
ज्ञानदेव म्हणे पुरवी मनोरथ ।
करावे मुहूर्त प्रयाणासी ॥ ८ ॥

यावर 'नामा म्हणे तुम्हीं पुसावें विठ्ठला । देतां आज्ञा मला मीही येतों' असें नामदेवरायांनीं उत्तर केलें. नामदेवांच्या पुढें मोठा प्रश्न येऊन पडला. त्यांनीं पुनः विचार करून उत्तर केलें:—

**सर्व सुख मज आहे पांडुरंगीं ।**
**आवे कवणालागीं कवण्याठाया ? ॥ १ ॥**
**आहिक्य परत्र मज चाड नाहीं सर्वथा ।**
**न लगती पुरुषार्थी मुक्ति चारी ॥ २ ॥**
**रंक होऊनीयां पंढरी चोहटा ।**
**राखेन द्वारवंटा महाद्वारीं ॥ ३ ॥**
**विठोबाचे पायीं मज काय उणें ।**
**वासनाचि मनें गिळिली माझी ! ॥ ४ ॥**
**पाळिला पोशिला जन्मोनी जयाचा ।**
**विकिला कायावाचामनें त्यासी ॥ ५ ॥**
**नामा म्हणे स्वामी विठोबातें पुसा ।**
**आज्ञा देइल शिरसा धरीन त्याची ॥ ६ ॥**

दोघेही मग विठोबांकडे गेले व पंढरिनाथांनीं नामदेवरायांस पुढील-प्रमाणें निकाल सांगितलाः—

**प्रत्यक्ष परब्रह्ममूर्ति ज्ञानेश्वर । करीतसे आदर संगतीचा ॥ १ ॥**
**ऐसें भाग्य जेणें सर्वस्वें साधावें । तरीच जन्मावें विष्णुदासा ॥२**
**जावें स्वस्तिक्षेम यावें शीघ्रवत । करावें स्वहित कळेल तैसें ॥३॥**

असें बोलून विठोबांनीं नामदेवांस ज्ञानेश्वरांच्या हातीं दिलें व 'हें कृपेचें पोसणें माझें आवडतें । क्षण जीवापरतें न करीं कदा' असें त्यांस निक्षून सांगितलें. नामदेवाला तीर्थयात्रेला बोळवून देव देवळांत परत गेले.

९. मंगळवेढ्याहून चोखामेळा व आरणभेंडीहून सांवतामाळी हे ह्या संतमेळ्यास येऊन पंढरीस मिळाले. चालतचालत सर्व मंडळी कऱ्हाडाजवळ येऊन पोहोंचली. कऱ्हाडचा राजा रामराय हा चाकणच्या महिपतरावाचा जांवई असून महिपतरावाच्या कन्येस दर्शन देण्याचें ज्ञानेश्वरमहाराजांनीं कबूल केलें होतें. त्या कन्येचें नांव सीताबाई असून तिला साधुसंत, गोसावी, बैरागी, संन्याशी, योगी इत्यादिकांची विचारपूस करून त्यांची सेवा

करण्याची जितकी आवड होती तितकाच रामरायास त्यांचा कंटाळा व द्वेषही वाटत होता ! बाई मोठी धर्मशील, उदार व भाविक होती आणि तिचा पति विषयलंपट व केवळ प्रपंचांत गढून गेलेला होता. बाईनें आपल्या पतीस नित्य बोध करावा कीं, 'इहलोकींचें सर्व वैभव अशाश्वत असून श्रीहरीला भजावें व श्रीहरी संतांच्या मेळ्यांत सांपडत असल्यामुळें संतसेवा करून नरदेहाचें सार्थक करावें !' पण हा बोध त्याला पटत नसे; इतकेंच काय पण साधु व बैरागी पाहिले कीं त्याचें डोकेंच फिरे ! त्यांत कांहीं लुच्चे, ढोंगी लोक असतात हें खरें, पण त्याच्या दृष्टीला ढोंगी तेवढेच दिसत ! सीताबाई जेवढी भाविक, विरक्त व हरिभक्तिपरायण होती, तेवढाच तिचा पति तर्कटी, विषयलंपट व बहिर्मुख होता ! असे विरुद्ध स्वभावाचे जीव एकत्र आणण्यांतही परमेश्वराचा हेतु एकमेकांनीं एकमेकांच्या संगतींत सुधारावें व पतिपत्नी ह्या एकमेकांच्या पुरवण्या असून उभयतांच्या गुणदोषांनीं मिळून उभयतांनीं पूर्ण व्हावें असा असावा असें मला वाटतें ! तुल्यगुणी वधूवर विरळ सांपडतात याचें कारण हेंच असावें. असो. साधुसंतांना आपल्या गांवांत न येऊं देण्याविषयीं रामरायाची सक्त ताकीद होती ! सीताबाईस ज्ञानेश्वरादि संत गांवाबाहेर आल्याचें जेव्हां कळलें तेव्हां ती त्यांच्या दर्शनाविषयीं परम आतुर झाली. ज्ञानेश्वरमहाराज महान् योगी व सिद्ध पुरुष आहेत हें तिला ऐकून माहीत होतें. साधुदर्शनाला ती भुकेलेली होती. ती दासदासी बरोबर घेऊन त्यांच्या दर्शनाला आली, तेव्हां संतमंडळी आत्मरंगांत रंगलेली होती. नामदेवांचें कीर्तन चाललें होतें प्रेमरंग खुलून राहिला होता. 'खऱ्या संताच्या पोटांत एक घांसभर अन्न घातलें तर खुद्द पांडुरंग तृप्तीचा ढेंकर देतात' असें नामदेवांच्या तोंडचें वाक्य ऐकून ह्या संतांना हरप्रयत्नानें आपल्या वाड्यांत केव्हां घेऊन जाईन असें तिला होऊन गेलें. कीर्तनोत्तर ती सर्वांच्या पायां पडून परत गेली, पण रात्रभर तिला झोंप आली नाहीं. साधुसंतांना गांवांत येऊं

द्यायचें नाहीं असा तिच्या पतीचा हुकूम होता व पति स्वभावानें कठोर होता. ज्ञानेश्वरादिकांना मोठ्या सत्कारानें वाड्यांत आणावें, त्यांचे पाय आपल्या वाड्याला लागावे, पतीसह आपण त्यांच्या चरणधुळींत लोळण घ्यावी असें तिला फार फार वाटे, पण उपाय काय? ती मोठी विरक्त होती. तिनें शेवटीं एक साहसी उपाय योजिला. हिरकणीचें चूर्ण करून व तें पाण्यांत कालवून तें पाणी तिनें आपल्या पांच वर्षें वयाच्या एकुलत्या एक मुलास पाजलें! मुलाच्या अंगाचा दाह होऊन मुलगा तात्काळ मृत्यु पावला! वाड्यांत व गांवभर सर्वत्र हाहाःकार उडाला. ज्ञानेश्वरमहाराजांच्या सामर्थ्यावर विश्वसून ती मात्र स्थिर राहिली. राजाच्या तोंडचें पाणी पळालें. तेव्हां ' आपण साधूंचा आजवर छळ केलांत त्याचा हा परिणाम होय, अजून तरी साधूंची पायधूळ मस्तकीं धारण करा ' असा तिनें आपल्या पतीस बोध केला. इतक्यांत एका ब्राह्मणानें येऊन संतमंडळी गांवाबाहेर उतरल्याचें वृत्त राजास सांगितलें. पुत्रहानीमुळें राजा दीन झाला होता, त्याचें चित्त थाऱ्यावर नव्हतें, अशा वेळीं कोणी काय सांगेल त्याप्रमाणें वागण्यास तो तयार झाला. इंगा फिरल्याबरोबर तो गरीब गाईसारखा दीन झाला. राणीनें व इतरांनीं सुचविल्यावरून तो गांवाबाहेर संत उतरले होते तेथें गेला. ज्ञानेश्वरादि संतांचें दर्शन होऊन त्यांस वाड्यांत येण्याविषयीं त्यानें नम्रतापूर्वक प्रार्थना केली. ज्ञानेश्वरमहाराजांचे पाय आपल्या वाड्यास लागतांच राणीस आनंद झाला. त्यांच्या पायांचें तीर्थ मृतपुत्राच्या तोंडांत घालतांच मुलगा उठून बसला व त्याबरोबर राजाचा मद पार नाहींसा होऊन राजा ज्ञानेश्वरमहाराजांच्या चरणावर भक्तिभावानें गडबडा लोळूं लागला! महाराजांनीं राजाच्या मस्तकावर हात ठेवून त्याला कृतार्थ केलें. सीताबाई आणि रामराजा दोघेही यापुढें हरिभजनांत रंगून गेलीं. बाईनें अचाट धाडस केलें खरें, पण त्यामुळें तिच्या पतीच्या डोळ्यांत झणझणित अंजन पडलें व तो सद्गुरूच्या कृपेस पात्र होऊन भार्येसह उद्धरून गेला.

१०. एके प्रसंगीं नामदेव व ज्ञानदेव हे दोघेही ब्रम्हानंदांत निमग्न झालेले महात्मे गोष्टी सांगत मार्गक्रमण करीत होते. नामदेवांचें चित्त पांडुरंगीं रंगलें होतें व पंढरीस जाऊन देवाला कडकडून कधीं भेटेन असें त्यांस होऊन गेलें होतें. ज्ञानेश्वरांस मनांतून नामदेवरायांची परमविव्हळता पाहून आनंद होत होता. त्यांना हृदयांतून त्यांची एकनिष्ठ भक्ति पाहून आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या. 'तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलता' हें भक्तीचें लक्षण नारदांनीं भक्तिसूत्रांत केलें आहे, तें अक्षरशः नामदेवास लागू होतें. त्यानीं आपले कायावाचामनाचे सर्व व्यापार विठ्ठलाला समर्पण केले होते व त्याच्या विस्मरणानें म्ह० वियोगानें ते परम व्याकुळ होत होते. 'फुटोनी हृदय होती दोनी भाग। बहु मज उद्वेग वाटताती.' ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्यांची पुष्कळ समजाविशी केली:—

**प्रेमाचा जिव्हाळा तुझ्या हृदयीं आला। तूं कां वेळोवेळां खंती करिसी ? ॥ १ ॥**

**विचारीं सावध होउनी भक्तराजा। सुखानंदु तुझा तुजचि जवळीं**
**व्यापकु विठ्ठल आहे सर्वदेशीं। जरी सांडोनियां पाहसी भेदभ्रमु**
**सर्वगत संपूर्ण सर्वकाळ असणें। होणें आणि जाणें नाहीं जया॥**
**तें तुजमाझारीं तूं तयाभोतरीं। अनुभवीं निर्धारीं ठेवुनि मना॥५॥**

इतका यथार्थ बोध झाला तरी 'पंढरीनिवास जीवन माझें' हा नामदेवांचा छंद सुटला नाहीं. ज्ञानेश्वरमहाराजांना नामदेवांच्या संवादापासून फार सुखानंद होत होता. महाराज स्वतः पूर्णानंदभरित होते तरी नामदेवांची एकदेशीपणाची पण कडेलोटाची निस्सीम भक्ति पाहून ते सुखच पावत होते. त्यांनीं त्या 'प्रेममूर्ति' नामदेवाला—

**कैसा तो साधावा सांग भजनविधि। कैसी मन बुद्धी सत्वशीळ**
**कैसा निर्विकार ध्यानाचा प्रकार। हा सर्व विचार सांग मज ॥२॥**

असे प्रश्न केले. यावर 'नव्हे बहुश्रुत नव्हे ज्ञानशीळ। दास मी दुर्बळ वैष्णवांचा' असें म्हणून 'येवढें भाग्य कैचें मज जाणिवेचें' असें

नामदेव बोलले. मी नेणता म्हणून देवानें मला तुम्हां हातीं निरविलें, तुमच्यापुढें मी काय बोलावें, पण तुम्ही आज्ञापितां त्याअर्थीं देव बोलवील तसें बोलतों, असें म्हणून ते बोलूं लागले. 'मनीं शंका न ठेवतां व दृष्टि दुजेपणीं न ठेवतां आपला सुखानुभवच बोला' असें ज्ञानेश्वर पुन्हां म्हणाले. यावर नामदेव म्हणाले:—

**नामसंकीर्तन** वाटे मज गोड । येर ते कावाड वायांवीण ॥ १ ॥
**नमन** तें नम्रता न देखे गुणदोष । अंतरीं प्रकाश आनंदाचा ॥ २ ॥
**ध्यान** तया नांव निर्विकार निकें । जें विश्वीं माझ्या देखे विठोबासी ॥३॥
अखंड हृदयीं तेचि आठवण । साजिरे समचरण विटेवरी ॥ ४ ॥
व्यवसायीं चित्त ठेउनी कृपण । लाभाचें चिंतन सर्वकाळ ॥ ५ ॥
कीटकी भिंगुरटीचें जैसें अनुसंधान । निकें निजध्यासन एकविध ॥ ६ ॥
सर्वभावें एक विठ्ठलाचि ध्यायें । सर्वांभूतीं पाहे रूप त्याचें ॥ ७ ॥
सर्वांहूनि निराळा रजतमावेगळा । भोगी प्रेमकळा तेचि **भक्ती** ॥ ८ ॥
अनुरागें गोविंद ध्यायिजे एकांतीं । यापरती विश्रांती आणिक नाहीं ॥९॥
काया वाचा मनें हा माझा अनुभव । सांगितला सर्व आवडीचा ॥ १० ॥
**नामा** म्हणे हेंही बोलविले तेणें । उदार सर्वज्ञें पांडुरंगें ॥ ११ ॥

हें ऐकून ज्ञानेश्वर सुखरोमांचित झाले व 'माझ्या नामयाचें बोलणें सर्व काळ ऐकतच रहावें' असें त्यांस वाटलें. कवि, आत्मज्ञानी, विरक्त, जीवन्मुक्त, पाठक, साधक, ग्रंथकार कोणीही असोत पण नामदेवांच्या भाषणांत जें अपार सुख आहे 'ते सुखविश्रांती नाहीं हो कल्पांतीं । विचारावें संतीं दूरदृष्टीं' असें ज्ञानेश्वर प्रेमानें म्हणाले, आणि सर्व संतांनीं भक्तिसुखान्वित होऊन 'पुंडलीकवरदे हारिविठ्ठल' चा जयजयकार केला.

११. याप्रमाणें सर्व मंडळी मार्गक्रमण करीत असतांना एके दिवशीं तेरगांवीं येऊन पोहोंचली. तेथें गोरोबा कुंभार राहत होते. गोरोबांनीं संतांचें मोठ्या भक्तिभावानें आतिथ्य केलें. प्रत्येक मुक्कामास नामदेवांचें कीर्तन होत असे. सर्व संतांना नामदेवांची निरुपम भक्ति व दगडानाही

पाझर फोडणारा त्यांचा प्रेमळपणा पाहून फार आनंद होई. नामदेवांना पंढरिनाथांचा सारखा ध्यास होता. पांडुरंग त्यांच्याशीं बोलत, त्यांच्याबरोबर खेळत, व त्यांचा संसार चालवीत. नामदेव पूर्ण सगुणभक्त होते आणि सर्वात्मभावाचा बोध त्यांच्या ठिकाणीं उदित झाला नव्हता, सद्गुरुकृपेला ते अजून पात्र झाले नव्हते, खरें स्वरूपज्ञान त्यांस अद्याप झालें नव्हतें. हें गुरुकृपेवांचून होत नाहीं. प्रत्यक्ष पांडुरंग आपल्याशीं बोलत असतां गुरु काय करायचा आहे अशी उर्मी त्यांच्या ठिकाणीं होती. ती जाऊन सगुणनिर्गुण, दृश्यादृश्य, व्यक्ताव्यक्त सर्व श्रीहरीचेंच सहजस्वरूप आहे, असा शुद्ध बोध त्यांच्या ठिकाणीं जागृत व्हावा, अशी श्रीज्ञानेश्वरमहाराजांची इच्छा होती. त्याप्रमाणें पुढील मौजेचा प्रकार एक दिवस घडून आला. गोरोबांच्या घरीं मडकीं घडण्याचीं अनेक हत्यारें होतीं, त्यांत एक थापटणेंही होतें. तें हातीं घेऊन सर्व संत सन्मुख बसले असतांना —एके दिवशीं मुक्ताबाई गोराबापुढें आली व 'काका ! हें काय आहे ' म्हणून त्यांस विचारती झाली. 'मडकीं कच्चीं आहेत का पक्कीं आहेत हें या थापटण्यामुळें मला कळतें' असा गोरोबांनीं सहज जबाब केला. यावर मुक्ताबाई म्हणाली. 'काका ! हीं सर्व माणसें ईश्वरनिर्मित मडकींच आहेत, यांपैकीं कच्चीं कोणतीं व पक्कीं कोणतीं हें तुम्हांला सांगतां येईल काय ?' तिचा हा प्रश्न ऐकतांच गोरोबांनीं तें थापटणें हातीं घेतलें, व प्रत्येक संताच्या मस्तकावर तें मारून ते पाहूं लागले, तेव्हां कोणी कांहीं बडबड केली नाहीं. नामदेवापाशीं येतांच मात्र नामदेव वेगानें उठले व म्हणाले, 'हं खबरदार ! माझ्या मस्तकावर थापटणें मारूं नका हो ! मी इतरांसारखा गप्प बसणारा नाहीं.' हा त्यांचा आवेश पाहून ह्या सर्व मडक्यांत हें मडकें कच्चें आहे असें गोरोबा थापटणें त्यांच्या मस्तकाला लावून म्हणाले, व सर्व मंडळींत एकच हास्यरस पिकला. नामदेवांस ह्या अपमानाबद्दल फार वाईट वाटलें. पुढें पंढरीस गेल्यावर त्यांनीं हा प्रकार पांडुरंगास सांगितला व देवानें सांगितल्यावरून

त्यांनीं विसोबाखेचरांचा अनुग्रह घेतला. पण ह्या गोष्टीचें सविस्
नामदेवचरित्रांत येईल. वरील गोष्टीचें तात्पर्य मोरोपंत पुढील ल
आर्येंत सांगतातः—

सद्गुरु-अनुग्रहाविण हरिला तो कठिण सर्वथा पट
गोरा संत परीक्षी मस्तकिं हाणूनि सर्व थापटणें ॥

१२. सर्व मंडळी गोरोबांची आज्ञा घेऊन तेथून निघाली
रात्रीच्या सुमारास अवंढ्यानागनाथीं येऊन पोंचली. शिवरात्रीच्य
नामदेव कीर्तनास उभे राहिले तेव्हां हजारो श्रोते हरिरंगीं रंगून
ब्राम्हणांची अभिषेक करण्याची वेळ होती. त्यांच्या सोंवळेपणा
गाला ह्या वारकऱ्यांची अडचण होऊं लागल्यामुळें नामदेवांनीं दे
पिछाडीस कीर्तन चालविलें; तों काय चमत्कार सांगावा कीं म
ब्राह्मणांकडे पाठ फिरवून नामदेवरायांकडे तोंड केलें! अद्याप तेथें
श्वर शंकराच्या पुढें नसून पाठीमागेंच आहे. ह्या गोष्टीचें तात्पर्य
आहे कीं, परमात्मा नुसत्या पूजासंभारांना, मंत्रतंत्रांना व कर्माला व
नामदेवासारख्या निस्सीम भक्तांच्या भक्तिप्रेमालाच सर्वस्वी वश अ
उपचारें कवणाही नाकळे गा.' (ज्ञाने. ९–३६७) ही भगवंताची
आहे. देव प्रेमाला भुलतो, बाह्य उपचारांला व डामडौलाला भुल
वेद, यज्ञ, अध्ययन, दान, सत्क्रिया, उग्रतप इत्यादि साधनांनींही
णारें तें श्रीहरीचें विश्वरूप परमभक्त अर्जुनाला दिसलें नाहीं क
साधनें व्यर्थ आहेत असें नव्हे. वेद, यज्ञ, अध्ययन, दान, सत्क्रिया
ह्या साधनांचा त्याग करावयाचा असें नाहीं. उलट 'यज्ञदानतप
त्याज्यं कार्यमेव तत्' असा भगवंतांनीं आपला 'निश्चय' (गीता अ.
सांगितला आहे. 'तरी स्वाधिकारानुरूपें। तिये यज्ञदानादि तपें
छावींचि साक्षेपें। अधिकेवरी.' (ज्ञाने. १८–५३) हीं यज्ञदानादि
पावन म्हणजे चित्तशुद्धिकर आहेत म्हणून त्यांचा त्याग उचित
तथापि भक्तिप्रेमावांचून हींही व्यर्थ आहेत, म्हणजे हरिप्राप्ति करून

असमर्थ आहेत. श्रीहरी ' भक्तिविना वश नोहे. ' विद्वान्, वेदपारंगत अशा ब्राह्मणांचा अभिषेक चालला असतांना देवांनीं तिकडे पाठ करावी आणि नामदेवासारख्याची 'प्रेम अमृताची धार। वाहे देवाही समोर' ह्या प्रकारची अंतरंग प्रेमामृताची धार। स्वतः सन्मुख होऊन मस्तकीं धारण करावी, हें त्या प्रेमळ चित्तचोराला उचितच आहे.

१३. ज्ञानेश्वरमहाराज तीर्थयात्रा करीत करीत सातपुड्यापर्यंत आले. तेथें हरपाल नांवाचा एक भिल्ल होता. तो पंढरीचा वारकरी होता व विठ्ठलाचा मोठा भक्त होता. विठ्ठलरुक्मिणीचें नांव ज्यांच्या मुखांत असेल त्यांच्या अंगाला हात लावायचा नाहीं, व इतर कोणीही भेटला तर त्याला लुबाडायचें असा त्याचा कायदा होता ! ! त्यानें या संतमंडळाचें फार प्रेमानें आतिथ्य केलें. त्या ' शबरी ' च्या वंशजाचें शुद्ध प्रेम पाहून ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्याच्यावर अनुग्रह केला व त्यानें हातीं तिरकमठा घेऊन त्यांना धारेपर्यंत पोहोंचाविलें. धारेस कमलाकरभट्ट नामक ब्राह्मणाच्या घरीं हे सर्व संत उतरले. त्याचा गोपाळनामक पुत्र सर्पदंशानें मृत झाला होता; त्यास ज्ञानेश्वरमहाराजांनीं जिवंत केलें. तेथें दोन दिवस राहून मंडळी उज्जनीस गेली. तेथें वीरमंगळ* नांवाचा एक प्रख्यात ज्योतिषी राहत होता. त्याला पूर्वीं रामानंदांनीं सांगितलें होतें कीं, ' तूं येथेंच रहा, येथें सात वर्षांनीं ज्ञानेश्वर नांवाचे सत्पुरुष येतील व ते तुझा उद्धार करतील.'

* ह्या वीरमंगळाची गोष्ट मोठी गंमतीची आहे. हा उज्जनीच्या दरबारचा ज्योतिषी होता. त्यास चांगला राजाश्रय असून त्याची तिकडे मान्यता चांगली होती. उज्जनीचा राजा परमारान्वय दुसरा भोज ( शके १·०२–१२३२ ) हा विचारी, सदाचारी व पापभीरु होता; तथापि एके दिवशीं मृगयेस जातांना एका रजकस्त्रीवर त्याचें मन गेलें. ही स्त्री लावण्यवती असून तिच्या ऋतुप्राप्तीचा तो चतुर्थदिन होता. राजानें विचारानें आपलें मन आवरलें. तथापि आपल्या चित्तांत भलताच अभिलाष उत्पन्न झाला, याबद्दल त्यास फार विषाद वाटला. आर्यांचें आर्य मन अनार्य वस्तूच्या ठिकाणीं चुकून सुद्धां रमायचें नाहीं. कण्वाश्रमांत दुष्यंताच्या दृष्टीस शकुंतला पडतांच राजाचें मन मोहित

( पान १०६ पहा. )

त्याप्रमाणें तो वीरमंगळ दुग्धाहार करून सात वर्षें राहिला होता. सात वर्षांनीं ज्ञानेश्वरमहाराज उज्जयिनीस आले तेव्हां त्यानें त्यांस सामोरें जाऊन व सद्गदित होऊन त्यांच्या पायांवर लोटांगण घातलें. महाराजांनीं त्यास आत्मबोध करून कृतार्थ केलें. 'श्रीगुरुदर्शनाचा योग पुनः येणार नाहीं म्हणून आतांच हा देह गुरुचरणीं समर्पण करितों,' असें म्हणून त्यानें ज्ञानेश्वरमहाराजांच्या चरणीं मस्तक ठेवून तात्काळ तेथेंच देह ठेविला. महाराजांनीं स्वहस्तानें त्यास समाधि दिली व त्यावर शिवलिंगाची स्थापना केली. हें स्थान मंगळेश्वर नांवानें प्रसिद्ध असून अद्याप उज्जयिनीच्या बाहेर संदीपनाच्या आश्रमाजवळ आहे असें म्हणतात.

---

( पान १०५ वरून समाप्त )

झालें, तेव्हां तो आर्यनृपति मोठ्या अभिमानानें म्हणाला होता, ( कालिदास-कृत अभिज्ञानशाकुंतल नाटक अंक १ पहा. )

**असंशयं क्षत्रपरिग्रहक्षमा । यदार्यमस्यामभिलाषि मे मनः ॥**
**सतांहि संदेहपदेषु वस्तुषु । प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः ॥**

'माझें आर्य मन ज्या अर्थीं इचा अभिलाष करितें त्या अर्थीं मजसारख्याशीं विवाहसंबंधानें बद्ध होण्यास उचित अशा क्षत्रियकुळांतच ही जन्मली असली पाहिजे.' हा दुष्यंताचा आर्यविचार मनांत येऊनच कीं काय कोण जाणे पण तो पापभीरु राजा मनांत फार खजील झाला. असो. राजानें वरील वीरमंगळ ज्योतिष्यास विचारलें कीं, 'मी मृगयेला जातांना माझ्या मनांत काय आलें होतें तें माझे ग्रह पाहून सांगा, नाहीं तर तुम्हांला दरबारचा आश्रय बंद होईल.' वीरमंगळानें सात दिवसांची मुदत मागून घेतली. तो बिचारा आपला राजाश्रय तुटेल म्हणून घाबरून गेला. सातवे दिवशीं त्याची एका वेश्येची आकस्मिक गांठ पडली. त्याच्या चिंतेचें कारण समजतांच त्या वेश्येनें नेमकें उत्तर दिलें! त्यावरून ज्योतिष्यानें राजास रजकस्त्रीदर्शनाच्या वरील प्रसंगाचें स्मरण दिलें. ज्योतिष्यावरचें संकट टळलें, व त्याच्या अत्याग्रहास्तव सदर वेश्येनें त्यास कळविलें कीं 'मी काशीच्या रामानंदांची शिष्यीण असून हें सामर्थ्य त्यांच्या प्रसादाचें आहे!' ज्योतिषी यावर रामानंदांकडे गेला तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, 'तुला ७ वर्षांनीं ज्ञानेश्वर भेटतील व त्यांच्यापासून सर्वज्ञान प्राप्त होईल.'

१४. ज्ञानेश्वरमहाराज यानंतर प्रयागास गेले. तेथें त्रिवेणीचें स्नान करून व भारद्वाजाश्रम पाहून ते काशीस गेले. त्या वेळीं मणिकर्णिकेच्या घाटावर मुद्गलाचार्य मोठा यज्ञ करीत असल्यामुळें काशीस वैदिक, शास्त्री, पुराणिक इत्यादि विद्वान् ब्राह्मणांची मोठी दंगल उडून राहिली होती व यज्ञप्रसंगीं अग्रपूजेचा मान कोणास द्यावा याबद्दल तंटा माजून राहिला होता. तो तंटा मिटेना तेव्हां मुद्गलाचार्यांनीं एक हस्तिनी आणून तिच्या सोंडेंत एक पुष्पमाला दिली व ती ज्याच्या गळ्यांत माला घालील त्याची अग्रपूजा करावी असें ठरविलें. प्रत्येकास वाटे कीं, हा मान मला मिळावा, पण या मानाची रेसभर अपेक्षा नसलेल्या ज्ञानेश्वरांच्या गळ्यांत ती माळ येऊन अचानक पडली व आमच्या संतमंडळींनीं त्याबरोबर 'पुंडलीक-वरदे' च्या जयघोषांनीं काशिक्षेत्र दणागून सोडलें ! जे खरे श्रेष्ठ ते सर्वत्र श्रेष्ठ म्हणूनच निवडले जावेत यांत कांहीं आश्चर्य नाहीं. सूर्यबिंब बचके-एवढें असूनही त्याचा प्रकाश त्रिभुवनांत भरून राहतो, त्याप्रमाणें ज्ञाने-श्वरमहाराजांचें वय व आकृति लहान असूनही ते जेथें जेथें गेले तेथें तेथें विश्वाला वंद्यच झाले. जो पहिला तो कोठेंही गेला तरी पहिलाच ठरा-यचा ! सिंहाचा बच्चा असंख्य पशूंचे समुदाय मिळाले तरी त्यांत राजाच ठरायचा. नक्षत्रतारांच्या सभेंत चंद्राचें अध्यक्षस्थान आधींच ठरलेलें आहे; त्याचप्रमाणें सकल दैवीसंपत्तीचे अभयादि सव्वीस गुण ज्यांच्यापुढें हात जोडून उभे होते ते 'ज्ञानियांचा राजा गुरु महाराव' असे ज्ञानेश्वरमहाराज सकल पंडित सभेंत अग्रपूजेच्या मानास पात्र झाले हें साहजिकच आहे. ज्ञान्यांच्या राजाचीच ज्ञान्यांच्या सभेंत अग्रपूजा व्हावयाची. महाराजांचा अधिकारच जगद्‌गुरुपणाचा होता. ते ईश्वरी विभूति किंबहुना साक्षात् ईश्वरच होते. "तयातें वोळखावया हेचि संज्ञा । जे जगें नमस्कारिजे आज्ञा । ऐसे आथी ते जाण प्राज्ञा । अवतार माझे" (ज्ञाने० अ० १०–३११) ह्या महाराजांच्या उक्तीची सत्यता मला तरी त्यांच्या ठिकाणींच दिसते. ज्याच्या आज्ञेचें अक्षर झेलायला जग उत्कंठित होतें तोच हरीचा अवतार होय. महाराजांना अग्रपूजेची काय किंमत होती म्हणा, पण काशीकरांचें महद्भाग्य

कीं त्यांना श्रीज्ञानेश्वरचरणांचें प्रत्यक्ष दर्शन झालें. असो. यज्ञाचा पुरोडाश श्रीकाशीविश्वेश्वरांनीं स्वतः ज्ञानेश्वरांच्या हातून भक्षण केला. मणिकर्णिकेच्या घाटावर एके दिवशीं श्रीगुरुदत्तदेव, मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ ह्या त्रिमूर्तींचें निवृत्तिज्ञानेश्वरादिकांस दर्शन झालें व त्यांच्या भेटीचा तो अपूर्व सोहळा नामदेवादि भक्तांसही पहावयास मिळाला. जगद्रूप हरीला अखंड मनीं सांठवून किंवा अंगें तोच होऊन जे त्रिभुवनांत खेळत असतात त्यांच्या दर्शनसंवादाचा सुखसोहळा म्हणजेः—

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ।**
**कथयंतश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥**

श्रीगीता अ. १०–९

ह्या प्रकारचाच असतो.

१५. नामदेवरायांनीं दिल्लीस गाय उठविल्याची कथा महिपतबावांनीं भक्तविजयांत ( अ० १० ) सांगितली आहे. तीर्थयात्रेचा पंथ क्रमीत असतां आपली संतमंडळी हस्तिनापूर उर्फ दिल्ली येथें आली. टाळ, विणे, मृदंग घेऊन कीर्तनांत प्रेमानें नाचणारे हे महाराष्ट्रीय संत तिकडच्या हिंदूंनीं पाहिले तेव्हां त्यांना फार आनंद झाला. पण वाद्यांचा गजर आणि नामाचा घोष यांनीं सारी नगरी दुमदुमून गेलेली दिल्लीपतीनें जेव्हां पाहिली तेव्हां त्याला मनस्वी संताप आला. त्या वेळीं म्हणजे शके १२१४।१५ च्या सुमारास दिल्लीस जलालउद्दीन खिलजी हा बादशहा तख्तावर असून पुढें देवगिरीच्या राज्यास खो देणारा त्याचा पुतण्या अल्लाउद्दीन खिलजी हा दिल्लीस मुख्य सुभेदार होता. मुसलमानांची सत्ता दिल्लीस स्थापित झाली असून ती आपले हातपाय सर्व हिंदुस्थानभर पसरण्याच्या उद्योगास लागली होती. अशा वेळीं आमचे मराठी संत दिल्लीस जाऊन आपल्या नामघोषानें हिंदुप्रजेचीं अंतःकरणें स्वधर्मप्रीतीनें भरून टाकीत होते. पण तें तेथील कडव्या

यवनांस कोठून रुचणार ? एके दिवशीं नामदेवांचें कीर्तन ऐन रंगांत आलें असतांना बादशहाची स्वारी अकस्मात् तेथें आली:—

**टाळ मृदंग विणे सुस्वर । नादें दुमदुमिलें अंबर ।**
**त्यांतही टाळियांचा गजर । अपरंपार ओढवला ॥ १७५ ॥**
**तंव तेथें अविंधें केलें काय । कीर्तनरंगीं वधिली गाय ।**
**नामदेवासी बोलिला काय । गातोसी काय कुफराणा ॥१७६॥**
**धेनु उठविशील येथ । तरी तुझें गायन मानूं सत्य ।**
**नाहीं तरी तुजही यथार्थ । आपुले हातीं वधीन ॥ १७७ ॥**

हें ऐकतांच नरनारी सर्व चिंताक्रांत होऊन गेली व ह्या विक्षेपानें कथेचा सारा प्रेमरंग वितळून गेला. नामदेवांनीं श्रीहरीचा अट्टहासानें धांवा केला. गाईचें शिर आपल्या मांडीवर घेऊन नामदेवांनीं पंढरीनाथास आळविण्यास प्रारंभ केला. पुढें काय झालें ?:—

**म्हणे देवा ! धांव सत्वर । नाम्यासी ग्रासूं आला काळ ।**
**जैसें मीनासी नसतां जळ । होउनि व्याकुळ तळमळती ॥ २०६ ॥**
**ऐसें करुणाशब्द ऐकोनि कानीं । तत्काळ पावला चक्रपाणी ।**
**नामयाचे हृदयभुवनीं । प्रगट झाले तेधवां ॥ २०७ ॥**

मग नामदेवांचा हस्तस्पर्श होतांच गाय उठून उभी राहिली. संकट टळलें. ज्ञानेश्वरांनीं नामदेवांची पाठ थोपटली व भक्तियोगाचें सामर्थ्य पाहून सर्व सज्जन संतोष पावले.

१६. ज्ञानेश्वरमहाराज काशीच्या पंचक्रोशींत फिरून गया, अयोध्या, गोकुल, वृंदावन, द्वारका, गिरनार इत्यादि तीर्थें हिंडत मारवाडांत आले. मारवाडांत पाण्याचा ठणठणाट असतो, हें प्रसिद्धच आहे. एके दिवशीं नामदेवज्ञानेश्वर हे मध्यान्हीच्या सुमारास फार तृषाक्रांत झाले. वाटेंत त्यांस एक कुवा ( कूप ) आढळला, पण त्याचें पाणी अतिशय खोल असून यांच्याजवळ दोरपात्र नव्हतें. आतां येथें

रिघाव कसा व्हावा व प्राण कसे वांचावेत हा प्रश्न येऊन पडला. ज्ञानेमहाराज योगीच होते. त्यांनीं "लघिमेचें लाघव करूनि ते अवसरीं !। उतरोनि भीतरी घेतलें उदक" म्हणजे *लघिमासिद्धीचा आश्रय करून म्ह० अणुप्रमाण देह धारण करून आपली तहान भागवून घेतली व 'तुझ्या हातीं उदक आणून देतों,' असें ते नामदेवांस म्हणाले. पण हें दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणें नामदेवांनीं मान्य केलें नाहीं. आत्मा विठ्ठल सर्व देहीं असतांना माझी चिंता त्या समर्थाला नाहीं काय असें वाटून नामदेवांनीं पांडुरंगाचें ध्यान केलें, व त्याला आळविण्यास प्रारंभ केलाः—

**तूं इष्टमित्रबंधु सोयरा जननी जनकु ।**
**नेणें मी आणिकु तुजवांचोनी ॥ १ ॥**
**येईं पंढरिराया ! मजलागीं धांवतु ।**
**झणी पाहसी अंतु कृपाळुवा ॥ २ ॥**
**जन्मोनी पोसणा तुझाचि म्हणति ।**
**मोकलितां अंतीं लाज कोणा ? ॥ ३ ॥**
**सर्वभावें तूं मजलागीं लोभापर ।**
**मी तुझा डिंगर आवडता ॥ ४ ॥**

ह्याप्रमाणें सद्गदितांतःकरणानें नामदेवांनीं हांक फोडली. एखाद्या रंकानेंही आडलेपणानें काकुळती येऊन धांवा केला, तरी जो आर्तबंधु मनोवेगानें धांवत येतो, तो भक्ताच्या हांकेसरसी उडी कशी नाहीं घालणार ! ज्ञानेश्वर पहात असतांनाच 'तंव गडगडीत कूप उदकें वोसंडिला। कल्पांतीं खवळला सिंधु जैसा' म्हणजे तो कूप पाण्यानें भरून वाहूं लागला ! नाम-

* योगशास्त्रांत अष्टमहासिद्धि व दशगौणसिद्धि अशा अठरा सिद्धि वर्णिल्या आहेत. इतर क्षुद्र सिद्धि तर अनंत आहेत. महासिद्धि भगवत्स्वरूपाकार झालेल्या महात्म्यांच्या अंगीं सहज असतात व गौणसिद्धि सत्वगुणोत्कर्ष झाल्यानें प्राप्त होतात. अणिमालघिमा इ० महासिद्धि होत. लघिमा म्ह० शरीर लघु (हलकें किंवा परमाणुइतकें लहान) होणें. ह्या सिद्धींची व्यवस्था भागवतांत ११व्या स्कंधांतल्या १५ व्या अध्यायांत पहावी व त्यावरील नाथांची सविस्तर टीकाही ध्यानीं आणावी.

वानें भक्तीनें देव कसा ऋणी करून ठेविला आहे हें पाहून ज्ञानेश्वरादि र्व संतांस मोठा आनंद झाला, व योगाभ्यासानें प्राप्त होणाऱ्या सिद्धि क्तियोगाच्या बळावर भक्तालाही सहज प्राप्त होतात या तत्वाची बाकीच्या वांस प्रतीति आली.

१७. तीर्थयात्रा संपवून संतमंडळी परत पंढरपुरास आली व नामदेवास हून विठोबास आनंद झाला. ' जिवलग भेटला विठोबासी. '

**द्गदित कंठ वोसंडला नयनीं । घातली लोळणी चरणांवरी ॥१॥**
**णलों पंढरिराया पाहें कृपादृष्टी । थोर झालों हिंपुटी तुजवीण**
**दंडा तीर्थांची ऐकों जाय प्रौढी । चित्त माझें ओढी चंद्रभागे**
**टितटीं जेणें कर नाहीं ठेविले । न देखे पाउलें विटेवरी ॥ ४ ॥**
**यातें म्हणतां देव माझें लाजे मन । ते कष्ट दारुण कवणा सांगूं ५**
**चे गरुडटकें न देखे पताका । त्या देवाची शंका वाटे थोर ॥६॥**
**याचे गांवीं नाहीं वैष्णवांचा मेळु । न देखे सुकाळु हरिकथेचा ७**
**न देखे तेथें खंती वाटे जीवीं । ते वेळीं आठवी रूप तुझें ॥ ८ ॥**
**ष्ट मित्र बंधु तूं कुळदेवता । नामा म्हणे आवडता प्राण माझा ९**

असो. पंढरीस नामदेवांनीं यात्रेचें जंगी मावंदें केलें. त्या प्रसंगाचें ामदेवांनींच फार बहारीचें वर्णन केलें आहे, पण त्याचा विशेष विस्तार ामदेवचरित्रांत करणें युक्त होईल म्हणून येथें त्याबद्दल कांहीं लिहीत ाहीं. त्या प्रसंगी पंढरीस निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर सोपानदेव, विसोबा खेचर, रहरि सोनार, सांवता माळी, जनमित्र, चोखामेळा, बंका, गोरा कुंभार तके संत प्रत्यक्ष हजर होते असें नामदेवराय स्वतः सांगतात. ही सर्व डळी मावंद्यालाच पंढरीस जमली असें नसून यापैकीं बहुतेकजण यात्रेला रोबरच गेले होते असें स्पष्ट दिसतें. असो. पंढरीचें मावंदें संपल्यावर र्व संत आपापल्या ठिकाणीं गेले, त्याप्रमाणें ज्ञानेश्वरमहाराज आपल्या ावंडासह परत आळंदीस आले.

---

# ७ चांगदेव आणि ज्ञानदेव.

**योगयागविधी येणें नोहे सिद्धी ।**
**वायांचि उपाधी दंभधर्म ॥ १ ॥**

—हरिपाठ.

१ दोन चांगदेव. २ चांगा वटेश—त्यांची विद्वत्ता व त्यांच्या सिद्धि. ३ चांगदेवांना 'वटेश्वर' म्हणण्याचें कारण. ४ ज्ञानेश्वरांच्या भेटीची उत्कंठा. ५ कोरा कागद. ६ 'चांगदेवपासष्टी'चा सारांश. ७ चांगदेव व ज्ञानदेव यांच्या भेटीचा अपूर्व प्रसंग. ८ चांगदेवज्ञानदेवसंवाद. ९ चांगदेवांची शरणागति. १० मुक्ताबाईचा उपदेश.

१. ज्ञानेश्वरमहाराजांच्या चरित्रांत चांगदेवांचा बराच संबंध येत असल्यामुळें त्यांच्यासंबंधानें एक स्वतंत्र प्रकरण येथें घालणें अवश्य आहे. चांगदेव या नांवाचे अनेक पुरुष होऊन गेले आहेत व त्यांतही चांगा वटेश्वर व चांगा मुधेश ह्या दोन व्यक्ति भिन्न आहेत ही गोष्ट प्रथम नीट लक्षांत ठेविली पाहिजे. आपणांस ज्या चांगदेवांचा विचार कर्तव्य आहे ते चांगा वटेश्वर हे होत. चांगा वटेश्वर ह्यांच्या तपश्चर्येचें स्थान तापीतीरीं होतें तरी त्यांनीं समाधि पुणतांब्यास घेतली; व चांगा मुधेश हे पुणतांब्यांतच राहत असून त्यांनींही पुणतांब्यासच समाधि घेतली. ह्याप्रमाणें दोघेही पुणतांब्यासच समाधिस्थ झाले असल्यामुळें व दोघेही परमयोगी असल्यामुळें दोघांच्या हकीकतीची भेसळ कोठें कोठें झाली आहे. ज्ञानेश्वरांचे समकालीन चांगदेव—जे चांगा वटेश्वर ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत ते—शके १२१८ मध्यें समाधिस्थ झाले व मुधेश चांगा ऊर्फ चांगा केशवदास हे शके १४२७ मध्यें समाधिस्थ झाले. ह्याप्रमाणें दोघांत २००।-२२५ वर्षांचें अंतर आहे व मुधेश चांगा हे वटेश्वर चांगांच्याच अनुग्रहानें कृतार्थ झाले आहेत. ज्ञानेश्वरमंडळांत समाविष्ट झालेल्या वटेश्वर चांगदेवांच्या चरित्राकडे आतां आपण वळूं.

२. चांगदेवाच्यारूपानें मरुद्गणच भूलोकावर अवतरले आहेत असें त्यांचें अनुपम लावण्य, त्यांच्या सहजप्राप्त सिद्धी, त्यांची क्षमाशीलता व त्यांची दिव्य अंगकांति यावरून तत्कालीन लोकांस वाटलें. तपोबलानें त्यांचा देह तेजःपुंज झालेला पाहून त्यांस लोक 'चांगदेव' ( चांगला देव ) असें म्हणूं लागले. त्यांची उपासना शंकराची होती. श्रीशंकराच्या प्रसादानें त्यांना नाना विद्या व नाना कला प्राप्त झाल्या. श्रुति, न्याय, व्याकरण, ज्योतिष, रसविद्या, नाडीज्ञान, धनुर्विद्या, कामशास्त्र, गायनकला, इत्यादिकांत चांगदेव निपुण झाले. ह्याशिवाय परकायाप्रवेश, दुसऱ्याचें मनोगत जाणणें, वस्तुमात्राची परीक्षा करणें, उदकावर चालणें या गोष्टी त्यांना सहज होऊन बसल्या होत्या. वज्रासन साधून त्यांनीं षट्चक्रभेदन केलें होतें; इतकी योग्यता चांगदेवांस प्राप्त झाली होती. तरी महिपतबावांनीं म्हटल्याप्रमाणें "चौदा विद्या चौसष्ट कळा । अवगत असल्या जरी सकळा । परी चित्तीं नसली एक प्रेमकळा । तरी त्या विकळा अवघ्याचि." ती प्रेमकळा चेतविणारा कोणी महामांत्रिक त्यांना बहुत काळ भेटला नसल्यामुळें सिद्धाईचे चमत्कार दाखविण्यांत व शिष्यशाखा वाढविण्यांत आणि त्यामुळें प्रेमकलोत्पत्तीस सर्वथा प्रतिकूळ अशा अहंकाराचें पोषण करण्यांतच चांगदेवांच्या आयुष्याचीं १४०० वर्षे खर्च झालीं ! ! या काळांत त्यांनीं अनेकांचे अनेक मनोरथ पूर्ण केले. चांगदेवांचा सिद्धाश्रम तापीतीरावर असून तेथें यात्रेकरूंची सारखी रहदारी लागलेली असे. अंधास नेत्र येणें, बधिरास ऐकूं येणें, कोड्याचा कुष्टरोग हटणें, वांझेस पुत्र होणें इत्यादि अनेक चमत्कार योगसिद्धीच्या बळावर चांगदेव करून दाखवीत व यामुळें कामनिक प्रांपचिकांच्या झुंडीच्या झुंडी चांगदेवाश्रमाकडे धांवत असत. शंभर वर्षांनीं काळ आला म्हणजे ते आत्मा ब्रह्मांडीं नेऊन दहा दिवस बसत व याप्रमाणें त्यांनीं चवदा वेळ काळाला योगबळानें परतविलेलें होतें ! चांगदेव अंतरिक्षांत अधांत्रीं बसूनही अनेक व्यवसाय करीत !

३. चांगदेवांना 'चांगा वटेश्वर' असें नांव पडण्याचें कारण असें आहेः—चांगदेव हे खानदेशांत तापीतीरावर चर्मचक्षु झांकून घेऊन अंधपणा पांघरून तप करीत असतांना तेथें दारिद्र्यानें गांजलेले वरुणगांवचे दोन व्यापारी आले व चांगदेवांची सेवा करूं लागले. ते बाजाराच्या दिवशीं चांगदेवांना आपल्या गांवीं नेत; त्यामुळें त्यांचा माल चांगला खपून त्यांना मोठी किफायत होई. असें करितां करितां ते कांहीं दिवसांनीं गबर झाले. यथास्थित द्रव्यसंचय झाल्यावर त्यांच्या गुरूभक्तीला ओहटी लागली व त्यांच्या गुरुसेवेंत अंतर पडूं लागलें. सकामभक्ति ही सर्वकाळ अभंग राहणें शक्य नाहीं, किंबहुना अशा भक्तीला 'भक्ति' हा पवित्र शब्द न लावतां 'सवदा' हा शब्द लावणेंच अधिक योग्य होईल. कांहीं तरी ऐहिक हेतु मनांत धरून देवाची किंवा गुरूची भक्ति करणाऱ्यांची भक्ति अखंड राहायचीच नाहीं, कां कीं त्यांच्या हेतूंची सफलता झाल्याबरोबर मग देवाची किंवा गुरूची कांहीं अवश्यकता त्यांना वाटेनाशी होते! निष्काम, निरुपचार प्रेमाची जात कांहीं वेगळी आहे. असो. मनासारखी द्रव्यप्राप्ति झाल्यावर ते वरुणगांवकर व्यापारी चांगदेवांची हेळसांड करूं लागले. त्यांनीं दांभिकपणानें देवमंदिर बांधून देवाचा उत्सव थाटामाटानें करायचा आरंभ केला. यांत धर्मबुद्धीपेक्षां धर्मनिष्ठ म्हणवून घेण्याची त्यांची इच्छाच जास्त प्रबळ होती. हें धर्मध्वजित्व मोक्षमार्गाला नेणारें नसून नरकाचें द्वार जवळ करणारें असतें याची त्या बिचाऱ्यांना दादही नव्हती. असो. ते धनमदांध झालेले वैश्य चांगदेवांची हेळणा करूं लागले. एके दिवशीं नित्याप्रमाणें पार्थिवलिंग करण्याची चांगदेवांनीं आपल्या शिष्यांस आज्ञा केली असतां 'ह्या अंधळ्याला काय दिसतें आहे' अशा कुबुद्धीनें त्यांनीं नदीच्या तीरावरची वाळू गोळा केली व त्यावर चांगदेवांची तुपाची वाटी पालथी घालून त्याचेंच सुंदरसें लिंग बनविलें व ह्याची पूजा करा म्हणून चांगदेवांस सांगितलें. चांगदेवांनीं अंतर्दृष्टीनें शिष्यांचें हें कपट ओळखलें, तथापि आपल्या उत्कट शिवभक्तीस अनुसरून त्यांनीं त्या वाटीरूप शिवलिंगाचीच

यथाशास्त्र पूजा केली ! पूजनोत्तर चांगदेव जेवावयास बसले असतां त्यांनीं आपली तुपाची वाटी शिष्यांजवळ मागितली, तेव्हां ते नदीवर गेले व घाईघाईनें शिवालिंगावरील फुलें व बेल दूर करून वाटी काढूं लागले तों काय चमत्कार सांगावा—ती वाटी आंत खोलवर गढूलेली आहे असें त्यांस आढळून आलें ! ! हा प्रकार पाहतांच ते शिष्य भयचकित झाले व चांगदेवांपुढें लोटांगण घालून त्यांनीं त्यांची क्षमा मागितली. चांगदेवांनीं त्यांस उदारपणानें क्षमा केली व आपल्या तपोभूमीकडे ते चालते झाले. ही गोष्ट भक्तलीलामृतांत सांगून महिपतबावा म्हणतातः—

**चांगयाचे भक्तीस्तव पाहे । वाटीचा ईश्वर जाला आहे ।**
**मग चांगा वटेश्वर नांव पावलाहे । दर्शनेंचि मुक्त होय प्राणी ॥१॥**

याप्रमाणें वाटी+ईश्वर=वटेश्वर—त्या वटेश्वराचे म्ह० शंकराचे भक्त म्हणून चांगदेवांना चांगा वटेश्वर म्हणूं लागले. "आसनीं शयनीं साचार । ध्यानीं मनीं वटेश्वर । स्वप्न सुषुप्ती जागर । विसर क्षणभर असेना" अशा प्रकारें त्यांनीं शंकराची निस्सीम भक्ति केली व त्या भक्तीच्या बळावरच विष्णुस्वरूपी ज्ञानेश्वरमहाराजांची त्यांच्यावर कृपा झाली आणि ते मुक्तीच्या प्रसादास पात्र झाले. तो प्रकार असाः—

४. ज्ञानेश्वरमहाराजांनीं पैठणास रेड्याकडून वेद बोलविल्याची कौतुकवती वार्ता हां हां म्हणतां पाण्यावरील तैलबिंदूप्रमाणें सर्वत्र पसरली. 'प्रसन्नराघवा'चा कर्ता जयदेवकवि यानें म्हटल्याप्रमाणेंः—

**वार्ता च कौतुकवती विमला च विद्या**
**लोकोत्तरः परिमलश्च कुरंगनाभेः ।**
**तैलस्य बिंदुरिव वारिणि दुर्निवारं**
**एतत्त्रयं प्रसरति स्वयमेव भूमौ ॥ १ ॥**

पैठणाहून यात्रेनिमित्त बाहेर पडलेला एक पांथस्थ ब्राह्मण सहजगत्या चांगदेवांच्या आश्रमीं आला. चांगदेवांची अपूर्व अंगकांति व यात्रेकरूंचा मोठा जमाव पाहून त्याला मोठें कौतुक वाटलें व तो चांगदेवांच्या समोर

सहज उद्गारला कीं, " पैठणास नुकताच आळंदीकर ज्ञानेश्वरांनीं रेड्याकडून वेद बोलविल्याचा जो प्रसंग मीं पाहिला तो केवळ ' न भूतो न भविष्यति ' अशापैकीं आहे. असें अलौकिक सामर्थ्य दुसऱ्या कोणाच्याही अंगीं असणें अशक्य आहे. " यावर चांगदेवांनीं ज्ञानेश्वरांची साग्र हकीकत सांगण्यास त्या ब्राह्मणास सांगितलें व त्यानेंही विठ्ठलपंतांच्या जन्मापासून तों शुद्धिपत्रापर्यंतची सर्व हकीकत फार प्रेमभरानें सांगितली. ती ऐकून चांगदेवांच्या अहंकाराला विजेचा धक्का बसल्यासारखें झालें. "काळवंचना करोनि निश्चित । वांचलों वर्षें चौदा शत । सिद्धाई दाखविली बहुत । परी हें सामर्थ्य असेना" असा ध्वनि त्यांच्या हृदयाकाशांत झाला. चांगदेवांनीं लगेच प्राणायाम केला व ते चित्ताची एकाग्रता करून बसले आणि ब्रह्मांडभुवनांत काय घडामोड झाली हें सूक्ष्ममार्गानें पाहूं लागले तेव्हां ब्रह्मा, विष्णु, महेश हे आळंदीस अवतरले आहेत हें त्यांच्या प्रत्ययास आलें. त्यावर चांगदेव फार आनंदित झाले व त्यांच्या दर्शनास निघण्याची त्यांनीं इच्छा प्रकट केली.

५. चांगदेवांच्या अंगांत अहंकाराचें भूत शिरलें होतें पण एरव्हीं स्वभावतः ते मोठे सुशील होते. अहंकार मनुष्याचे सद्गुण तिरोहित करितो पण त्या सद्गुणांचा समूळ नाश करीत नाहीं; कोणी अधिक पराक्रमाचा पुरुष भेटला व त्यानें तो अहंकाराचा पडदा दूर सारिला कीं त्याचें सहजमनोहर स्वरूप प्रकट होतें. चांगदेवांला नेहमीं पायां पडून घेण्याची व शिष्यांवर हुकूम चालविण्याचीच संवय झाली होती, यामुळें माझ्याहून वरचढ जगांत कोणी असेल ही कल्पना सुद्धां मनाला न शिवून ' लाटण्या ऐसा न लवे । पाथर तैंवि न द्रवे ' अशा प्रकारचा ताठरपणा त्यांच्या अंगीं उत्पन्न झाला होता ! चांगला गुरु शिष्यांस सुधारतो व चांगला शिष्य गुरूसही सुधारतो; त्याप्रमाणें कच्चा गुरु शिष्यांस बिघडवितो व कच्चे शिष्य गुरूसही बिघडवितात. ह्या सर्व प्रकारचीं उदाहरणें जगांत सांपडतात. चांगदेवांचा अहकार त्यांच्या शिष्यांनींही पोसला होता. आतांच

पद्य. ज्ञानेश्वरांच्या भेटीस जाण्याची सदिच्छा चांगदेवांच्या मनांत उत्पन्न झाली होती, पण "दुसऱ्याची कीर्ति ऐकोन पाहे । स्थानभ्रष्ट सर्वथा होऊं नये । तेणें महत्वासी हानी होये । हीनत्व येताहे आपणांसीं" असा कुमंत्र त्यांच्या शिष्यांनीं त्यांना दिला व स्तुतीला सहज वश अशा त्या अहंमन्य चांगदेवांच्या मनावर त्याचा पगडा बसून त्यानें प्रथम उद्भूत झालेला सत्वांकुर जाळून टाकला! झालें. चांगदेवांनीं भेटीस जाण्याचा बेत सोडला व ज्ञानेश्वरांला शिष्यांबरोबर पत्र पाठवावें असें ठरविलें. पण तेथेंही अहंभाव आडवा आलाच, पत्रांत मायना काय लिहावा हा प्रश्न येऊन पडला. 'चिरंजीव' म्हणून लिहावें तर ज्ञानेश्वरांची करणी आपल्यासही असाध्य आहे यामुळें मान्याचा अपमान केल्याचा दोष होणार; बरें 'तीर्थरूप' लिहावें तर १४०० वर्षें वयाच्या थोर मनुष्यानें १४ वर्षांच्या पोरास असा मायना लिहिणें महत्वास कमीपणा आणणारें आहे! ह्यास्तव कांहींच मायना किंवा मजकूर न लिहितां शिष्यांबरोबर कोराच कागद पाठविण्याचें चांगदेवांनीं ठरविलें! ज्ञानेश्वरांची उपासना काय, त्यांचें अध्ययन काय, त्यांचा योगक्षेम कसा चालतो, त्यांची तपश्चर्या केवढी आहे इत्यादि गोष्टींचा बारकाईनें तपास काढण्यास त्यानीं आपल्या शिष्यांस सांगितलें व माझा त्या चौघांस नमस्कार सांगा असें बजाविलें. ते शिष्य तो कोरा कागद बरोबर घेऊन निघाले ते आळंदीस येऊन पोहोंचले. त्या वेळीं हीं चाऱ्ही भावंडें संवादसुख भोगीत बसलीं होतीं. त्या ब्राह्मणांस पाहतांच ज्ञानेश्वरमहाराज त्यांस उद्देशून म्हणाले 'काय चांगदेवांनीं आम्हांकडे कोराच कागद पाठविला आहे?' दर्शनाबरोबर हा प्रश्न झालेला पाहून ते ब्राह्मण चकित झाले व हें प्रकरण जड आहे असें त्यांस कळून चुकलें! 'लोकांच्या जीवींचे सकळ जाणणारे तुम्ही ज्ञानेश्वर आहांत खरें' असें म्हणून त्यांनीं त्यांस वंदन केलें. तो कोरा कागद हातांत घेऊन लाडिकपणानें मुक्ताबाई म्हणाल्या 'काय? चवदाशें वर्षें तप करून पुन्हां हा कोराचा कोराच राहिला आहे!' यावर सर्वजण प्रेमानें हंसले व गंभीरपणानें निवृत्तिनाथांनीं चांगदेवांचें सर्व चरित्र मंडळीस सांगितलें आणि "सिद्धा-

इच्या' ताठ्यानें भरलेला व अहंकारानें सबाह्य वेष्टिलेला हा चांगदेव ब्रह्मज्ञानाविषयीं कोरा आहे तरी तूं त्याचें अंतर बोधेल असें त्यांस सुंदर पत्र लिही" अशी त्यांनीं ज्ञानेश्वरमहाराजांस आज्ञा केली. अशीं गुर्वाज्ञेचीं अक्षरें ऐकतांच ज्ञानेश्वरमहाराजांनीं चांगदेवांस ६५ ओव्यांचें पत्र लिहिलें. तें पत्र 'चांगदेवपासष्टी' ह्या नांवानें सुप्रसिद्ध आहे.

## चांगदेवपासष्टीचा भावार्थ.

६. 'चांगदेपासष्टी' च्या ६५ ओव्यांत ज्ञानेश्वरमहाराजांनीं चांगदेवांस 'तत्वमसि' ह्या महावाक्याचा बोध केला आहे. त्या पासष्टींत कसा बोध केला आहे तें आपण थोडक्यांत पाहूं:—

**स्वस्ति श्रीवटेशु । जो लपोनि जगदाभासु ।**
**दावीं मग ग्रासु । प्रगटला करी ॥ १ ॥**

श्रीवटेश ( शिव ) जो आपण लपून सर्व जगत् भासवितो व आपण प्रगटून सर्व जगाचा ग्रास करितो म्हणजे ज्याच्या अदर्शनांत जग भासतें व ज्याच्या दर्शनांत जग मावळतें त्याचें नित्यमंगल असो.

**प्रगटे तंव तंव न दिसे । लपे तंव तंव आभासे ।**
**प्रगट ना लपाला असे । न खोमता जो ॥ २ ॥**

आत्मस्वरूपाचा जसजसा उदय होतो तसतसें नामरूपात्मक जग मावळतें, व त्याचें ज्ञान जसजसें आवृत होतें तसतसा हा नामरूपात्मक प्रपंच सत्यत्वानें भासतो. तर मग कोणी म्हणेल कीं प्रकटणें व लपणें हे धर्म आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं आहेत कीं काय? तर तसें नव्हे. तो प्रकटही नाहीं व लपलेलाही नाहीं. प्रकटणें व लपणें ह्या धर्मांनीं तो किंचितही खोंचला जात नाहीं. आत्मस्वरूप वस्तुतः निर्धर्म स्वयंसिद्ध आहे. बुद्धींत देहाहंकारादि प्रपंचाचा उदय झाला असतां स्वरूपज्ञान आच्छादिलें जातें, व बुद्धींतच स्वरूपबोधाचा उदय झाला असतां देहाहंकारादि प्रपंच अपाप

मावळून जातो एवढाच बोध येथें घ्यावयाचा आहे. स्वरूप आणि जग ह्यांच्या लपण्याप्रकटण्याच्या खेळांत ते परस्पर भिन्न आहेत असें वाटण्याचा संभव आहे म्हणून सांगतात कीं, तसें नव्हे, तर नामरूपात्मक जग अधिष्ठान परब्रह्माहून वेगळें नसून तद्रूपच आहेः—

**सोनें सोनेपणा उणें । न येतांचि झालें लेणें ।**
**तेंवि न वेंचतां जग होणें । अंगें जया ॥ ४ ॥**

सोनें हें सोनेपणांत (वजनांत व कसांत) कमी न होतां अलंकाररूपांत येतें; त्याप्रमाणें परब्रह्म आपल्या पूर्णत्वांत कमी न होतां सर्व जग झालें आहे. ह्या पहिल्या चार ओव्यांत सांगितलेल्या सिद्धांताचेंच स्पष्टीकरण दृष्टांतादिकांनीं पुढें केलें आहे. कल्लोळकंचुक न फेडतां उदक उघडें आहे म्ह० लाटांचा अंगरखा न काढतां लाटा आणि समुद्र मिळून जसें पाणीच आहे, त्याप्रमाणें जग हें वेगळेपणानें न पाहतां जग आणि आत्मा मिळून आत्माच आहे (५). परमात्माच विश्वरूपानें नटला असून विश्वस्फूर्तीनें झांकला जात नाहीं (६). कलांच्या पांघरुणानें चंद्र जसा झांकला जात नाहीं, किंवा अग्नि दीपपणाला आल्यानें जसा वेगळा होत नाहीं (७) त्याप्रमाणें ज्ञानरूप आत्मा अविद्येच्या निमित्तानें दृश्य व द्रष्टा अशा भेदानें जरी नांदूं लागला तरी तो भेद आत्मत्वीं नाहीं व स्वतःसिद्ध आत्मा आहे तसाच आहे (८). ‘जेंवि नामरूप लुगडें । येरवीं सुतचि तें उघडें’ म्ह० लुगडें म्हणायचें मात्र पण तेथें सुताच्या उभ्याआडव्या धाग्यावांचून जसें दुसरें कांहीं नाहीं (९), त्याप्रमाणें दृश्यद्रष्टामिषानें दृङ्मात्र (ज्ञानरूप) आत्मस्वरूपच एक आहे. (१०) अलंकार आणि सुवर्ण किंवा अवयव आणि अवयवी (११) त्याप्रमाणें मायोपाधि शिवापासून तो जड पृथ्वीपर्यंत अनेक पदार्थ भासले तरी एक संविद् (आत्मा, परमात्मा, ज्ञान—कांहींही म्हणा) आहे दुसरें कांहीं नाहीं. (१२) तीच संविद् जगदाकारानें प्रकाशत आहे. भिंत आणि तीवरील चित्रें, गूळ आणि गोडी, वस्त्र आणि घडी इत्यादि दृष्टांतावरूनही हेंच सिद्ध होतें कीं,

ही संविद् व विश्वस्फूर्ति किंवा आत्मा आणि जग हे वेगळाले नसून आत्माच जगरूपानें आपल्याला सन्मुख झाला आहे. ( १३–१६ ) प्रतिबिंबामुळें बिंबाला बिंबपण येतें त्याप्रमाणें जगाच्या ( दृश्याच्या ) दृश्यपणामुळें आत्म्याला द्रष्टेपण येतें. ( १७ ) तात्पर्यः—

**आपणचि आपुला पोटीं । आपणया दृश्य दावित उठी ।**
**द्रष्टादृश्यदर्शनत्रिपुटी । मांडे ते हे ॥ १८ ॥**

ही संविद् भेदावस्थेस न येतां दृश्य, द्रष्टा, दर्शन ह्या त्रिविधरूपानें भासते. ( २१ ) आणखी असें पहा कीं:—

**दृश्य जेधवां नाहीं । तेधवां दृष्टि घेऊनि असे काई ? ।**
**आणि दृश्येवीण कांहीं । द्रष्टत्व असे ? ॥ २३ ॥**

दृश्यामुळें द्रष्टा आणि दर्शन हीं आहेत व दृश्यत्व गेलें कीं हीं गेलीं. ( २४ ).

**तात्पर्यः—**

**एकचि झाली ती होतां । तिन्ही गेलिया एकचि व्यक्ति ।**
**तरी तिन्ही भ्रांति । एकपण साच ॥ २५ ॥**

एका आत्म्याचीच जर ही त्रिपुटी झाली आहे व ती गेल्यावर आत्माच राहतो तर ही त्रिपुटी भ्रांति असून आत्माच तेवढा एक सत्यत्वानें राहणारा आहे. आरशांत तोंड पाहण्याच्या पूर्वी व नंतर जर मुखच मुखाच्या ठिकाणीं आहे; तर तोंड पहात असतांना—प्रतिबिंब वेगळें दिसलें तरी—मुखावांचून दुसरें कांहीं आहे काय ? ( २६ ) त्याप्रमाणें जगाच्या उत्पत्तिपूर्वी आणि लयानंतर जर आत्माच असतो तर जगाच्या भासकालींही आत्म्यावांचून दुसरें काय असणार ? ( २८ ) वीणामृदंगादि वाद्यांवांचून ध्वनि किंवा काष्ठादि पदार्थांवांचून अग्नि जसा सामान्यत्वानें आहे, तसा दृश्यादि त्रिपुटिभावावांचून तो स्वयंपणानें आहे. ( २९ ) अशा त्या परमात्मवस्तूला कांहीं नांव देतां येत नाहीं, तिला कोणत्याही साधनानें जाणतां

येत नाहीं, मात्र ती आहेच आहे. ( ३० ) हे चांगदेवा ! त्या वटेशाशीं 'मौनेंचि बोलिजे' मौनानेंच बोलावें व कांहीं न होऊन सर्व व्हावें म्ह० विशेषत्वानें न राहतां सहजपणानें रहावें. ( ३३ ) बोधाचा म्ह० आत्मज्ञानाचा तो आश्रय आहे. ( ३४ ) तो निरुपाधिक आहे, एकरस व केवल आहे. त्या परमात्मरूप वटेशाचा तूं पुत्र आहेस म्हणजे कापराचा खडा जसा कापराचा अंश त्या प्रकारचा तूं त्याचा अंश आहेस. आतां चांगदेवा ! तुझ्यामाझ्यांतील आत्मैक्याचा संवाद ऐक. तुझा माझा संवाद म्हणजे डाव्या तळहातानें उजव्या तळहाताला मिठी दिल्यासारखा आहे. ( ३८ ) हें पहा:—

**बोलेंचि बोल ऐकिजे । स्वादेंचि स्वाद चाखिजे ।**
**कां उजिवडें देखिजे । उजिडा जेंवि ॥ ३९ ॥**
**सोनिया वरकल सोनें जैसा । कां मुख मुखा हो आरिसा ।**
**तुजमज संवाद तैसा । चक्रपाणि ॥ ४० ॥**

शब्दानें शब्द ऐकावा, स्वादानें स्वाद चाखावा, उजेडानें उजेड पहावा, सोन्याचा कस सोन्यावर घ्यावा, तसा तुझा माझा संवाद आहे !

**सखया ! तुझेनि उद्देशें । भेटावया जीव उल्हासे ।**
**कीं सिद्धभेटी विसकुसे । ऐसिया बिहें ॥ ४२ ॥**

सख्या चांगदेवा ! तुझ्या भेटीसाठीं माझा जीव उत्सुक झाला होता, पण आत्मरूपानें तूं व मी एकच असल्यामुळें आपली भेट सहजसिद्धच आहे; ती भेट क्रियेनें घेऊं गेल्यास विसकटेल कीं काय अशी मला भीति वाटते ! ! "घेवों पाहे तुझें दर्शन । तंव रूपा येवों पाहे मन" म्हणजे तुझ्या दर्शनाची आस धरावी तों मनच आत्मस्वरूपाकडे वळतें व दर्शनव्यवहार खुंटतो. ( ४३ ) कांहीं करणें, बोलणें, कल्पणें किंवा न करणें, न बोलणें, न कल्पणें ह्या दोन्ही गोष्टी तुझ्या स्वरूपीं उमस घेत नाहींत. ( ४४ ) फार काय, पण चांगया ! तुझ्या स्वरूपीं माझा मीपणा देखील मला धरवत नाहीं. ( ४५ ) मीठ सागराचा तळ काढायला गेलें तों मीठच

नाहींसें झालें (४६) त्याप्रमाणें आत्मस्वरूप जो तूं त्या तुला पहायला गेलेला मीच नाहींसा झालों ! 'मी गेल्यावर मग तूं' कसला ? (४७) चांगदेवा! 'मी तूं वीण भेटी माझी तुझी' आहेच आहे. (५२) वर सांगितलेला विचार दृढ करून 'तूं आपणयातें बुझ' म्ह० स्वरूपाला पहा. चांगदेवा ! तुला आणखी २ ओव्यांत तात्पर्य सांगतों तें ऐकः—

**ज्ञानदेव म्हणे नामरूपें- । वीण तुझें साच आहे आपणपें ।**
**तें स्वानंदजीवनपें । सुखिया होईं ॥ ५९ ॥**
**चांगया पुढतपुढती । घरा आलिया ज्ञानसंपत्ती ।**
**वेद्यवेदकत्वही अतीतीं । पदीं बैसे ॥ ६० ॥**

ज्ञानेश्वर म्हणतात, "हे चांगदेवा ! तुझें सत्य स्वरूप नामरूपातीत आहे; त्या स्वानंदामृताच्या सेवनानें सुखी हो ! चांगया! पुनः पुन्हां तुला सांगतों कीं, आत्मज्ञानरूपी ऐश्वर्य तुझ्या घरीं आलें आहे तर वेद्य (जाणण्याचा विषय) व वेदक (जाणता) ह्या उभयभावातीत जें निजपद त्यावर तूं विराजमान हो."

हा इतका बोध करून उपसंहारांत ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं, 'असला हा आत्मानुभवाचा रसाळ खाऊ माझ्या निवृत्तिमाउलीनें मला दिला आहे' (६१). ह्या पत्ररूपग्रंथाची फलश्रुति महाराज सांगतातः—

**एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे । दोन्ही डोळस आरिसे ।**
**परस्पर पाहतां कैसें । मुकले भेदा ! ॥ ६२ ॥**

हेंच फळ ग्रंथवाचकांसही मिळेलः—

**तियेपरी जो इया । दर्पण करील ओविया ।**
**तो आत्मा एवढिया । मिळेल सुखा ॥ ६३ ॥**

७. ह्या प्रकारचें महाबोधानें भरलेलें तें ६५ ओव्यांचें पत्र चांगदेवाच्या शिष्यांनीं त्यांच्या हातीं आणून दिलें. चांगदेवांला आत्मबोधाची

जात माहीत नसल्यामुळें त्या पत्राचा बोध त्यांच्या मनांत उतरला नाहीं व त्यांनीं मोठ्या समारंभानें जाऊन ज्ञानेश्वरांची भेट घेण्याचें ठरविलें. असें सांगतात कीं, चांगदेव बरोबर १४०० शिष्यांचा तांडा घेऊन पिंवळ्या जरद वाघावर आरूढ होऊन व हातीं सर्पांचा चाबूक घेऊन ज्ञानेश्वरांच्या भेटीस निघाले. वाघाच्या अंगावरचे ते काळेभोर पट्टे, त्याचा तो भयानक जबडा, त्याची लळलळ करणारी ती आरक्तवर्णाची जीभ व ते प्राण्यांचीं हाडें कडाकड फोडण्यासाठीं करकरणारे मजबूत दांत—हा उग्र देखावा पाहूनच प्रेक्षकांच्या अंगावर कांटा उभा राही. अशा त्या हिंस्त्र पशुश्रेष्ठाच्या पाठीवर लीलेनें विराजमान झालेली ती चांगदेवांची भव्य व उग्र मूर्ति, त्यांच्या मस्तकावरचा जटाकलाप, त्यांचे आरक्त नेत्र, त्यांच्या गळ्यांत रुळणाऱ्या रुद्राक्षांच्या माळा, त्यांच्या एका हातांतला त्रिशूळ व दुसऱ्या हातांतला सर्पांचा आसूड—हा देखावा पाहून कृतांतालाही वचक बसला असेल! असो. चांगदेवांची स्वारी अशा थाटानें आळंदीपर्यंत आली. त्यांच्या शिष्यांनीं पुढें येऊन ज्ञानेश्वरांस वर्दी दिली तेव्हां महाराज निवृत्तिनाथांसह आपल्या घराच्या[1] भिंतीवर बसून सुखसंवाद करीत होते. त्यांच्या शेजारीं सोपानदेव व मुक्ताबाई ऊन खात बसली होती. चांगदेवासारखें बडें धेंड आपल्या भेटीस येत आहे तर आपणही त्यास मैलभर सामोरें जावें असें निवृत्तिनाथ म्हणाले. लगेच ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्या जडभिंतीस चालण्याची आज्ञा केली. 'चल बये' हीं अक्षरें त्यांच्या मुखांतून निघतांच ती भिंत सजीव प्राण्यासारखी भराभर चालूं लागली!! चांगदेव समोरून वाघावर बसून येत आहेत, व त्यांना आमचे आळंदीकर बालसंत भिंत चालवीत सामोरे चालले आहेत, हा देखावा ज्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिला असेल ते डोळे आनंदाश्चर्यानें किती तरलित झाले असतील! एकीकडून

---

१ ह्या घराची जागा आळंदीस ज्ञानेश्वरांच्या देवळापासून १०।१५ घरांच्या अंतरावर आहे. तेथें सांप्रत बखळ असून बाहेर एक वृंदावन आहे.

१४१० वर्षांचा वृद्ध तपस्वी योगाचें सर्व ऐश्वर्य पांघरून वाघावर बसून दौडत येत आहे व दुसरीकडून १४ वर्षांच्या आंतबाहेर असून आपल्या निजबोधाच्या सहजस्थितींत रंगलेल्या चार बालब्रह्ममूर्ति जडभिंत चालवीत त्यांला सामोऱ्या जात आहेत असा हा अपूर्व देखावा पाहून आकाशस्थ देवदेवतांना विलक्षण कौतुक वाटलें असेल ! योगविद्या आणि आत्मविद्या यांच्या बलाबलाचा निर्णय आळंदीच्या पटांगणांत श्रीसिद्धेश्वरांच्या साक्षीनें पुन्हां एकवार व्हावयाचा होता. योगी आणि ज्ञानीभक्त ह्यांपैकीं खरोखर श्रेष्ठ कोण ह्याची जगापुढें उलगडा व्हावयाचा होता. चांगदेव केवळ योगी होते व योगसिद्धींचे चमत्कार जगाला दाखवून अहंकारी झाले होते आणि ज्ञानदेवहि योगी होते व योगसिद्धीचे चमत्कार त्यांनींहि जगाला दाखविले होते. तेव्हां दोघांमध्यें फरक होता तो अहंकारासंबंधाचा होता. चांगदेव अहंकारानें फुगले होते व ज्ञानदेव देहादि इतर क्षुद्र अहंकारच काय पण 'अहं ब्रह्मास्मि' ह्या शेवटच्या अहंकारालाही गिळून बसले होते. चांगदेव विद्वान्, तपी व योगी होते पण स्वरूपानुभवाबरोबर अहंकारादि सर्व विकार नाहींसे होतात तो स्वात्मानुभव नसल्यामुळें अहंकारी झाले होते. ज्ञानेश्वरांनीं 'चांगदेवपासष्टी' चें पत्र चांगदेवांकडे पाठविलें होतें पण अहंकारामुळें त्यांतील बोध त्यांना पचला नव्हता. रोग्याचा रोग घालविणें व नंतर त्याला पौष्टिक अन्न देऊन सशक्त करणें हें सद्वैद्याचें काम असतें, त्याप्रमाणें चांगदेवांचा अहंकार प्रथम दूर करून मग त्यांना आत्मबोध करणें हें चांगदेवांच्या गुरुला करावयाचें होतें. अहंकार गळाल्यावांचून आत्मबोध पचत नसतो, व अहंकाराला चीत करायला गुरुदेवावांचून कोणी समर्थ नाहीं. तो गुरुही शिष्याच्या अंगच्या सर्व गुणांत भारी असून शिवाय स्वात्मदानसमर्थ असा पाहिजे. असा समर्थ गुरु चांगदेवांच्या भाग्यानें त्यांच्याकडे चालून येत होता. चांगदेव नुसत्या योग्यापुढें वांकले नसते व नुसत्या आत्मज्ञानसमर्थ अशा गुरूलाही शरण गेले नसते; म्हणून त्यांच्याच योगविद्येंत त्यांना जिंकून शिवाय स्वरूपावबोध करण्या-

विषयीं परमसमर्थ अशाच गुरूची त्यांना गरज होती व असा गुरु परमेश्वरानें त्यांना पाठवून दिला. वाघाच्या पाठीवर बसून व हातांत सर्पांचा-चाबूक घेऊन चांगदेव मोठ्या तोऱ्यानें ज्ञानदेवांच्या भेटीस आले, पण त्यांनीं जेव्हां जडभिंत आपल्याकडे चालून येत आहे व त्या भिंतीवर ज्ञानदेव आपल्या भावंडांसह मौजेनें बसले आहेत असें पाहिलें, तेव्हां त्यांना प्रथम मोठा चमत्कार वाटला व नंतर हळू हळू त्यांचा अहंकार गळूं लागला. वाघसर्पांसारख्या प्राण्यांवर त्यांना हुकमत चालवितां येत होती पण जडावर सत्ता चालविण्याची करामत त्यांच्या अंगांत नव्हती. वाघ व सर्प हे सचेतन जिवंत प्राणी आहेत; त्यांना मन, बुद्धि व इच्छाशक्ति आहे. तेव्हां आपली इच्छाशक्ति अत्यंत प्रबळ करून वाघासारख्या क्रूर पशूलाही कह्यांत ठेवणें योग्याला अशक्य नाहीं. पण निर्जीव व केवळ जड अशा दगडमातीनें रचलेल्या भिंतीवर सत्ता चालविणें हें योग्याच्याही शक्तीच्या पलीकडचें आहे. चांगदेवांच्या अंगीं ही शक्ति नव्हती व ही शक्ति ज्ञानेश्वरांच्या अंगीं असलेली ते प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहात होते. त्यांच्या अहंकाराची मान मोडली. अहंकार हताश व गलित वीर्य झाला. आपल्याला राहण्याला चांगदेवांचा देह योग्य नाहीं असें वाटून त्यानें चांगदेवांच्या हृदयांतून आपलें बिऱ्हाड उचललें ! चांगदेवांचें हृदय कोमळ झालें. त्यांत रजतमांनीं दडपून टाकलेला सत्वगुण उशी घेऊन उठला. रजतम दूर गेलें. सत्वगुणाचे सहजधर्म त्यांच्या कायावाचामनांत प्रकट झाले. त्यांचे डोळे निर्मळ झाले. डोळ्यांतून प्रेमाश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. शरीर रोमांचित झालें. वाचा सद्गद झाली. ब्रह्मांडभर पांचभौतिकाचा जो पसारा पसरलेला आहे त्याला चेतविणारा परमात्माच आपल्या समोरून येत आहे असें त्यांना वाटलें व अगदीं निकट आलेल्या ज्ञानेश्वरांना पहातांच देहभावाविवर्जित झालेल्या चांगदेवांचें शरीर वाघाच्या पाठीवरून गळालें व सन्निध आलेल्या भिंतीच्या पायाशीं येऊन पडलें ! ज्ञानेश्वर महाराज हे साक्षात् विष्णूचा अवतार होते. त्यांच्या दर्शनानंतर

सद्भक्ताचा देहभाव जाग्यावर राहणें शक्य नाहीं. चांगदेवांच्या आंत रूपांतर झालें. पहिला चांगदेव आतां राहिला नाहीं. चांगदेव भक्त झाला. ज्ञानेश्वर महाराज भिंतीवरून खालीं उतरले. त्यांनीं चांगदेवांच्या अंगावरून व डोळ्यांवरून आपला हात फिरविला. श्रीगुरूच्या पद्महस्ताचा स्पर्श होतांच चांगदेवांच्या अंतर्यामांत ज्ञानोदय झाला. चांगदेवांच्या हृदयांत ज्ञानदेव शिरले.

८.-धुळ्याच्या 'सत्कार्योत्तेजक' सभेनें समर्थ श्रीरामदासस्वामी आणि त्यांचे संप्रदायी संत व कवि यांचे ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें सत्कार्य आज बरींच वर्षें चालविलें आहे. त्यांनीं अलीकडे 'दासविश्रामधाम' नामक एक समर्थचरित्रपर विस्तृत ग्रंथ छापावयास घेतला असोन त्याच्या ७० व्या अध्यायांत ज्ञानेश्वरमहाराजांचें चरित्र आलें आहे. त्यांतच चांगदेव-ज्ञानदेव संवादपर असें एक मजेचें पद माझे मित्र शंकरराव देव यांनीं मला दाखविलें. तें असें:—

पद.

आरत यें रे धाकटे मुला। कशान आल थोरपण तुला॥
इलुस की रे दिसत पोर। ब्रह्मीं काय रे लहानथोर॥
ब्रह्म तुला ठाव आहे। सर्वां घटीं तेंचि पाहे॥
ब्रह्मीं नाहीं भेदाभेद। ऐसें बोले चारी वेद॥
तुझा भेद कां गळाला। सद्गुरूनें बोध केला॥
बोध म्हणिजे काय रे गड्या। आत्मस्वरूपीं पाहे रे वेड्या
इलुसच मुल बाट मोट। थोरपण असून चाट खोट॥
माझ मन काय चाट जाला। अज्ञानमूळ गर्व आला॥
गर्व जाईल कैशापरी। सद्गुरूच दास्यत्व करी॥
सद्गुरूकृपा काय तुलाच जाली। भूतमात्रीं भरून उरली॥
तरी कां येर येमें नेलें। अविश्वासीं बुडोनि ठेले॥
विश्वास काये सार केला। हा तो पुराणीं निश्चय जाला॥
सद्गुरुस शरण जाइना तर। पडेल चौऱ्यासीच फेर॥

म्हातारपणीं भक्ति करूं । आयुष्य काय आज्ञाधारू ॥
भजन तरी कराव केव्हां । सोहंमंत्रीं नाहीं गोवा ॥
जपाव तरी कोण्या दिसीं । नेम नाहीं दिवा निसीं ॥
ऐसे किती तरले पोरा । मिती नाहीं रे गव्हारा ॥
जाबास जाब फार देतोस । बोलूं नये तेंच बोलतोस ॥
उगेच राहे नाहितर देइन काठ्या । होतिल अज्ञानाच्या खोट्या ॥
माझा तुझा वाद जाला कीं रे फार । पांच पोरांनीं घेतला कीं रे घोर
पांच पोर कोणाची । आत्मरामगडियाची ॥
सारा खेळ त्याचाच काय रे । खेळ खेळुन निराळा कीं रे ।
तुला हा खेळ कशान कळला । ज्ञानदेव म्हणे निवृत्तिदेवाचा
प्रसाद फळासि आला ॥

९. चांगदेवांचा गर्वज्वर उतरला व ते ज्ञानेश्वरांच्या संगतींत राहिले. चाऱ्हीं भावंडें त्यांच्यावर फार लोभ करूं लागली. सत्संगतीचा परिणाम त्यांच्या मनावर होऊन त्यांची वृत्ति अंतर्मुख झाली. हरिपाठांतलाः—

योगयागविधी येणें नोहे सिद्धी । वायांचि उपाधि दंभधर्म ॥ १ ॥
भावेंवीण देव न कळे निःसंदेह । गुरुविण अनुभव कैसा कळे ?
तपेंवीण दैवत दिधल्यावीण प्राप्त । गुजेंवीण हित कोण सांगे ? ३
ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात । साधूंचे संगतीं तरणोपाव ॥ ४ ॥

हा ज्ञानेश्वरांचा उपदेश त्यांना पूर्ण पटला व ते इतर सर्व उपाधि तोडून त्यांच्याच चरणीं त्यांच्या पूर्णकृपेची वाट पहात जडून राहिले. ज्ञानेश्वरादि भावंडें पूर्ण ब्रह्मनिष्ठ असून सगुणोपासक होतीं. अखंड हरिभजन, नामस्मरण, कथाकीर्तन यांतच ते काळ सारून जगाला आत्मोद्धाराचा मार्ग दाखवीत होते. चांगदेवांना तो मार्ग पटला व तेही नामांत रंगून जाऊं लागले. त्यांचे शिष्य कांहीं काळ त्यांच्या सन्निध होते. आपले गुरु गुरुत्व सोडून ज्ञानेश्वरांचे शिष्य झाले हें पाहून ते विस्मित झाले. शिष्यांची उपाधि आतां चांगदेवांनाही नकोशी झाली. हें त्यांचें मनोगत

ओळखून ज्ञानेश्वरमहाराजांनीं सारे शिष्य वाटेला लावून देण्याची एक युक्ति काढली. पासष्टीचा अर्थ मला सांगा असें चांगदेव रोज म्हणत, पण आणखी कांहीं दिवस याला असेंच राहूं द्यावें, असा विचार महाराजांनीं केला होता. एकदां चांगदेवांनीं फार लगट केली तेव्हां महाराज म्हणाले, 'एक जीव बळी दे म्हणजे पासष्टीचा अर्थ तुला सांगूं!' चांगदेवांनीं आपल्या शिष्यांस विचारिलें कीं, 'माझ्यासाठीं बळी जायला तुमच्यांत कोणी तयार असेल तर त्यानें उद्यां सकाळीं मला भेटावें!' हें ऐकतांच शिष्यमंडळींत मोठी गडबड उडाली. गुरुकार्यासाठीं आपला जीव देण्यास तयार होणारा शिष्य त्या भोजनभाऊंत कोठून सांपडणार? साधूंच्या भोंवतीं जमणाऱ्यांस ( १ ) लोक पायां पडतात, ( २ ) खायला मिष्टान्न मिळतें व ( ३ ) शेवटीं वैकुंठलोक प्राप्त होतो असें कबीर साहेबांनीं:—

**संतमिलनके तिन गुन है हरकुइ लागे पाव ।**
**खानेकू मिष्टान्न मिल अखेर वैकुंठ जाव ॥ १ ॥**

या दोहऱ्यांत म्हटलें आहे. वैकुंठप्राप्ति एखाद्यालाच व्हायची, पण साधुसंगतींत मिष्टान्न मात्र सर्वच चेल्यांना खायला मिळत असतें! असो. असले भोजनभाऊ शिष्य चांगदेवांच्या भोंवतीं गोळा झाले होते. चांगदेवांचें वरील भाषण ऐकून त्यांचे सारे शिष्य एकामागून एक पळून गेले व ठाणावर एकही शिल्लक राहिला नाहीं. " चवदाशतें संप्रदायी । परी एकही त्यांतून राहिला नाहीं । हे ज्ञानदेवें युक्ति केली पाही । पाश सर्वही तोडिले ॥ " असें महिपतबावांनीं भक्तलीलामृतांत म्हटलें आहे. प्रसंगीं कोणी शिष्य टिकला नाहीं हें पाहून चांगदेव ज्ञानेश्वरांस म्हणाले:—

**तनुमन आणि सिद्धींचें धन । यांसहित आलों शरण ।**
**असत्य असेल हें वचन । तरी अंतःकरण जाणतसा ।**

—भ. ली. अ. ५-१५०

'माझा हा जीव आतां मी बळी देतों' असें वाक्य चांगदेवांच्या तोंडून ऐकतांच "बावारे! मीं दुसरा कोणी बळी मागितला नव्हता.

तुझा जीव तूं बळी दिल्याशिवाय तुला पासष्टीचा अर्थ कळणार नाहीं, असें मीं म्हटलें होतें. जीवभाव सोडील त्यालाच पासष्टी कळेल व स्वरूपज्ञान होईल. तुला लवकरच पासष्टीचा अर्थ मुक्ताबाई सांगेल, कारण तुझ्या गुरुत्वाचा मान तिचा आहे" असें महाराज म्हणाले.

१०. ह्यानंतर एके दिवशीं मुक्ताबाई आपल्या 'सहजास्थितींत' म्ह० नग्नस्थितींत स्नान करीत असतांना तेथें अकस्मात् चांगदेवांची स्वारी आली. त्यांच्या दृष्टीस तो स्नानाचा प्रकार पडतांच ते लाजल्यासारखे झाले व संकोचवृत्तीनें दुरून जाऊं लागले. तें पाहतांच मुक्ताबाई 'हा मेल्या निगुऱ्या' असें म्हणाल्या. ते शब्द ध्यानांत धरून स्नानोत्तर चांगदेवांनीं मुक्ताबाईस विचारलें कीं, "माझ्या वर्तनांत चूक कोठें झाली व तुम्ही मला 'निगुऱ्या' कां म्हणालांत ?" यावर मुक्ताबाईनीं उत्तर केलें:—

**जरी गुरुकृपा असती तुजवरी । तरी विकार न येतां अंतरीं ।**
**भिंतीस कोनाडे तैसियापरी । मानूनि पुढें येतासी ! ॥ २०९ ॥**
**जनीं वनीं हिंडतां गाय । वस्त्रें नेसत असती काय ? ।**
**त्या पशू ऐशीच मी पाहें । तुज कां नये प्रत्यया ! ॥ २१० ॥**

—भक्तविजय अ० २२.

हें उत्तर ऐकतांच चांगदेव आपल्या मनीं चपापले व ब्रह्मांडाचें आपोशन घेतलेल्या ह्या मुक्ताबाईच्या खऱ्या योग्यतेचा प्रकाश त्यांच्या बुद्धीवर पडला व वृत्तिसंकोचाबद्दल त्यांस मोठी लाज वाटली. चाऱ्ही भावंडें पूर्णतेप्रत पावलेलीं असून आपण फार खालच्या पायरीवर उभे आहोंत असें त्यांस वाटलें. गुरुकृपेची महती त्यांस कळून आली. ज्ञानेश्वरमहाराजांच्या आज्ञेनें मुक्ताबाईनीं चांगदेवांस महावाक्याचा उपदेश करून कृतार्थ केलें; व पासष्टीचा अर्थ त्यांस समजावून देऊन स्वानंदसाम्राज्यपदावर आरूढ केलें. चांगदेव जीवन्मुक्तस्थितीचा सोहळा भोगूं लागले. मुक्ताबाईनीं चांगदेवांस ब्रह्मज्ञानोपदेश करून अद्वैत भक्तिसुखाचा अधिकारी केलें

याबद्दल मुक्ताबाई व चांगदेव ह्या उभयतांच्या अभंगांतून उल्लेख केलेले सांपडतात. ज्या वटवृक्षातळीं चांगदेवांस बोध झाला त्या वटवृक्षास 'विश्रांतिवट' म्हणतात. हा वृक्ष नगरदक्षिणेच्या वाटेवर आहे. चांगदेवासारख्या जरठ योग्यास मुक्ताबाईनीं आत्मबोध केला. त्या ह्या वेळीं तारुण्याच्या उंबरठ्यांत उभ्या होत्या! अशा वयांत त्यांचें विषयवैराग्य, त्यांची समचित्तता, त्यांची स्थितप्रज्ञता व अखंड ब्रह्मस्थिति हे गुण मनांत आले म्हणजे 'न प्रभातरलं ज्योतिरुदेति वसुधातलात्' ह्या कालिदासोक्तीचें स्मरण होऊन त्यांच्या दिव्यत्वाबद्दल मनाची खात्री होऊन जाते. असो. मुक्ताबाईच्या अभंगांत 'चांगयासुता' ला त्यांनीं बोध केल्याच्या खुणा सांपडतात. 'मुक्ताई करें लेइलें अंजन। चांगया निधान उपदेशिलें' असें त्याच स्वतः सांगतात. मुक्ताई आपल्या चांगयासुताला पाळण्यांत निजवून गाणें म्हणतातः—

१

**निर्गुणाचे डाहाळीं पाळणा लाविला।**
**तेथें सुत पहुडला मुक्ताईचा ॥ १ ॥**
**निज निज बाळा न करी पै आळी।**
**अनुहात टाळी वाजवीते ॥ २ ॥**
**तेथें निद्रा ना जागृती भोगीं पै उन्मनी।**
**लक्ष तो भेदुनि निजणा तो ॥ ३ ॥**
**निभ्रांत पाळीं पाळणा विणवूनी।**
**मन हें बांधोनी पवनदोरी ॥ ४ ॥**
**एकविससहस्र सहाशें वेळे बाळा।**
**तोही डोळा स्थिर करी ॥ ५ ॥**
**निद्रा ना जागृती निजसी वा काई?।**
**पाटयेसी चांगया बोले मुक्ताबाई ॥ ६ ॥**

२

**गुण ना निर्गुण आहे शब्दातीत। तेथें तूं निश्चित बाळा निज ॥१॥**
**पाळणा लाविला हृदयकमळीं। मुक्ताई जवळीं सादवीते ॥ २ ॥**

शांति क्षमा विदेह पै वर्णिती । नांव पै ठेविती अद्वैतासी ॥ ३ ॥
वटेश्वर सुत चांगा अवधूत । मुक्ताई शांतवीत ज्ञानदृष्टी ॥ ४ ॥

३

भावें भक्ती करूनी वैराग्य जोडसी । तरी तूं पावसी ब्रह्मसुख ॥१॥
ज्ञानतत्वीं करीं करीं हा विचार । निर्गुणीं आकार निरामय ॥ २ ॥
चांग्या सोय धरी ज्ञानवटेश्वरीं । मुक्ताई जिव्हारीं बोध करी ॥३॥

पद.

उलट उलट माघारा प्राण्या फिर गोते खाशी ।
भरला पुर मायेचा लोंढा वाहुनियां जाशी ॥ ध्रु० ॥
भवनदीचें पाणी सखया ! मोठें ओढीतें ।
भल्याभल्या पोहणारा उचलुन खालीं पाडीतें ॥ १ ॥
क्षणभंगुर संसार याचा भरवसा नाहीं ।
दुर्लभ नरतनु गेल्या मग तूं पडशिल पस्ताई ॥ २ ॥
म्हणे मुक्ताबाई चांग्या ! अंतारंची खूण ।
धरि सद्गुरुचे पाय तुजला नेतिल उतरून ॥ ३ ॥

# ८ समाधिप्रकरण.

गेले दिगंबर ईश्वर विभूति ।
राहिल्या त्या कीर्ती जगामाजीं ॥ १ ॥
वैराग्याच्या गोष्टी ऐकिल्या त्या कानीं ।
आतां ऐसें कोणी होणें नाहीं ! ॥ २ ॥
सांगतील ज्ञान म्हणतील खूण ।
नयेचि साधन निवृत्तीचें ॥ ३ ॥
परब्रह्म डोळां दावूं ऐसें म्हणती ।
कोणा नयें युक्ति ज्ञानोबाची ॥ ४ ॥
करितील अर्थ सांगतील परमार्थ ।
नये पा एकांत सोपानाचा ॥ ५ ॥
चांगदेव योगी निष्काम चांगला ।
स्वरूपीं रगला केशवाच्या ॥ ६ ॥
नामा म्हणे देवा सांगूं नये कांहीं ।
नये मुक्ताबाई गुह्य तुझें ॥ ७ ॥

—श्रीनामदेवराय.

१ श्रीज्ञानेश्वरांच्या समाधीचा नक्की काळ. २ ज्ञानेश्वरांची लोकमान्यता. ३ कार्तिकीच्या संतमेळ्यांत समाधि घेण्याचा हेतु प्रकट होतो. ४ नामदेवांचे समाधीवरील अभंग. ५ संत व देव आळंदीस जमतात. ६ नामदेवादिकांची खिन्नता. ७ समाधिवर्णन. ८ सोपानकाका व चांगदेव यांच्या समाधि. ९ मायभूमीचें—आपेगांवचें—दर्शन. १० मुक्ताबाईचें प्रयाण व निवृत्तिनाथांची समाधि. ११ समाधिमहोत्सवाचे दिवस. १२ समकालीन संतांच्या समाधितिथि. १३ ज्ञानेश्वरदर्शनाचा नामदेवांचा हट्ट देव पुरवितात.

१. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आळंदीस शके १२१८ दुर्मुखनाम संवत्सरीं कार्तिक वद्य १३ स गुरुवारीं मध्यान्हकाळीं समाधि घेतली व त्यानंतर एकदोन वर्षांच्या आंतच सोपानदेव, चांगदेव, मुक्ताबाई व निवृत्तिनाथ हे समाधिस्थ झाले. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे परमयोगी असल्यामुळें व जगदुद्धाराचें जें महत्कार्य त्यांनीं २२ वर्षांच्या आयुर्मर्यादेंत केलें तेंच पुढें अनेक शतकें त्यांच्याच स्फूर्तीनें व्हावें असा प्रभुसंकेत असल्यामुळें त्यांनीं जिवंत समाधि घेतली ! त्यांच्या समाधीचें अत्यंत रसाळ वर्णन नामदेवरायांच्या समाधीच्या अभंगांत असून त्याशिवाय उद्धवचिद्धनकृत भक्तकथामृतसार, महिपतिकृत संतलीलामृत, नरहरिमालुकृत भक्तकथामृत, निरंजनमाधवकृत ज्ञानेश्वरविजय इत्यादि अनेक ग्रंथांत तें आलें आहे. त्या सर्वांत नामदेवराय हे ज्ञानेश्वरमहाराजांच्या नित्य संगतींतले प्रेमळ भक्त असून त्यांनीं तो मनोहर प्रसंग स्वतः डोळ्यांनीं पाहून हुबेहुब वर्णन केलेला असल्यामुळें त्यांच्याच अभंगांचा मुख्य आधार ह्या कथेला आहे. ज्ञानेश्वरमहाराजांचे समकालीन विसोबा खेचर, नामदेव, जनाबाई, जनमित्र, चोखोबा इत्यादि संतांनीं ज्ञानेश्वरमहाराजांच्या समाधीचा काळ वर सांगितल्याप्रमाणें 'शके १२१८ दुर्मुख नाम संवत्सर कार्तिक वद्य १३ गुरुवार मध्यान्ह समय' ह्रच दिला आहे व हे ज्ञानेश्वरांच्या मेळ्यांतले संत त्या दिव्यप्रसंगीं जातीनें हजर असल्यामुळें त्यांनीं दिलेल्या काळाबद्दल बिलकुल शंका रहात नाहीं. पुढील काळांतले एकनाथ, उद्धवचिद्धन इत्यादि संतांनीं व कवींनींही तोच काळ दिलेला असल्यामुळें ज्ञानेश्वरमहाराजांच्या समाधीची बरोबर वेळ आपल्यास मिळाली आहे हें आपलें मोठेंच भाग्य समजलें पाहिजे. असो. त्यासंबंधाचे संतांचे अभंग असे आहेत:—

( १ ) विसोबा खेचर म्हणतात:—

**अलंकापुरीं राहिली । श्रीगुरु ज्ञानाई माउली ॥ १ ॥**
**इंद्रायणीतीर । नांदे दैवत सिद्धेश्वर ॥ २ ॥**
**शके बाराशें आठरा । दुर्मुख नाम संवत्सरा ॥ ३ ॥**

'गुरुवासर कार्तिकमासीं । कृष्णपक्ष त्रयोदशी ॥ ४ ॥
माध्यान्हीं दिनकर । राहे क्षणमात्र स्थिर ॥ ५ ॥
खेचर वंदी ज्ञानेश्वर । जोडोनियां दोन्ही कर ॥ ६ ॥

( २ ) नामदेवराय म्हणतातः—

धन्य अलंकापूर इंद्रायणी तीर । देव सिद्धेश्वर नांदे तेथें ॥ १ ॥
पुण्यक्षेत्र ऐसें पाहूनीयां आधीं । घेतली समाधि ज्ञानदेवें ॥ २ ॥
गणित बारा शतें अधिक अष्टादश । कृष्ण कार्तिकमास त्रयोदशी
देवगुरुवार दुर्मुख संवत्सर । कारिती सुरवर कुसुमवृष्टी ॥ ४ ॥
नामा म्हणे ज्ञानराज ब्रह्म पूर्ण । समाधि निधान संजीवनी ॥ ५ ॥

( ३ ) जनाबाई म्हणतातः—

धन्य सर्वकाळ धन्य तो सुदीन । धन्य हा निधान ज्ञानदेव ॥ १ ॥
बारा शतें आठरा दुर्मुख संवत्सर । तिथी गुरुवासर त्रयोदशी २
शरदतु कृष्णपक्ष कार्तिकमास । बैसे समाधीस ज्ञानराजा ॥ ३ ॥
नामयाची जनी लागते चरणीं । ज्ञानेश्वरा ध्यानीं जातसे ॥ ४ ॥

( ४ ) चोखामेळा म्हणतातः—

ज्ञानेश्वर नामें धरिला अवतार । क्षेत्र अलंकापूर इंद्रायणी ॥ १ ॥
अद्वैत ज्ञानाची करूनी उजरी । टीका ज्ञानेश्वरी ग्रंथ केला ॥ २ ॥
अमृत अनुभवी गुह्यगम्य ज्ञान । दाउनीयां जन उद्धरिले ॥ ३ ॥
बारा शतें अठरा शक शालिवाहन । दुर्मुख अभिधान संवत्सर ४
कृष्ण त्रयोदशी कार्तिक हा मास । बैसे समाधीस ज्ञानदेव ॥ ५ ॥
जातीहीन चोखा विनवी जोडोनि कर । समाधी निर्धार संजीवनी

असो. इतके उतारे पुरेत. खुद्द ज्ञानेश्वरमहाराजांच्या स्वात्मपत्रांतील ' शके बारासें अष्टादशी । कृष्णपक्ष कार्तिक मासीं । गुरुवार त्रयोदशीं । समाधीसी बैसविलें ॥ ८ ॥' यावरूनही वरील * काल मुकर होतो.

---

* या दिवसाची इंग्रजी तारीख २५ ऑक्टोबर इ. स. १२९६ ही होय.

२. शके ११९७ श्रावण कृष्ण ८ स ज्ञानेश्वरमहाराजांचा जन्म झाला असून त्यांनीं समाधि शके १२१८ कार्तिक वद्य १३ स घेतली म्हणजे समाधिकालीं त्यांना २१ वर्षें ३ महिने व ५ दिवस जन्मून झाले होते. ज्ञानेश्वरीसारखा अनुपम ग्रंथ त्यांनीं आपल्या १५ व्या वर्षीं केला! ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, योगवासिष्ठटीका, पासष्टी व हरिपाठादि शेंकडों अभंग इतकी ग्रंथरचना ज्यांनीं २१ वर्षांच्या वयांत केली; चांगदेवासारख्या १४ शें वर्षें तप करून वांचलेल्या योगनिष्ठास ज्यांनीं आपल्या पायांशीं आणलें; रेड्याकडून वेद बोलविणें, जडभिंत चालविणें इत्यादि लोकोत्तर चमत्कार ज्यांनीं सहज लीलेनें करून दाखविले; जे सर्व समकालीन संतांस परम वंदनीय होऊन राहिले; ज्यांचें श्रेष्ठत्व आज सहाशें वर्षें एकनाथ-तुकारामादि दरोबस्त सत्पुरुषांनीं मोठ्या प्रेमादरानें गाइलें आहे; जे अखिल संतमंडळामध्यें केवळ अग्रगण्य होऊन राहिले आहेत; त्या ज्ञानेश्वरमहाराजांस श्रीमहाविष्णूचा अवतार म्हणून आपल्या राष्ट्रानें एकमतानें मानलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. ज्ञानेश्वरमहाराजांच्या अवतारचरित्राचा विचार करतां मोरोपंतांनीं त्यांस विष्णूचा 'अकरावा अवतार' म्हणून म्हटलें आहे. नामदेव, त्यांच्या घरची मंडळी, जनाबाई, विसोबा खेचर, सांवता माळी, गोरा व राका कुंभार, जगमित्र, चोखामेळा, बंका महार, चांगदेव, नरहरि सोनार व खुद्द ज्ञानेश्वरांचीं भावंडें ह्या सर्वांचे ज्ञानेश्वरांबद्दल जे अत्यंत प्रेमाचे, आदराचे व कळवळ्याचे उद्गार निघाले आहेत त्यांचा एकदम विचार मनांत आला म्हणजे असें वाटतें कीं, हे सर्व महात्मे ज्ञानेश्वरांला साक्षात् आपला आत्मा मानीत, त्यांना कोठें ठेवूं व कोठें न ठेवूं असें त्यांना होऊन जाई, त्या सर्वांच्या एकवट प्रेमाची ती मूर्ति होती, त्यांच्या सर्वांच्या उत्साहाचा, आनंदाचा, प्रीतीचा तो ठेवा होता, व फार काय पण 'ते सर्व भक्त 'आपण अवयव व तो आपला आत्मा' अशा निरतिशय प्रेमानें त्यांच्याशीं वागत! त्यांपैकीं प्रत्येकजण आपल्या अंगानें पूर्ण होता, प्रत्येकजण भक्त होता, प्रत्येकाला प्राप्तव्य प्राप्त झालें होतें, प्रत्येक 'परागती' ला पोंचला होता आणि अशा पूर्णांच्याही पूर्णप्रेमाचें पूर्णनिधान म्हणजे आमचे ज्ञानेश्वर झाले होते! ज्ञानेश्वरमहाराज

हे सूर्य होते असें म्हटल्यानें अन्य संतांवर नक्षत्रतारांचा आरोप होण्याचा संभव आहे म्हणून मी म्हणतों कीं ह्या सर्व सूर्यांमधला ते प्रकाश होते ! ते सूर्यांतले सूर्य होते. ते त्यांच्या आनंदाचा आनंद, चैतन्याचें चैतन्य व प्रेमाचें प्रेम होतें. ज्ञानेश्वरांची मूर्ति त्यांच्या सर्वेंद्रियांना आनंद चारून जागच्या जागीं स्तंभित करून टाकी. ज्ञानेश्वरांचीं वचनमौक्तिकें ते आपल्या सर्वेंद्रियांचीं लेणीं करीत. लिंगभेद विसरून ते 'ज्ञानाबाई मायबहिणी' म्हणून त्यांना कुरवाळीत. " विवेकसागर सखा माझा ज्ञानेश्वर ॥ मरोनियां जावें बा माझ्या पोटा यावें ॥ २ ॥ ऐसें करी गा माझ्या भावा । सख्या माझ्या ज्ञानदेवा ॥ जाइन ओवाळुनि । म्हणे जन्मोजन्मीं जनी ॥" अशा प्रकारचीं प्रेमाचीं गीतें ज्ञानेश्वरांच्या प्रेमानें भरलेल्या मंजुळ आवाजानें गात नामयाची जनी आनंदानें नाचे ! " श्रीज्ञानराजें केला उपकार । मार्ग हा निर्धार दाखवीला" अशा प्रकारचे उद्गार सेना न्हाव्याच्या मुखांतून सहज बाहेर पडतांना ऐकून भाविकांचीं अंतःकरणें कृतज्ञतेच्या प्रेमानें नाचूं लागत. 'सखा माझा ज्ञानेश्वर । संतजनांचे माहेर' असें म्हणून अंगीं ब्रह्मरस ठसावलेले प्रेमळ भक्तही ज्ञानेश्वरांच्या दिव्यगुणगणप्रेमानें वेडावून जात. ज्ञानेश्वरांच्या साक्षात् संगतींत राहणाऱ्या भक्तभाविकांचें त्यांजवर अशा प्रकारचें अनुपम प्रेम होतें. ज्ञानेश्वरांच्या दर्शनार्थ हजारों लोक जमत व त्यांना हा संतांचा अन्योन्यप्रेमा पाहून आपल्या डोळ्यांचें पारणें फिटलें असें वाटे. ज्ञानेश्वरांच्या पायांवर डोकीं ठेवून हजारों जीव कृतार्थ झाले. त्यांच्या दिव्य मूर्तीचें दर्शन घेऊन अनेकांचीं पातकें झडून गेलीं. त्यांच्या मुखांतून स्रवणाऱ्या सरस्वतीच्या ओघांत ज्यांनीं मज्जन केलें त्यांचें पापतापदैन्य नष्ट झालें. नामदेवांच्या समाधीच्या अभंगांत 'जो जो दिवस उगवला तो तो ज्ञानदेवें सफळ केला' असें म्हटल्याप्रमाणें त्यांच्या अवताराचे सर्व क्षण जगदुद्धारांत खर्च झाले. बाहेरची लोकांची उपाधि फार वाढली तेव्हां त्यांनीं जिवंत समाधि घेण्याचा विचार केला.

३. शके १२१८ च्या कार्तिक शुद्ध १० स नित्याप्रमाणें ठिकठिकाणांहून संतमंडळी पंढरपुरास जमली होती. आषाढीकार्तिकीच्या यात्रांचा

परिपाठ हा पुंडलिकाच्या वेळेपासूनचा होता. पंढरीच्या ८४ च्या शिला-लेखांत तो ज्ञानेश्वरनामदेवांच्या पूर्वींपासून चालू होता असें अनुमान काढ-ण्यास आधार सांपडतो. असो. नामदेवराय व त्यांची मंडळी पंढरीसच होती. चोखामेळा मंगळवेढ्याहून आले. विसोबा खेचर औंढ्यानागनाथा-हून आले. याप्रमाणेंच गोरा कुंभार, जगमित्र, सेना न्हावी इत्यादि संत आपापल्या गांवांहून दिंड्यापताका घेऊन नामघोष करीत पंढरीस येऊन पोहोंचले. आळंदीहून निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव, मुक्ताबाई व चांगदेव ही मंडळी आली. ज्ञानेश्वरमहाराजांनीं सांप्रदायाप्रमाणें चंद्रभागेचें स्नान केलें, पुंडलिकाचें दर्शन घेतलें व देवळांत श्रीविठ्ठलरुक्मिणीचें दर्शन घेण्याकरितां ते गेले. त्यांची सर्व संतमंडळांत फार मान्यता होती व त्यांच्या दर्शनार्थ हजारों लोकांच्या झुंडी धांवत असत. देहोपाधींतून ते केव्हांच मुक्त झाले होते. चारी मुक्ति त्यांच्या पायाशीं लोळत होत्या. कोणी पोर मागे, कोणी द्रव्य मागे, कोणी बायको मागे, इत्यादि लौकिक उपाधि वाढली. यामुळें आतां समाधि घेणेंच बरें असें त्यांस वाटून त्यांनीं संतजनांसमक्ष आपलें मनोगत देवास सांगितलें. ज्ञानेश्वरनामदेवादि परम भक्त प्रत्यक्ष सन्मुख पाहून देवास प्रत्यक्षपणें प्रकट होण्याची सहजच इच्छा झाली. देव तुम्हांआम्हांला अप्रगट आहे, पण 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' ह्या त्याच्याच वचनाप्रमाणें तद्रूप असलेले जे ज्ञानी संत त्यांना तो अप्रकट कसा असेल ? कोणीही आपलें आपल्याला अप्रकट असूं शकणार नाहीं ! देव व संत एकच असून प्रेमसुखासाठीं दोन होतात. एकपणांत भोग नाहीं म्हणून भक्तीचा सुखसोहळा भागण्यासाठीं देव भक्त होतात. सुवर्ण आणि अलंकार मिळून जसें एक सुवर्णच, चंद्र आणि चांदणें म्हणजे एक चंद्रच, कापूर आणि परिमळ म्हणजे कापूरच, किंवा गोडी आणि गूळ म्हणजे जसा एक गूळच, त्याप्रमाणें देव आणि भक्त म्हणजे एक देवच ! तुम्ही आम्ही एकमेकांला पाहतों, एकमेकांशीं बोलतों, एकमेकांच्या संग-तीचें सुख भोगतों—असाच व्यवहार देवभक्तांचा असतो. ज्ञानेश्वरांनीं

नामदेवादि भक्तांसमक्ष पांडुरंगास आपला समाधि घेण्याचा मनोदय सांगितला, तेव्हां देवांनीं "बापा ज्ञानसागरा! तूं प्रत्यक्ष ज्ञानाची मूर्ति आहेस. तूं पदपदांतरांनीं स्वानुभव जीवास सोपा करून ठेविला आहेस व यानेंच माझ्या पूर्णकृपेस तूं पात्र झाला आहेस. बा ज्ञानचक्रवर्ती! तुझी आर्त पूर्ण होईल" असें भाषण करून त्यांस कुरवाळलें. नामदेव सन्मुखच होते. 'ज्ञानांजन' समाधि घेणार हें पाहून त्यांस महद्दुःख झालें. सर्व संतांनाही ह्यांचा वियोग होणार म्हणून फार खेद झाला. योगाभ्यासानें 'करचरणतळें। जैसीं कीं रातोत्पळें। पाखाळीव होती डोळे। काय सांगों ॥' अशी ती त्यांची दिव्य मूर्ति वारंवार दृष्टीस पडणार नाहीं म्हणून त्यांच्या नेत्रांतून घळघळा अश्रूंचे पाट वाहिले. असो. 'दशमी प्रस्थानाचा समयो। एकादशी जागर उत्सावो। द्वादशी क्षीरापती महोत्सावो। ज्ञानदेवें केला॥' त्रयोदशीला रुक्मिणीनें स्वहस्तानें ज्ञानरायांस पंचपक्वान्नांचें जेवण घातलें व 'कार्तिक शुद्ध एकादशीस पंढरीस जसा महोत्सव होतो तसा कार्तिक वद्य एकादशीस तुझ्या प्रीत्यर्थ आळंदीस महोत्सव होईल. शुद्ध एकादशी आमची व वद्य तुमची' असा देवांनीं त्यांस वर दिला. तेव्हां संतमंडळींनीं आनंदानें टाळी पिटून जयजयकार केला व सर्वजण देवासह आळंदीस आले.

४. पुढें आळंदीस जो समाधीचा प्रकार झाला त्याचें अत्यंत हृदयद्रावक वर्णन नामदेवांनीं केलें आहे. तें मूळांतच वाचलें पाहिजे. महिपति, निरंजनमाधव इत्यादि कवींनीं नामदेवांच्याच आधारें तशींच वर्णनें केलीं आहेत, पण नामदेवांच्या वाणींतला प्रेमळपणा कांहीं अलौकिक आहे. समाधिप्रकरणावर नामदेवांचे २५० वर अभंग आहेत. आळंदीक्षेत्राचा पुरातन महिमा, ज्ञानेश्वरांविषयीं देवाचा आणि भक्तांचा—त्यांतही नामदेवाचा—अत्यंत प्रेमा, समाधिप्रसंगीं ज्ञानेश्वरांच्या वियोगानें सर्वांच्या हृदयाची झालेली विव्हळता व त्या प्रसंगाचें उदात्त आणि गंभीर स्वरूप यांची यथार्थ कल्पना नामदेवांचे साधे प्रचीतीचे व प्रेमरसानें भर-

लेले अभंग भक्तिभावानें वाचल्याशिवाय येणार नाहीं. विठ्ठल आणि रुक्मिणी स्वतः ज्ञानेश्वरांस समाधि देण्याकरितां पंढरीहून आले व त्यांचा संतांसमक्ष वेळोवेळीं ज्ञानेश्वरनामदेवांशीं संवाद झाला ही गोष्ट नामदेवांच्या हद्दीवर उभे न राहिलेल्या किंवा त्या हद्दीची कल्पनाही न करितां येण्या-इतके अविश्वासी बनलेल्या पामरांना पटणें कठिण आहे ! विठोबा रखुमाई हे संतांच्या प्रेमाला भुलून त्यांच्या दारीं पडलेले असतात. भक्ताला देवा-शिवाय आसरा नाहीं व देवालाही भक्ताशिवाय करमत नाहीं ! हा देव-भक्तांचा अन्योन्यप्रेमा आपण अंगानें भक्त होऊन अनुभविल्यावांचून कळणार नाहीं. हें तर्काचें काम नाहीं. तर्क येथें पांगळा होतो. संशयांनीं व कुतर्कांनीं ज्यांचें हृदय रुक्ष झालें आहे अशांचा हा विषय नाहीं. तर्कटी व संशयांनीं खाल्लेले पुरुष अभागी होत. प्रेमामृत त्यांच्या गळीं न उतर-ण्याचें कारण ते संशयराहूनें ग्रासलेले असतात हेंच होय. संशय हें पर-मार्थांत मोठें विघ्न आहे. " म्हणऊनि संशयाहूनि थोर । आणिक नाहीं पाप घोर । हा विनाशाची वागुर । प्राणियांची ॥ २०३ ॥ जैं अज्ञानाचें गदड पडे । तैं हा बहुवस मनीं वाढे । म्हणोनि सर्वथा मार्ग मोडे । विश्वासाचा ॥ २०५ ॥ " ( ज्ञानेश्वरी अ० ४ ). सांप्रत असाच अज्ञानाचा घनांधकार पडल्यामुळें विश्वासाचा मार्ग मोडून गेला आहे व नामदेवासारख्यांच्या वचनांविषयींसुद्धां बऱ्याच विद्वानांची अश्रद्धा झाली आहे ! तर्कनिपुण विद्वान् हे हत्ती होऊन आपल्याच डोक्यावर धूळ उडवून घेतात आणि भाविक श्रद्धावंत प्रेमळ पुरुष मुंगी होऊन साखर खातात असा लौकिकांतला अनुभव आहे ! ' तार्किकांचा टाका संग । नुमगे खरें बुडाल ' असा इशारा देणें तुकोबारायासारख्यांसही भाग पडतें. म्हणून सर्व प्रकारचे संशय व कुतर्क टाकून संतांच्या वचनांवर पूर्ण विश्वास ठेवावा व आपल्या हिताचा मार्ग त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून चाल-ण्यांतच आहे असें निभ्रांत मानून चालूं लागावें ही सर्व मुमुक्षूंच्या हिताची गोष्ट आहे.

९. असो. देव आणि भक्त आळंदीस आले व इंद्रायणीचें स्नान करून भक्तांनीं नाममंत्राच्या आवृत्तींनीं 'प्रत्यक्ष पूजिली मूर्ति विठोबाची' आळंदीस कीर्तभजनांची गर्दी उडून राहिली. 'पव्हे घालूनि ज्ञानदेवें। जग-तारिलें कीर्तनें।' याप्रमाणें ज्ञानदेवांच्याच मार्गानें जाणाऱ्या संतांनीं कीर्तनाचा रंग भरून दिला व नामघोषानें पंढरीच आळंदीस आणली. देवांनीं आळंदीचें महत्व नामदेवास सांगितलें. ह्या पुरातन पंचक्रोशींत प्राचीन काळीं अनेक ऋषिमुनींनीं तप केलें असून हें शिवक्षेत्र ज्ञानेश्वरांच्या समाधीस योग्य स्थान आहे व यापुढें ज्ञानेश्वरांच्या समाधीमुळें या क्षेत्राचा महिमा वाढणार आहे असें देव म्हणाले. देवभक्त सर्व श्रीसिद्धेश्वरलिंगापाशीं आले. सोपानदेवांनीं पांडुरंगाच्या चरणीं मिठी घातली व देवांनीं त्यांचें समाधान केलें. निवृत्तिनाथांची उन्मन्यवस्थेंत सात जन्म बैठक होती! "तंव निवृत्तीसी उन्मनी। बैसका होती सप्तजन्मीं। ते पालटोनि तत्क्षणीं। मूर्ति ते न्याहाळी॥" ज्ञानदेवांनीं गुरुचरणरजीं मन निमग्न केलें व सोपानास प्रेमानें कुरवाळलें. विठोबांनीं ज्ञानेश्वरांस समाधीस बसा म्हणून सांगितलें, तों "देवऋषिगण सकळ। जयजयकार ध्वनि मंजुळ। स्तुतिस्तोत्रें सकळ। नक्षत्रादि गाती॥" परिसा भागवत आनंदानें डोलूं लागले, विठ्ठल कृतकृत्य झाले, पण नामदेव?—"नामा असे शोकाकुलित। चरणीं रत विठ्ठलाच्या॥" 'ज्ञानासारखें रत्न मागुतें न देखो' असें म्हणून नामदेव भयभीत झाले!

## अभंग.

देवो म्हणती रुक्मिणी। हा एकचि योगी देखिला नयनीं।
हेंचि ज्ञान संजीवनी। जाण त्रैलोक्यासी॥ १॥
धन्य धन्य धरातळीं। जो यातें दृष्टी न्याहाळी।
तो वाहात येईल टाळी। वैकुंठभुवनासी॥ २॥
जो करील याची यात्रा। तो तारील सकळ गोत्रा।
सकळही कुळें पवित्रा। जयाचानि दर्शनें होतां॥ ३॥

अलंकापुरीं हें शिवपीठ । पूर्वीं येथें होते नीलकंठ ।
ब्रह्मादिकीं तप वरिष्ठ । येथेंचि पै केलें ॥ ४ ॥
पंढरीहूनि हें सोपें । जनांची हरावया पापें ।
कळिकाळ कोपलिया कोपें । न चले बळ अळंकापुरीसी ॥ ८ ॥
ऐसें सांगतां हृषीकेशी । प्रेम वोसंडलें रुक्मिणीसी ।
म्हणे धन्य धन्य जयाची कुशी । ज्ञानदेव जन्मले ॥ ९ ॥
नामा म्हणे माझा स्वामी । सर्व संतसमागमीं ।
ऐसें सांगितलें ग्रामीं । अळंकापुरीसी ॥ १० ॥

६. ज्ञानेश्वर समाधीस बसणार तों संत ज्ञानी खरें, 'हें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे । येरवीं तत्वता वस्तु जें असे । ते अविनाशचि' हा वेदांत त्यांनीं ज्ञानेश्वरांच्याच मुखांतून ऐकलेलाही खरा, पण प्रत्यक्ष पुढें खेळणारी सगुणमूर्ति डोळ्यांपुढून जाणार असा जेव्हां प्रसंग प्राप्त झाला तेव्हां त्यांचें ज्ञान विरघळलें. नामदेव म्हणतात, "विलाप मांडिला भक्तीं । खंती करिती त्रिजगतीं । ज्ञानदेवासारिखी मूर्ती । न देखों म्हणती देवराया ॥ सोपानें घातलें लोटांगण । मुक्ताईनें धरिले चरण । संत करिताती स्तवन । पांडुरंगरायाचें ॥" नामदेवांनीं तर फारच कासाविसी केली. ज्ञानदेवांचा वियोग होणार म्हणून त्यांचा जीव फार घाबरा झाला. तीर्थयात्राप्रसंग त्यांस आठवला, ज्ञानदेवांच्या संगतींत आपण स्वसुखानुभवाची कशी मजा मारली, भक्तिज्ञानवैराग्याच्या काय काय गोष्टी केल्या तो सर्व प्रकार डोळ्यांपुढें उभा राहून त्यांचा जीव खालवर होऊं लागला. ज्ञानेश्वर आत्मरूप आहे असें तूं ओळख असें देवांनीं त्यांस पुष्कळ सांगून पाहिलें पण त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं.

## अभंग.

जय जय शब्दें नामा बोभाये । केशवा त्राहे त्राहे ।
मी व्याकुळ होताहे । ज्ञानदेवाकारणें ॥ २ ॥
तूं माझी जनकजननी । परी ज्ञानदेवावीण मेदिनी ।
शून्य वाटे मजलागोनी । जैसें मत्स्य जीवनेंवीण ॥

**तूं रक्षिता सर्व जीवांसी । तरी कां दुःख आम्हांसी ।**
**तूं जवळी असतां हृषीकेशी । ऐशी दशा हे प्राप्त ! ॥ ७ ॥**
**नामा खेदें क्षीण झाला जीव । तंव नेत्र उघडिले देवें ।**
**आलिंगिला केशवें । चारी भुजा पसरोनी ॥ ८ ॥**

निवृत्तिनाथांची नित्यसमाधीही क्षणभर भंग पावली !

**बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट । ओघ बारा वाट मुरडताती ॥२**
**बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा । तृण रानोमाळां पांगलासे ॥३॥**

असें होऊन निवृत्तिनाथांसही क्षणैक खेद झाला. बाळपणीं आईबाप सोडून गेले तेव्हांही त्यांस दुःख झालें नव्हतें इतकें दुःख या वेळीं झालें. ते म्हणाले:—

**' मायबापें आम्हां त्यागियेलें जेव्हां ।**
**ऐसें संकट तेव्हां झालें नाहीं ' ॥ ५ ॥**
**तेव्हां नामा म्हणे देवा पेटला हुताशन ।**
**करा समाधान निवृत्तीचें ॥ ६ ॥**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांची श्रीगुरुनिष्ठा अपूर्वच होती. सर्व ज्ञानेश्वरीभर व मुख्यतः १३ व्या अध्यायांतल्या ' आचार्योपासनम् ' ह्या पदावर त्यांनीं जी परम प्रेमळ टीका केली आहे ती, व अमृतानुभवांतल्या २ प्रकरणांत श्रीनिवृत्तिनाथांच्या तात्विक स्वरूपाचें जें गंभीर विवरण केलें आहे तें लक्षांत घेऊन ह्या अवतारी गुरुशिष्यांचा अखेरचा संवाद नामदेवरायांच्या वाणीनें आपण ऐकूं:—

**पुढें ज्ञानेश्वर जोडूनियां कर ।**
**बोलतो उत्तर स्वामीसंगें ॥ १ ॥**
**" पाळिले पोशिले चालविला लळा ।**
**बा ! माझ्या कृपाळा निवृत्तिराजा ॥ २ ॥**
**स्वामीचिया योगें झालों स्वरूपाकार ।**
**उतरलों पार मायानदी " ॥ ३ ॥**

निवृत्तीनें हात उतरिला वदना ।
त्यागिलें निधाना आम्हालागीं ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा ! देखवेना मज ।
ब्रह्मीं ज्ञानराजा मिळवीला ॥ ५ ॥
वोसंडोनी निवृत्ती आलिंगों लागला ।
आणिकांच्या डोळां अश्रु येती ॥ १ ॥
अमर्यादा कधीं केली नाहीं येणें ।
शिष्यगुरुपण सिद्धी नेलें ॥ २ ॥
गीतार्थाचा अवघा घेतला सोहळा ।
गुह्यगौप्यमाळा लेववीलिया ॥ ३ ॥
फेडिलीं डोळयांचीं अत्यंत पारणीं ।
आतां ऐसें कोणी सखे नाहीं ॥ ४ ॥
काढोनीयां गुह्य वेद केले फोल ।
आठवती बोल मनामाजीं ॥ ५ ॥
नामा म्हणे संत कासावीस सारे ।
लाविती पदर डोळीयांसी ॥ ६ ॥

सोपानदेव व मुक्ताबाई यांच्या दुःखांचें तर वर्णनच नामदेवांला करवलें नाहीं. आईला मुकणारीं पाडसें सैरा धांवतात तशीं तीं ज्ञानदेवावांचून अनाथ होऊन स्फुंदस्फुंदों लागलीं. *श्रीपांडुरंगानें सर्वांचें सांत्वन केलें. "ऐसें ऐकोनि श्रीहरी । म्हणे धन्य धन्य तुमची वैखरी । जगदुद्धार केला संचारीं । बावीस वर्षें असतां पैं ॥ जो जो दिवस उगवला । तो तो ज्ञानदेवें सफळ केला । पदपदांतर कथिला । जेणें आत्माराम संतोषें ॥"

पूर्वी अनंत भक्त झाले । पुढेंही भविष्य बोलिले ।
परी ज्ञानदेवें सोडविले । अपार जीवजंतु ॥

(* 'आह्मां मातापिता नित्य ज्ञानेश्वर । नाहीं आतां थार विश्रांतीसी')

याप्रमाणें ज्ञानेश्वरमहाराजांच्या २२ वर्षांच्या दृश्य चरित्राबद्दल साक्षात पंढरीनाथांनीं गौरव केला. धन्य धन्य ते ज्ञानेश्वर, निवृत्ति, सोपान, मुक्ताबाई यांना प्रसविणारे मातापितर व त्यांच्या संगतीच्या महासुखाचा लाभ घेणारे नामदेवादि भक्तराज ! धन्य त्यांचें कुळ ! धन्य ती आळंदी ! धन्य ती मराठी भाषा व असल्या नररत्नांना उत्संगावर वाहणारी धन्य ती महाराष्ट्रभूमि !

७. पंढरीहूनही आळंदी हें पीठ जुनाट आहे. 'अलं ददाति' म्ह० पुरे म्हणण्यापर्यंत सर्व मनोरथ पूर्ण करणारी ती आळंदी. ही आदिनाथ शंकरांच्या तपश्चर्येचीही जागा असून येथें अगस्तिप्रमुख हजारों तपोनिष्ठांनीं वास्तव्य केलें होतें. शिवाय तिच्या पंचक्रोशींतही अनेक पवित्र स्थानें आहेत. आळंदीच्या पूर्वेस मातुलिंग म्ह० मर्कळ येथील केशवराज, दक्षिणेस पुण्याचा पुण्येश्वर, पश्चिमेस इंदुरीचा ब्रह्मेश्वर व उत्तरेस भीमातीरीं खेटकग्रामीं म्हणजे खेड येथील सिद्धेश्वर. हीं सर्व शिवस्थानें आहेत, यावरून ह्या प्रांतीं प्राचीन काळीं शिवोपासनाच जारीनें प्रचारांत असावी असें वाटतें. ज्ञानेश्वरांची परंपरा तरी आदिनाथांपासून चालत आलेली असून निवृत्तिनाथांच्या कृपानुग्रहानें त्यांनीं श्रीकृष्णाची म्हणजेच विठ्ठलाची उपासना महाराष्ट्रांत रूढ केली. असो. अशा पुरातन आळंदीच्या सिद्धक्षेत्राचें माहात्म्य पूर्वीच मोठें होतें, पण तें ज्ञानेश्वरांच्या पुण्यचरित्रानें व विशेषतः त्यांच्या समाधीनें अर्वाचीन काळांत प्रख्यात झालें आहे. आळंदीस इंद्रायणी (इंद्रस्य अयनं यस्याम् म्ह० जिच्या तीरीं इंद्राच्या तपाची जागा आहे) नदी असून तिच्या कांठावर श्रीसिद्धेश्वराचें पुरातन स्थान आहे. तेथें सिद्धेश्वराच्या वामबाजूस अजानवृक्षाच्या छायेखालीं एकदोन खणांची गुहा म्ह० समाधिस्थान ज्ञानेश्वरांनीं तयार करविलें होतें व त्यांत समाधि घेण्यास ते सिद्ध झाले. नामदेवांनीं आपल्या मुलांकडून समाधीची जागा झाडविली. एकादशीला सर्वांनीं हरिजागर केला तेव्हां नामदेवांनीं कीर्तन केलें. द्वादशीला पारणें सोडलें. द्वादशीला दोन प्रहर होईतों भोजनें होत

होतीं. पिंपळाच्या पारावर ज्ञानेश्वरांनीं भक्तजनांसह पारणें सोडलें. तिसरे प्रहरीं केंदूर येथील भगवद्भक्त कान्हु पाठक हे आपल्या परिवारासह ज्ञानेश्वरांच्या दर्शनास आले. सर्व संतांनीं त्यांनाच आग्रह केल्यावरून त्यांनीं खिरापतीचें कीर्तन केलें (हा मान अद्याप केंदूरकरांकडे चालत आहे). त्रयोदशीच्या दिवशीं तुळशीबेल आंथरून ज्ञानेश्वरमहाराजांचें आसन तयार झालें. शिवाचा ढवळा नंदी उठवून विवराची शिळा उघडली. नंतरः—

**ज्ञानदेव बैसले समाधी। पुढें अजान वृक्षनिधी।**
**वामभागीं पिंपळ आधीं। सुवर्णाचा शोभत ॥ १ ॥**
**निवृत्ति सोपान खेचर। नामदेव मुक्ताइ निरंतर।**
**हे उत्तरद्वारासमोर। बैसते जाहले ॥ २ ॥**
**देव म्हणे "ज्ञानेश्वरा!। चंद्र तारा जंव दिनकरा।**
**तंव तुझी समाधि स्थिरा। राहो दे निरंतर ॥ ३ ॥**
**जंववरी हें क्षितिमंडळ। जंववरी हें समुद्रजळ।**
**मग कल्पक्षयीं यथाकाळ। माझ्या हृदयीं ठसावें ॥ ४ ॥**
**आणिक एक सोपारें। ज्ञानदेव हीं अक्षरें।**
**जो जप करील निर्धारें। त्यासी ज्ञान होईल" ॥ ५ ॥**

यानंतर स्वतः श्रीविठ्ठलांनीं ज्ञानेश्वरांच्या भावार्थदीपिका, अमृतानुभव व योगवासिष्ठ ह्या ग्रंथांची स्तुति केली व ज्ञानेश्वरांनीं १०८ ओव्यांचें अखेरचें **'नमन'** केलें. **'नमन'** केल्यानंतर जयजयकारांच्या गर्जनेंत ज्ञानेश्वरमहाराज समाधीकडे जाण्यासाठीं उठले. अवध्यांनीं त्यांस वंदन केलें. श्रीविठ्ठलांनीं त्यांच्या कपाळीं केशरीगंध लावून गळ्यांत पुष्पहार घातला. नामदेव वत्सासारखे तळमळूं लागले. समाधिस्थानाला प्रदक्षिणा घालून ते आंत शिरूं लागले तेव्हां स्वतः श्रीविठ्ठलांनीं त्यांस हात दिला व 'फार केले कष्ट जगासाठीं' असें म्हणून प्रेमानें त्यांस आंत नेलें. सर्वांनीं त्यांच्या नांवाच्या घोषांनीं दशदिशा भरून टाकल्या. त्यांचे गुणानुवाद सर्वजण गाऊं लागले, त्यांत 'नामा म्हणे यांनीं अनुभवाच्या नौका। पार केले लोकां जडमूढा!।' नामदेवांच्या भाषणाचा भावार्थ हा कीं, यांनीं ग्रंथ करून लोकांस तारिलें

असें म्हणण्यापेक्षां स्वानुभवाच्या नौकेंतून जडमूढ पार केले असेंच म्हणणें योग्य होय. त्यांचा एक हात विठोबांनीं धरिला व दुसरा निवृत्तिनाथांनीं धरिला व दोघांनीं त्यांस आसनावर बसविलें. 'ज्ञानदेव म्हणे सुखी केलें देवा। पादपद्मीं ठेवा निरंतर।' तीन वेळां करकमळ जोडून ज्ञानदेवांनीं नेत्र मिटले. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या समाधीचें तोंड उत्तरेस आहे व उत्तराभिमुख पद्मासनावर ते बसल्याची कथा प्रसिद्ध असून श्रीज्ञानेश्वरींत त्यांनीं पूर्वीं तसेंच सांगून ठेविलें होतें. अ० ८ मध्यें सर्वत्र हाच विषय त्यांनीं प्रतिपादिला आहे. त्यांच्या समाधीबद्दल सगुणमूर्तिप्रेमानें इतर संतांना दुःख झालें, पण ज्ञानेश्वरमहाराज स्वतः पूर्णानंदरूप होते. नामदेवांच्या एवढ्या विस्तृत वर्णनांत त्यांच्या वृत्तीची चलविचल झाली होती असें दाखविणारी एकही ओळ नाहीं! ते संपूर्ण वृत्तींला गिळूनच बसले होते. त्यांना हर्षशोकादि विकार कोठून बाधणार? शब्द जेथें निमतो, विचार जेथें थकतो, जें प्रणवाचें मूळ, जें योगद्रुमाचें फळ, जें आनंदाचें चैतन्य, जें आकाराचें पैलतीर, जें बंधमोक्षाचें निर्वाण असें परेच्या पलीकडचें जें शुद्धस्वरूप तेंच जे होऊन राहिले होते त्यांना जागृतींतून समाधींत जाणें काय जड होतें? ज्यांची जागृतीच समाधि होती त्यांना निराळी समाधि ती घेऊन काय करायचें होतें? पण लोकपालनतत्पर अशा श्रीज्ञानेश्वरमहाराजांची समाधि म्हणजे केवळ त्यांची लीला होय. चार देह, चार वाचा, चार अवस्था, त्यांना परमात्मरूपच होत्या. ते नित्यमुक्तच होते. जन्मभर मनुष्याला ज्याचा ध्यास असतो तेंच त्याला प्रयाणकाळीं आठवतें. जन्मभर जे वृत्तिशून्य योगेश्वराचें ऐश्वर्य भोगीत होते त्यांना समाधिकाळीं वृत्तिक्षोभाची पीडा कोठून होणार? भोगतेपणाच्या कल्पनेंविवाय निरतिशय आनंद भोगीत ते समाधीस बसले. "बाहेर पद्मासन रचुनी। उत्तराभिमुख बैसोनी। जीवीं सुख सूनी। कर्मयोगाचें ॥९२॥ आंतु मिनलेनि मनोधर्में। स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें। आपोआप संभ्रमें। मिळावया ॥९३॥ (ज्ञाने० अ० ८) अशा थाटांत श्रीज्ञानेश्वरमहाराज समाधीस बसले. देव आणि निवृत्तिनाथ बाहेर आले व

' घातियेली शिळा समाधीशी. ' सर्व संतांनीं समाधीवर सुमनें वाहिलीं. नामदेवांनीं प्रेमपडिभरानें पूजा केली. नऊ दिवस संतांनीं समाधीजवळ, श्रीसिद्धलिंगासमोर कीर्तनमहोत्सव केला. मार्गशीर्ष शुद्ध दशमीस भोजन-समारंभ झाला. त्रयोदशीस संत आपापल्या गांवीं गेले व श्रीज्ञानेश्वर ब्रह्मबोधानें स्थिरसुख पावते झाले. ज्ञानेश्वरमहाराजांच्या समाधीचा महोत्सव दरसाल आळंदीस होत असतो. तुकाराममहाराजांनंतर तो जरा मंदावला होतां तो हैबतरावबावांनीं पुन्हां वाढविला.

८. ज्ञानेश्वरमहाराजांनीं समाधि घेतल्यानंतर सोपानदेव, चांगदेव, मुक्ताबाई व निवृत्तिनाथ यांनीं एक वर्षाच्या अवकाशांतच आपलें अवतारकृत्य संपविलें. ज्ञानेश्वरमहाराजांचा वियोग झाल्यापासून हे बहुतेक संत तीर्थयात्रा करीत व एकमेकांच्या संगतींत ब्रह्मसुखाचा अनुभव घेत हिंडत होते. सोपानदेवांनीं सर्वांच्या आधीं देह ठेवण्याचा निश्चय केला. सिंहगड उर्फ कौंडिण्यगड पुण्याहून १२ मैलांवर आहे. त्याच्या पायथ्याशीं जुनाट देऊळ आहे. त्या ठिकाणीं ह्या संतांनीं कांहीं दिवस वस्ती केली व नंतर इंद्रनीळ पर्वत उर्फ पुरंदरगडासमीप कऱ्हाडतीरीं असलेल्या संवत्सर ग्रामीं म्हणजे **सासवडगांवीं** ते आले व तेथें **मार्गशीर्ष वद्य १३ स नामघोषाच्या गजरांत सोपानदेवांनीं देह ठेविला.** तेथें कांहीं दिवस राहून ही संतमंडळी फिरत फिरत पुण्यस्तंभ उर्फ पुणतांबें मुक्कामीं आली. ज्ञानदेवानंतर लवकरच सोपानदेव समाधिस्थ झाले हें पाहून नाशिवंत देहाचा कंटाळा मानून 'मार्ग हा मोकळा झाला आम्हां' असा मुक्ताबाईनें विचार केला. मुक्ताबाई देहावर फारच उदास झाल्या हें पाहून चांगदेवानें त्यांच्या आधीं आघाडी मारली व पुणतांबें हें गोदातीरीं असून जुनाट क्षेत्र असल्यामुळें तेथेंच देह ठेवण्याचा चांगदेवानें निश्चय केला. समाधि घेण्याचा चांगदेवांनीं विचार केला त्या वेळचे त्यांचे उद्गार नामदेव सांगतातः—

१

**चवदाशें वर्षें शरीर केलें जतन । नाहीं अज्ञानपण गेलें माझें ॥ १ ॥**

अहंकारें माझें बुडाविलें घर । झालों सेवाचोर स्वामीसंगें ॥ २ ॥
अभिमानें आलों श्रीअलंकापुरीं । अज्ञान केलें दूरी मुक्ताईनें ॥ ३ ॥
नामा म्हणे योगदुःखाचें शरीर । काय याचा घोर करूनीयां ४

२

कृपावंत झाली जेव्हां मुक्ताबाई । स्वरूप दिशा दाही दाखविलें॥१
पाठीं पोटीं स्वरूप केलें सद्गुरूनें । तंव अभिमान गेला माझा ॥२ ।
यांच्या उपकाराची काय वर्णूं थोरी । यांच्यासगें हरी जोडियेला ।
नामा म्हणे देवा उठा संतजन । करूं आतां स्नान गौतमीसीं ॥४॥

असो. माघ वद्य ११ चा हरिजागर व द्वादशीचें कीर्तन झाल्यावर १३ च्या दिवशीं चांगदेवांनीं समाधि घेतली व 'झांकिली समाधि संतसज्जनांनीं । तुळशीपुष्पें वरूनि वर्षताती.' पुणतांब्यास पांच दिवस उत्सव करून मंडळी निघाली, व 'निवृत्तिराज म्हणे जावें म्हाळसापुरीं । जेथें ज्ञानेश्वरी पूर्ण झाली' ह्या त्यांच्या हेतूप्रमाणें ते म्हाळसापूर म्हणजे नेवासें येथें आले. नेवाशालाच ज्ञानेश्वरी पूर्ण झाली होती, तेथें आल्यावर ज्ञानेश्वरांच्या स्मरणानें सर्वांचीं चित्तें विव्हळ झालीं.

९. नेवाशास असतांना नामदेवांनीं निवृत्तिनाथांस विनंति केली कीं, 'सहज आपण इकडे आलों आहोंत तर आतां तुमची जन्मभूमि जें आपेगांव तें आपण पाहून येऊं. तेथें तुमचे पणजे त्र्यंबकपंत यांची समाधि आहे तिचेंही अनायासें दर्शन होईल' ही विनंति त्यांनीं मान्य केली. 'मायभूमी यांची पाहूं आम्ही डोळां' ही सर्वांची उत्कंठा पाहून निवृत्तिनाथ सर्व मंडळीसह आपेगांवास गेले. आपल्या पूर्वजांची ती जन्मभूमि पाहून त्यांस व मुक्ताईस फार खेद झाला.

निवृत्तिमुक्ताईनें पाहुनि स्थळ डोळां ।
आलासे उमाळा ओसंडोनी ॥ १ ॥
तात आणि माता गेलीसे येथूनी ।
तेव्हां आम्ही लहान पांडुरंगा ॥ २ ॥

**निवृत्ति ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न ।**
**सांभाळी सोपान मजलागीं ॥ ३ ॥**
**तुझ्या योगें हरी क्रमियेलें काळा ।**
**फुटलासे मेळा तापसांचा ॥ ४ ॥**
**नामा म्हणे यांचें कळवळलें मन ।**
**करी समाधान पांडुरंग ॥ ५ ॥**

आपेगांवास आल्यावर मुक्ताईला आपलें बाळपण स्मरलें. लहानपणीं आईबाप आम्हांला टाकून बद्रिकाश्रमीं गेल्यावर निवृत्ति व ज्ञानेश्वर हे कोरान्नभिक्षा मागण्यास गेले म्हणजे सोपानदेवानें आपणास सांभाळावें. ते दिवस आठवले व आतां ते ज्ञानेश्वरही नाहींत व सोपानही नाहींत, आतां आमचा 'तापसांचा मेळा फुटला' म्हणून मुक्ताबाईला रडूं कोसळलें. ज्ञानेश्वरादि भावंडांची ती मायभूमि 'बहुत सन्मानिली वैष्णवांनीं.' कांहीं दिवस तेथें राहून हा तापसांचा मेळा वेरुळास घृष्णेश्वराच्या दर्शनास गेला. वेरुळची यात्रा यथासांग झाली. आपेगांव सोडल्यापासून मुक्ताबाईच्या मनांत निराळेच विचार येऊं लागले. नामदेव म्हणतातः—

**मुक्ताई उदास झाली असे फार ।**
**आतां हें शरीर रक्षूं नये ॥ १ ॥**
**त्यागिले आहार अन्नपाणी सकळीं ।**
**निवृत्तिराज तळमळीं मनामाजीं ॥ २ ॥**

१०. मुक्ताईची उदासीनता वाढत चालली तेव्हां ही आतां फार दिवस देह ठेवीत नाहीं असें निवृत्तिराजांस कळून चुकलें. तिला मध्यभागीं घेऊन सर्वांनीं चालावें. 'वेधली चित्तवृत्ति स्वरूपीं निमग्न । नाहीं देहभान मुक्ताईला' असे ते मार्ग क्रमीत असतां तापीतीरास आले. वैशाखाचा महिना असल्यामुळें ऊन रखरख करीत होतें. उन्हाळा फार वाढूं लागला. दोहीं थडीं पताकांचे भार दिसत होते. वैष्णवांचा समुदाय मोठा मिळाला होता. तरुवर फुलले होते. आंत दूर्वादर्भ उगवले होते. करंजजांभळींचा थाट लागून राहिला होता. आंब्याचे वृक्ष उंच उंच होते.

कोकिळा, मयूर तेथें पुष्कळ होते. रानकेळी, सिताफळी, रामफळी यांचीं झाडें पुष्कळ होतीं. नाना वर्णांचीं कमळें व रुणझुण करणारे भ्रमर पाहून त्या वैष्णवांना मोठा आनंद झाला. 'धन्य महत् नगर धन्य सोमेश्वर। धन्य तापीतीर योगियांचें' असें त्यांस वाटून त्या एकांतस्थळीं ते रमले. महत् नगर म्ह० माणेगांव हें एदलाबादेहून दोन मैलांवर आहे. त्या ठिकाणीं राहत असतांना एके दिवशीं निवृत्तीनें एकांतांत गंगधारेजवळ मुक्ताईला तिच्या ब्रह्मभावाचें स्मरण दिलें; तेव्हां 'मुक्ताबाई म्हणे जावें यावें कोठें ?। अवघें निघोट स्वरूप स्वामी।'

**उदय आणि अस्तु नाहीं स्वरूपासीं।**
**ऐसें मुनि ऋषी जाणताती ॥ १ ॥**
**आम्हीं कधीं आलों स्वरूप सोडोनी।**
**जावें पालटोनी जेथिल तेथें ! ॥ २ ॥**
**अंतरबाहेर स्वामींचें स्वरूप।**
**स्वयें नंदादीप उजळला ॥ ३ ॥**

असें म्हणून स्वरूपाकारस्थितींत मुरून गेलेल्या असतां आकाश गर्जून विजेचा प्रचंड कडकडाट झाला व मुक्ताबाई सहज स्वरूपीं मिळोन गेल्या. स्वसांप्रदायानुसार पिंडीं पिंडाचा ग्रास करून मुक्ताबाई जेथल्या तेथें सदेह अदृश्य झाल्या. 'एक प्रहर झाला प्रकाश त्रिभुवनीं। जेव्हां निरंजनीं गुप्त झाली.' तो दिवस **वैशाख वद्य द्वादशी** हा होय. मुक्ताई डोळ्यांनीं न पाहतांच एकाएकीं गुप्त झाली म्हणून सकळांच्या चित्ताला कळवळा आला. 'होती ऐसी नाहीं झाली मुक्ताबाई। संत ठायीं ठायीं स्फुंदताती।' तें स्थळ रम्य होतें म्हणून तेथें संत एक महिनाभर राहिले. मुक्ताबाई गुप्त झाल्या तेथून २ मैलांवर त्यांचें देऊळ बांधलें आहे. निवृत्तिनाथ चारी भावंडांत वडील असून ते सर्वांच्या मागून गेले. त्यांचें रंजन व्हावें म्हणून वारकरी टाळमृदंग वाजवून गायनादि प्रकारांनीं व गीतार्थनिरूपणांनीं प्रयत्न करीत, तथापि—

ज्ञानराजें आमुचे निववीले डोळे ।
आतां ऐसे खेळे कोणी नाहीं ॥ १ ॥
ऐकावा हा अर्थ मुक्ताईच्या मुखीं ।
आतां ऐसो सखा नाहीं कोणी ॥ २ ॥
आविट बोलणें बोलावें अनादि ।
जें गुह्य वेदीं सांपडेना ॥ ३ ॥
कीर्ति आणि वैराग्य केलें सामराज्य ।
गुरुवासी लाज नाहीं आली ॥ ४ ॥
नाशिवंत शरीर केलें अविनाश ।
घडविला विलास अध्यात्मींचा ॥ ५ ॥
आविट बोलणीं आठवती मनीं ।
आतां त्रिभुवनीं दिसेनात ॥ ६ ॥
... ... ... ...
जेष्ठाच्याही आधीं कनिष्ठाचें जाणें ।
केलें नारायणें उफराटें ॥
उफराटें फार कळलें माझे मनीं ।
वळचणींचें पाणी आढ्या आलें ! ॥
... ... ... ...

इत्यादि उद्गार निवृत्तिनाथांच्या मुखांतून निघालेले पाहून नामदेवांस वाटलें कीं आतां हेही फार दिवसांचे सोबती नाहींत. ज्ञानेश्वरांच्या सहवासांत जो आनंद त्यांनीं भोगला त्याचें स्मरण करीत 'देहा आधीं गेला प्राण माझा' असें जेव्हां निवृत्तिनाथ म्हणाले तेव्हां सर्व संतांचे नेत्र पाण्यानें भरून आले. निवृत्तिनाथ यांना गहिनीनाथांनीं जें रहस्य सांगितलें होतें तें त्यांनीं आपल्या सर्व भावंडांस व चांगदेवविसोबाखेचर इत्यादिकांस वांटून दिलें होतें. निवृत्तिनाथ सर्व संतमंडळीसह परतले व वाटेंत सप्तशृंगीच्या डोंगराला प्रदक्षिणा घालून व देवीचें दर्शन घेऊन त्र्यंबकेश्वरास आले आणि तेथें निवृत्तिनाथांनीं ज्येष्ठ वद्य १२ स देह ठेविला. निवृत्तिनाथांनीं देह ठेवल्यावरः—

लोपलासे भानु पडला अंधार ।
गेला योगेश्वर निवृत्तिराज ॥ १ ॥
गेल्या त्या विभूती अनादि अवतार ।
आतां देवा! फार आठवतें ॥ २ ॥
नामा म्हणे हरी धरवेना धीर ।
येतो गहिंवर वासंडोनी ॥ ३ ॥

त्र्यंबकेश्वरास कांहीं काळ राहिल्यावर नामदेव आपल्या मुलांबाळांसह पंढरीस गेले व सर्व संत आपापल्या गांवीं गेले. शके १२१८ च्या कार्तिकापासून तों शके १२१९ च्या ज्येष्ठापर्यंत सतत आठ महिने ही संतमंडळी एकत्र राहून परस्परसंगतिचें सुख भोगीत व प्रेमसुख देत घेत फिरत होती. कार्तिकांत ज्ञानेश्वरमहाराजांनीं समाधि घेतल्यावर मार्गशीर्षांत सोपानदेव, माघांत चांगदेव, वैशाखांत मुक्ताबाई व ज्येष्ठांत निवृत्तिनाथ आटोपले व याप्रमाणें अवघ्या आठ महिन्यांत हीं पांच नररत्नें हा क्षणभंगुर मृत्युलोक सोडून गेलीं आणि परब्रह्मीं मिळालीं.

११. ते योगी तर गेलेच पण त्यांच्या समाधि राहिल्या. "गेले योगिराज अनादि जे आधी । राहिल्या समाधि जगामाजी." त्यांच्या समाधींच्या ठिकाणीं अद्याप मोठमोठ्या यात्रा भरतात. ज्ञानेश्वरमहाराजांनीं कार्तिक वद्य १३ ला समाधि घेतली व अद्याप वद्य ११ ला जमणारी यात्रा वद्य १३ ला त्यांच्या समाधिमहोत्सवाचा समारंभ पाहून आणि कीर्तन व काला करून नंतर निवृत्त होते. सोपानदेवांची समाधि मार्गशीर्ष वद्य १३ ला असून तत्प्रीत्यर्थ भरणारी यात्रा मात्र सासवडास वैशाख शुद्ध ११ ला भरते. चांगदेवांची समाधि माघ वद्य १३ ला झाली असून त्याच दिवशीं तापीतीरीं चांगदेवांची जन्मभूमी जी 'चांगदेव' त्या गांवीं तत्प्रीत्यर्थ मेळा भरतो. मुक्ताबाई वैशाख वद्य १२ ला गुप्त झाल्या म्हणून त्याच दिवशीं त्यांच्या गुप्त होण्याच्या ठिकाणीं एदलाबादेस मोठा समुदाय भजनकीर्तनादि करण्यास जमतो. निवृत्तिनाथांची समाधि ज्येष्ठ वद्य १२ ला होती, तथापि तेथें यात्रा तन्निमित्त पौष वद्य ११ ला भरत असते. याप्रमाणें श्रीज्ञानेश्वर-

महाराज, चांगदेव व मुक्ताबाई यांच्या तिथी बरोबर पाळल्या जातात व सोपानदेव आणि निवृत्तिनाथ यांच्या यात्रा समाधीच्या दिवशीं भरत नसून पुढें मागें भरतात. याचें कारण वारकऱ्यांनीं पुढें आपल्या सोयीसाठीं यात्रा भरविण्याचे दिवस निराळे ठरविले हें होय. ज्येष्ठ वद्यांत निवृत्तिनाथांची पुण्यतीथ करून लगेच आषाढीच्या वारीसाठीं पंढरीस जाण्यास पुरते पंधरा दिवसही रहात नाहींत; व हे दिवस त्र्यंबकेश्वराहून पंढरीस जाण्यास पुरत नाहींत; शिवाय ज्येष्ठ वद्य ११ ला त्र्यंबकेश्वरास पाण्याची रम्वाईही असते. या कारणांसाठीं तेथील यात्रा त्यांनीं पौषांत भरविण्याचा प्रघात पाडला. असाच कांहीं प्रकार सोपानदेवांसंबंधींच्या यात्रेचा आहे. सोपानदेवांला वारकरी प्रेमानें सोपानकाका किंवा नुसते काका म्हणून संबोधितात याप्रमाणें हें ज्ञानेश्वरपंचक सुमारें ८ महिन्यांच्या अवकाशांत अदृश्य झालें, तथापि त्यांच्याविषयींचा महाराष्ट्रमंडळाचा प्रेमा अद्यापि पहिल्यासारखा कायम आहे.

१२. ज्ञानेश्वरमहाराजांच्या मागून त्यांचे समकालीन संत समाधिस्थ झाले, ते पुढील अनुक्रमाप्रमाणें झालेः—

१ विसोबा खेचर यांची समाधि—शके १२३१, सौम्यनाम संवत्सर, श्रावण शुद्ध ११.

२ नरहरि सोनार यांची समाधि—शके १२३५, प्रमाथी संवत्सर, माघ कृष्ण १.

३ बंका महार यांची समाधि—शके १२४०, कालयुक्त संवत्सर, माघ शुद्ध १५.

४ जनमित्रांची समाधि—शके १२५२, प्रमोद संवत्सर, कार्तिक शुद्ध ११.

५ चोखामेळ्यांची समाधि—शके १२६०, बहुधान्य संवत्सर, वैशाख कृष्ण ५.

६ नामदेवांची समाधि—शके १२७२ विकृत संवत्सर, आषाढ कृष्ण १३.

ज्ञानदेवादि चाऱ्ही भांवडें अगदीं अल्पकाळ चमकून गेलीं. सर्वांच्या आधीं जन्मून सर्वांच्या मागून समाधिस्थ झालेले निवृत्तिनाथ समाधिकाळीं केवळ २४ वर्षांचे होते ! बाकीचे संत दीर्घायु होते, हें वरील समाधिशकांवरून उघड होते. नामदेवराय सर्वांत जास्त दीर्घायु होते. समाधिकाळीं त्यांचें वय ८० वर्षांचें होतें म्हणजे ज्ञानेश्वरांच्या समाधिकालानंतर ते चांगले ५४ वर्षें हयात होते. हें सारें देहाच्या बाजूनें पाहणें आहे. ब्रह्मनिष्ठांचें आयुष्य कोणीं मोजावें ? दिक्कालाद्यनवच्छिन्न जें चिन्मात्र तद्रूप झालेले जे संत तेही दिक्कालाद्यनवच्छिन्नच आहेत ! दिशा व काल यांचा अवच्छेद तेथें लागत नाहीं. म्हणून उत्तरायण व शुक्लपक्ष मरणकाळाला प्रशस्त आणि दक्षिणायन तसा नाहीं इ० विचार ब्रह्मनिष्ठांच्या बाबतींत करायचा नाहीं. जे मरणालाच गिळून राहिलेले असतात त्यांच्या देहपाताची मोज कोणी व कसची करायची ? ते मरणाही आधीं मरून अजरामर झालेले असतात. ज्ञानेश्वरमहाराजांनींच म्हटलें आहेः—"आतां शरीराचे तयांचिया ठायीं । आडनांवही उरलें नाहीं । तरी कोणें काळें काई । निमे तें पाहे पां ॥ २५१ ॥ मग मार्गातें कासया शोधावें ? । कोठें कोठोनि कें जावें ? । जरी देशकाळादि आघवें । आपणचि असे ॥ २५२ ॥ आणि हां गा घट जे वेळीं फुटे । ते वेळीं तेथिचें आकाश लागे नीट वाटे । वाटा लागलें तरी गगना भेटे । येरवीं चुके ? ॥२५३॥ ऐसिया बोधाचेनि सुरवाडें । मार्गामार्गाचें सांकडें । तया सांइसिद्धा न पडे । योगियांसीं ॥ २५५ ॥ मग भलतेव्हां । देह असो जावो अथवा । परी अबंधा नित्य ब्रह्मभावा । विघड नाहीं" ॥ २५७ ॥ ( ज्ञानेश्वरी अ० ८ ).

१३. ज्ञानेश्वरादि भावंडें समाधिस्थ झाल्यावर नामदेवांस अगदीं करमेना. त्यांच्या संगसुखांत कांहीं वर्षें त्यांनीं काढलेलीं असल्यामुळें त्या प्रेमळास त्यांच्या मूर्ति वारंवार डोळ्यांपुढें दिसाव्यात. एकदां नामदेवांनीं देवाशीं हट्ट घेतला कीं, 'ज्ञानेश्वर जिवंत समाधि घेऊन बसले असले तरी त्यांच्या दर्शनासाठीं माझा जीव भुकेलेला आहे, तर कसेंही करा पण

मला ती दिव्य मूर्ति फिरून एकवार डोळभर पाहूं द्या!' नामदेवासारख्या लाडक्या भक्ताचे हट्ट देवानें पुरवावयाचे नाहींत तर कोणीं पुरवायचे ? देवांनीं त्याला पुष्कळ सांगितलें कीं, 'तुझा आत्मा तोच ज्ञानेश्वर, ज्ञानेश्वर व मी दोन नाहीं,' तथापि त्यानें नामदेवरायांचें समाधान होईना; त्यांनीं उलट 'तुमचें ब्रह्मज्ञान पोटीं ठेवा, मला माझा जीवाचा विसांवा तो संत प्रत्यक्ष भेटवा म्हणजे झालें' असा हट्ट धरिला. तो प्रसंग प्रेमरसानें कसा पूर्ण भरलेला आहे ! त्या वेळचा नामदेव व देव यांचा संवाद पहा !:—

**नामा म्हणे देवा ज्ञानदेव सृष्टीं । पडेल कां दृष्टी पुन्हां आतां ॥१॥**
**ज्ञानाचा वियोग जडला हृद्रोग । भेटीचा प्रयोग करा देवा ॥ २ ॥**
**ज्ञानदेव माझा दाखवा या वेळीं । जीव तळमळी त्याच्यावीण ३॥**
**संत अंतरला सखा झाला दूर । आतां पंढरपूर कैसें करूं ? ॥ ४ ॥**

... ... ... ... ... ...

**ज्ञानदेव माझें सौख्यसरोवर । त्यांत जलधर स्वस्थ होतों ॥ १ ॥**
**दुर्दैवतापानें आटलें तें नीर । वर्षो रघुवीर कृपामेघ ॥ २ ॥**
**ज्ञानदेवावीण व्याकुळ हे प्राण । तूं जगज्जीवन देवा होसी ॥ ३ ॥**

... ... ... ... ... ...

**नामा हें वदतां डोळ्यां आलें पाणी । पडला धरणी देवापुढें ॥१॥**

... ... ... ... ... ...

**देव म्हणे नाम्या पाहे । 'ज्ञानदेव मीच आहें ॥ १ ॥**
**तो मी नाहीं दुजा । ज्ञानदेव आत्मा माझा ॥ २ ॥**
**माझ्या ठावीं ठेवीं हेत । सोड खंत, खंडी द्वैत ॥ ३ ॥**
**नामा उमज मानसीं । ऐसें म्हणे हृषीकेशी ॥ ४ ॥**

... ... ... ... ... ...

**आत्मरूपीं ज्ञानेश्वर । तोचि ज्ञानाचा सागर ॥ १ ॥**
**ज्ञानदेवीं धरीं भाव । स्वयें होसी तूंचि देव ॥ २ ॥**

... ... ... ... ... ...

पण हा निर्गुणबोध त्या सगुणभक्ताला, त्या प्रेममूर्ति नामदेवाला पटला नाहीं. 'माझा ज्ञानेश्वर मला भेटवा' हा त्याचा छंद कांहीं सुटेना:—

नामदेव म्हणे देवा । ब्रह्मज्ञान पोटीं ठेवा ॥ १ ॥
तुम्ही मायेसंगें गूढ । ज्ञान जाणिवेचें आड ॥ २ ॥
आम्हां नाहीं याची चाड । वाटे संतभेटी गोड ॥ ३ ॥
संतभेटी प्रेम फांवे । प्रेमें देवासी भेटावें ॥ ४ ॥
नामदेवाठायीं प्रेम । मार्गीं आडविलें ब्रह्म ॥ ५ ॥

... ... ... ... ... ...

देई भक्तिरसप्रेमा । देवा घालीं आम्हां जन्मा ॥ १ ॥
प्रेम येई हातां जरी । जेथ नांदू ती पंढरी ॥ २ ॥
ज्ञानदेवीं भेट द्यावी । ज्ञानगोष्टी कां सांगावी ॥ ३ ॥
नामा न बुझवा जनीं । कोण नाचेल कीर्तनीं ? ॥ ४ ॥
पुरवा नामयाच्या आर्ता । देवा सांगे जगन्माता ॥ ५ ॥

नामदेवांच्या तर्फे हा वकील आणखी भेटल्यावर मग काय विचारा" यचें आहे ? नामदेवाची आर्त पुरविणें देवाला भाग पडलें. ज्ञानेश्वरांचें साक्षाद्दर्शन नामदेवांस झालें.

ज्ञानदेव पाहतां डोळां । नामदेवा हर्ष झाला ॥ १ ॥
घट्ट धरियेले पाय । तूं तो झाला सद्गुरुराय ॥ २ ॥
नको करूं रे अव्हेर । मज नको धरूं दूर ॥ ३ ॥
नाथा नकोरे अंतरूं । तुझ्या कांसेचें वासरूं ॥ ४ ॥

ज्ञानेश्वरांलाही नामदेवाबद्दल प्रेम आलें:—

हरीचिया दासा नामया उदासा ।
तुझो हृषीकेशा प्रीति बहू ॥ १ ॥
हरिदासांमाजी होसी तूं आगळा ।
प्रेमाचा पुतळा नामदेव ॥ २ ॥
ज्ञानदेव म्हणे तूं विठोचा लडिवाळ ।
नामया तूं कृपाळ आम्हांवरी ॥ ३ ॥

नामदेवांची आर्त पूर्ण झाली. नामाला ज्ञान भेटलें ! नाम व ज्ञान यांची मैत्री अभेद्य आहे. नाम आणि ज्ञान यांच्या भेटींत देव प्रकट

होतो. नाम, ज्ञान व देव हे शब्द तीन आहेत, पण या तीन शब्दांत एक पांडुरंगच भरला आहे! नामाचा हट्ट ज्ञानाची भेट होण्याचा, आणि तो पुरविणें देवाला भाग आहे. नामाला देवच ज्ञान भेटवितो! नामापाशीं देव व देवापाशीं ज्ञान. नाम तेंच ज्ञान व तेंच देव. ज्ञानदेव व नामदेव हे साध्या देवाहूनही थोर आहेत. सत्, चिद्, व आनंद ह्या तीन पदांत जसा एकच परमात्मा भरला आहे, " कांति काठिण्य कनक। तिन्ही मिळोनि कनक एक। द्राव गोडी पीयूख। पीयूखचि जेंवी॥"—अमृतानुभव (५—२) ह्याप्रमाणें एकरूपानें सतत नांदणाऱ्या ज्ञान, नाम व देव या त्रिपदांनीं वाच्य जो पांडुरंग त्याला नमन असो.

———

# ९ उपासना आणि गुरुभक्ति.

संसारा ऐसा दारुण । जो भेटलाचि हरी शिण ।
तो ज्ञानदानीं सकरुण । भजिजे गुरु ॥ २०८ ॥

—ज्ञानेश्वरी अ० १७.

१ नाथपरंपरेची व ज्ञानेश्वरमहाराजांची योगनिष्ठा. २ भक्तिपंथाचा स्वीकार. ३ श्रीकृष्णोपासना. ४ साधनश्रेष्ठ गुरुभक्ति. ५ 'धर्म जागो निवृत्तीचा.' ज्ञानेश्वरींतले गुरुभक्तीचे उल्लेख. ६ 'ज्ञानदेव म्हणे तरलों तरलों.' ७ गुरुकृपा. ८ श्रीगुरूचें महिमान. ९ गुरुकृपादृष्टि. १० आचार्योपासना उर्फ गुरुसेवा. ११ ब्रह्मवस्तु, ब्रह्मबोधक गुरु व बोध्य शिष्य यांच्यांतलें ऐक्य. १२ श्रीचरणाची मानसपूजा. १३ चित्सूर्यश्रीनिवृत्तिप्रसाद. १४ गुरुगणेंद्र. १५ 'स्तुति कांहीं न बोलणें !' १६ गुरुकृपावैभव अमृतानुभवांतले गुरुभक्तीचे उल्लेख. १७ निवृत्तिस्वरूप गुरुशिष्य यांची एकरूपता.

१. निवृत्तिनाथांस गैनीनाथांपासून जी उपासना मिळाली ती त्यांनीं ज्ञानेश्वरांस दिली. आदिनाथापासून गैनीनाथांपर्यंत जी परंपरा चालत आली ती मुख्यतः योगमार्गासंबंधानें होती. हे सर्व नाथ योगेश्वर होते पण निवृत्तिनाथांनीं आपल्या गुरूंच्या आज्ञेवरून श्रीकृष्णोपासना आपल्या भावंडांस दिली व तेथपासून महाराष्ट्रांत भागवतसंप्रदायाचा उर्फ भक्तिपंथाचा प्रसार झाला. योगाची परंपरा ज्ञानेश्वरमहाराजांच्या द्वारें पुढेंही चालली, पण त्यांना महाराष्ट्रांतले भागवतसंप्रदायाचे आद्य प्रवर्तक असेंच म्हटलें पाहिजे. ते योगांत कांहीं कमी नव्हते. रेड्याकडून वेद बोलविणें, जड भिंत चालविणें इत्यादि चमत्कार त्यांनीं योगबलावरच करून दाखविले. त्यांनीं आपली योगविद्या सत्यामलनाथनामक एका शिष्यास दिली व त्याच्याच पुढच्या परंपरेंत शिवदिनकेसरी हे झाले. ज्ञानेश्वरमहाराजांनीं

ज्ञानेश्वरींत सहाव्या अध्यायांत १२ ते १६ श्लोकांवर जी टीका केली आहे ती योगप्रधान आहे. तेथें आचार्यांनींही योगसंबंध दाखविला नाहीं तरी महाराजांनीं आपल्या योगानुभवाचा केवळ पाऊस पाडला आहे. कुंडलिनी जागृत करण्याचा मार्ग व कुंडलिनीचें बहारीचें विस्तृत वर्णन देऊन त्यांनीं कांहीं सिद्धींबद्दल आपला अभिप्रायही स्पष्ट दिला आहे. ते म्हणतात:—

**मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गींचा आलोच आइके ।**
**मनोगत ओळखे । मुंगियेचें ॥ २६९ ॥**
**पवनाचा वारिका वळंघे । चाले तरी उदकीं पाउल न लागे**
**येणें येणें प्रसंगें । येती बहुता सिद्धी ॥ २७० ॥**

अशा अनेक सिद्धि ज्ञानेश्वरांच्या पायीं लोळत होत्या तरी त्यांनीं जगदुद्धाराचा जो राजमार्ग पाडला त्यांत योगाचें व सिद्धींचें प्राबल्य ठेविलें नाहीं. योगबलानें चवदाशें वर्षें जगलेला चांगदेवसुद्धां आत्मप्राप्तीविषयीं विन्मुख राहिलेला त्यांच्या डोळ्यांसमोर होता. केवळ योगाचा परमार्थाला कांहीं विशेष उपयोग होत नाहीं असें जाणून त्यांनीं "योग याग विधी येणें नोहे सिद्धी । वायांचि उपाधि दंभ धर्म" असें म्हटलें आहे. योगशास्त्र खोटें नाहीं, सिद्धी खोट्या नाहींत, पण आत्मप्राप्तीला त्यांचा कांहीं उपयोग नाहीं, किंबहुना त्या विघ्नभूत आहेत भागवतधर्मांत योगसिद्धींची विशेष मातब्बरी नाहीं. योगाची नुसती कवाईत हरीची जोड करून देणारी नाहीं. भागवताच्या ११ स्कंधांतल्या १५ व्या अध्यायांत सिद्धींचें विस्तृत वर्णन केलेलें असून शेवटीं ( श्लोक ३२–३५ ) सांगितलें आहे कीं, "जितेंद्रिय व भगवद्ध्यानरत अशा पुरुषाला कोणतीही सिद्धि दुर्लभ नाहीं, तरी उत्तम योगाभ्यास करणाऱ्याला ( उत्तम योग म्हणजे जीवपरमात्म्यांचें ऐक्य होय. ) ह्या सिद्धि अंतरायभूत आहेत व त्यानें त्यांची इच्छा करूं नये; शिवाय भगवंताशीं तन्मय होऊन जाणाऱ्याला तर ह्या सिद्धी व्यर्थ कालक्षपणहेतु म्हणजे वेळ मोडण्याला मात्र कारण होतात, तस्मात् सर्व

सिद्धींचा पति, योग, ज्ञान व मोक्ष यांचा स्वामी साक्षात् श्रीहरि असल्यामुळें त्याला सर्व भावानें शरण जावें." 'अंतराया वदंत्येता युंजतो योगमुत्तमम्' ह्याच भागवतांतल्या सिद्धांताप्रमाणेंच संतांचा अनुभव आहे. वरील प्रकरणांत नाथ म्हणतातः—

**माझें स्वरुप शुद्ध अद्वैत। तेथ सिद्धींचे जे मनोरथ।**
**ते लोकरंजन समस्त। नाहीं परमार्थ सिद्धींमाजीं॥ १॥**
**अहेतुक करितां माझें भजन। तेणें शीघ्र माझी प्राप्ती जाण।**
**तेथें सिद्धींदरी घालितां मन। आली नागवण मत्प्राप्तीसी २**
**सकळ योगांचें योगगव्हर। वेदांतनिजभांडार।**
**सकळ सिद्धींचें परमसार। भक्ति साचार हरीची॥ ३॥**

२. योग, कर्म, वेदांत ( ज्ञान ) यांनीं साध्य जो श्रीहरी त्या हरीच्याच ठिकाणीं परम प्रेम ठेवून त्याच्या नामस्मरणांत अखंड रंगून जाणें व सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवणें हा मुख्य भागवतधर्म आहे व याचाच उपदेश गैनीनाथांनीं निवृत्तिनाथांस व त्यांनीं ज्ञानेश्वरमहाराजांस केला आहे. सर्व नाथ केवळ योगी होते व त्यांना अध्यात्माचें किंवा भक्तीचें अंग नव्हतें असें म्हणणें धाडसाचें व असत्य होईल; तथापि पूर्वींच्या नाथांचा योगावर जसा मुख्य भर होता तसा निवृत्तिनाथांचा व त्यांच्या शिष्यप्रशिष्यांचा भक्तीवर व नामस्मरणावर मुख्य भर राहिला. योगप्रक्रिया फार थोड्यांस साधण्याजोगी असल्यामुळें योग्याला योग्य शिष्य एखाद दुसराच मिळायचा तसा भक्तिमार्गाचा प्रकार नसून भक्तिमार्ग जाणते व नेणते, लहान व थोर, पुण्यवंत व पापी, प्रज्ञावंत व मूढ ह्या सर्वांसच तारक आहे. भगवंतांनीं गीतेंत अर्जुनास व भागवतांत उद्धवास भक्तिमार्गच अत्यंत श्रेयस्कर म्हणून सांगितला आहे, व ह्या ग्रंथांस हातीं धरून भक्तमंडळानें गेल्या आठशें वर्षांत भरतखंडभर भक्तिपंथाचा जयजकार केला आहे.

३. निवृत्तिनाथांचें व त्यांच्या भावंडांचें मुख्य उपास्य 'श्रीकृष्ण' म्हणजेच पंढरीचे 'रुखमादेवीवर विठ्ठल' हे होते. ह्यासंबंधानें त्यांच्याच

उक्ति प्रमाणादाखल देतों. " निवृत्तीचें ध्येय कृष्ण हाची होये । गयनिनाथें सोय दाखविली, " " निवृत्तीचें धन गोकुळीं श्रीकृष्ण । क्षादव सहिष्णु हरि माझा " इत्यादि उद्गार निवृत्तिनाथांच्याच अभंगांत सांपडतात. " कृष्णाचीया पंथें चालिलों दातारा " असें सोपानदेव एका अभंगांत म्हणतात. " मुक्ताई तारक सम्यक विठ्ठल । निवृत्तीनें चोखाळ दाखवीलें " असें मुक्ताबाईनींही म्हटलें आहे. ज्ञानोबारायांच्या अभंगांत योगाच्या खुणांचे कांहीं अभंग आहेत, तरी कृष्णपर म्हणजे विठ्ठलपर अभंगच पुष्कळ अधिक आहेत. निवृत्तिनाथांच्या ३५० अभंगांत बहुतेक अभंग कृष्णप्रेमानें ओथंबिलेलेच आहेत. त्यांचा सांप्रदायिक अभंग मागें तिसऱ्या प्रकरणांत (पृष्ठ ५१) दिला आहे त्यांत 'कुळ हें पावन कृष्णनाम' असें त्यांनीं म्हटलें आहे; दुसऱ्या एका ठिकाणीं "निवृत्तिचें गोत्र कृष्णनामें तृप्त । आनंदाचें चित्त कृष्णनामें " असें म्हटलें आहे.

ज्ञानेश्वरानीं आपल्या कृष्णभक्तीस अनुसरून कृष्णगीत उर्फ भगवद्गीता प्राकृतजनांच्या उद्धारार्थ मराठी भाषेंत सांगितली व कृष्ण म्हणजे रखमादेवीवर विठ्ठल याचें मुख्य क्षेत्र जें पंढरपूर तेथें वारंवार वाऱ्या करून विठ्ठलनामाचा जयघोष केला व करविला, आणि महाराष्ट्रांत भागवतधर्म पिकविला. निवृत्तिनाथांचे यासंबंधानें उद्गार पाहूं याः—

**प्राणिया उद्धार सर्व हा श्रीधर । ब्रह्म हे साचार कृष्णमूर्ती ॥ १ ॥**
**तें रूप भीवरें पांडुरंग खरें । पुंडलीकनिर्धारें उभें असे ॥ २ ॥**
**युग अठ्ठावीस उभा हृषीकेश । पुंडलीक सौरस पुरवीत ॥ ३ ॥**
**निवृत्तीचें गूज पांडुरंग बीज । विश्वजनकाज पुरे कोडें ॥ ४ ॥**

गैनीनाथानीं निवृत्तिनाथांस कृष्णप्रेमाचें बीज सांगितलें व त्यांस त्यांचे परम गुरु गोरक्षनाथ यांनींही आशीर्वाद दिला. गोरक्षनाथांचें साक्षाद्दर्शन निवृत्तिनाथांस झालें असेंः—

**निवृत्ति गयनीदेवें उपदेशिला सर्व ।**
**गोरक्ष गुह्यभाव सांगति मज ॥ ६ ॥**

ह्या त्यांच्या अभंगांतील वरील पादावरून वाटतें. जो 'रामकृष्ण' मंत्र निवृत्तीस मिळाला तोच त्यांनीं शिष्यद्वारां जगास सांगितला आहे. नामस्मरणावांचून उद्धाराचा दुसरा मार्ग नाहीं:—

**रामकृष्ण मंत्र जनासी उद्धार ।**
**आणीक साचार मार्ग नाहीं ॥ १ ॥**

असें त्यांनीं अनेक प्रेमळ अभंगांत म्हटलें आहे. आपल्या उपदेशाप्रमाणें ज्ञानेश्वरप्रभृति शिष्यमंडळ मोठ्या आनंदानें गात नाचत पंढरीस जातात, व विठ्ठलनामाचा घोष करितात, हें पाहून निवृत्तिनाथांस आनंद वाटे. त्यांचा पुढील अभंग पहा:—

**सोपान सवंगडा स्वानंद ज्ञानदेव । मुक्ताईचा भाव विठ्ठलराज १**
**दिंडी टाळघोळ गातां विठ्ठलनाम। खेचरासी प्रेम विठ्ठलाचें ॥ २॥**
**निवृत्ति प्रगट ज्ञानदेवा सांगे । पुंडलीकसंगें हरी खेळे ॥ ३ ॥**

हीं भांवडें 'नाठवे हा दिन नाठवे हे निशी' याप्रमाणें अखंड नामजप कसा उत्कट प्रेमानें करीत हें पुढील अभंगावरून समजेल:—

**सुमनाचेनि वासें भ्रमर भुलले । मार्ग पै विसरले इंद्रियांचा ॥ १॥**
**तैसे हे संत विठ्ठलीं तृप्त । नित्य पै निवांत हरिचरणीं ॥ २ ॥**
**नाठवे हा दिन नाठवे हे निशी । अखंड आम्हांसी हरिराजा ॥३॥**
**तल्लीन प्रेमाचे कल्लोळ अमृताचे । डिंगर हरीचे राजहंस ॥ ४ ॥**
**टाहो करूं थोर विठ्ठलकीर्तनें । नामाच्या सुमनें हरि पूजूं ॥ ५ ॥**
**निवृत्ति निवांत तल्लीन पै झाला । प्रपंचअबोला हरिसंगें ॥ ६ ॥**

निवृत्तिनाथांनीं काल्याच्या अभंगांत त्या वेळचे संत विठ्ठलनामकाला एकत्र कसा प्रेमानें सेवीत तें चांगलें वर्णिलें आहे. जगद्रूपानें हरीच नटला आहे; सर्वभूतीं भगवद्भाव ठेवून अखंड 'रामकृष्णहरी' ह्या नाममंत्राचा टाहो फोडा; परनिंदा व परछल संतोषानें सोसून हरिगुण गा; नामस्मरणावांचून दुसरा तरणोपाय नाहीं; सदाचारानें वागा व हरिहरी म्हणा हाच उपदेश आपल्या सर्व अभंगांतून निवृत्तिनाथांनीं केला आहे. हा उपदेश

त्यांनीं सर्वांस केला, पण ज्ञानेश्वरमहाराजांनीं गुरुकृपेला पूर्णपात्र होऊन तो सगळाच पचविला व शतगुणित करून तो जगास दिला. ज्ञानेश्वर-महाराजांना ह्याप्रमाणें निवृत्तिनाथांपासून श्रीकृष्णोपासनेचें रहस्य प्राप्त झालें. ज्या श्रीगुरूंनीं अमोल ब्रह्मबोध करून दिला, विश्वात्मभाव उदित केला, नामामृत चाखविलें, गीताभाष्य करण्यास स्फूर्ति दिली व सर्वतोपरी आपलें ज्ञानेश्वर हें नांव अन्वर्थक केलें त्या गुरुराजाविषयीं ह्या शिष्योत्तमाची कशी भावना होती तें आतां आपण पाहूं.

४. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या चरित्रांत 'गुरुभक्ती'चें माहात्म्य विशेष आहे, ज्ञानेश्वरी ग्रंथ त्यांनीं नेवाशास श्रीगुरु निवृत्तिनाथांच्या समोर सांगितला असल्यामुळें व निवृत्तिनाथांच्या प्रसादानेंच पूर्णब्रह्मानुभव प्राप्त झालेला असल्यामुळें ज्ञानेश्वरींतलीं सर्व मंगलाचरणें गुरुभक्तीच्या अमृतरसानें ओथंबिलेलीं आहेत. गुरुकृपेनें पूर्ण बोध होऊन आपण 'तरलों' असा त्यांचा अनुभव होता व तदनुसार ब्रह्मप्राप्तीचीं गुरुप्रसादाशिवाय इतर सर्व साधनें व्यर्थ होत व ह्या एका साधनांतच सर्व साधनांची सिद्धि होते असें त्यांचें वारंवार सांगणें आहे.

गृहाश्रमत्याग, भस्मउधळण, जटाभार, जप, तप, अनुष्ठान, यज्ञदान, वेदशास्त्राध्ययन इत्यादि साधनें आहेत, पण गुरुनाथाचा पद्महस्त मस्तकावर पडल्याशिवाय निवांत होणें ( शांतिसुखाचा लाभ होणें ) नाहीं असें ते पुढील अभंगांत सांगतातः—

## अभंग.

**कां सांडिसी गृहाश्रम । कां सांडिसी क्रियाकर्म ।**
**कासया सांडिशी कुळींचे धर्म । आहे तें वर्म वेगळेंची ॥१॥**
**भस्मउधळण जटाभारू । अथवा उदास दिगंबरू ।**
**न धरी लोकांचा आधारू । आहे तो विचारू वेगळाची २**
**जप तप अनुष्ठान । क्रियाकर्म यज्ञदान ।**
**कासया इंद्रियां बंधन । आहे तें निधान वेगळेंची ॥ ३ ॥**

वेदशास्त्र जाणीतलें । आगमीं पूर्ण ज्ञान झालें ।
पुराणमात्र धांडोळिलें । आहे तें राहिलें वेगळेंचि ॥ ४ ॥
शब्दब्रह्में होसी आगळा । म्हणसी न भियें कळिकाळ ।
बोधेंवीण सुखसोहळा । आहे तो जिव्हाळा वेगळाचि ॥ ५ ॥
याकारणें श्रीगुरुनाथु । जंव मस्तकीं न ठेवी हातु ।
निवृत्तिदास असे विनवितु । तंव निवांतु केविं होय? ॥ ६ ॥

निवृत्तीचा धर्म कोणता हें पुढील बहारीच्या अभंगांत त्यांनीं सांगितलें आहे.

देवा तुज चुकलों गा । तेणें दृष्टी आलें पडळ ।
विषयग्रंथीं गुंतलोंसें । तेणें होतसे विव्हळ ।
अंधमंद दृष्टी झाली । गिळूं पाहे हा काळ ।
अवचितें दैवयोगें । निवृत्ति भेटला कृपाळ ॥ १ ॥
धर्म जागो निवृत्तीचा । तेणें फेडिलें पडळ ।
ज्ञानाचा निजबोधु । विज्ञानरूप सकळ ॥ ध्रु० ॥
तिहीं लोकीं विश्वरूप । दिव्यदृष्टी दिधली ।
द्वैत हें हारपलें । अद्वैतपणें माउली ।
उपदेशु निजब्रह्म । ज्ञानांजन साउली ।
चिद्रूप दीप पाहे । तेथें तनुमनु निवाली ॥ २ ॥
दान हेंचि आम्हां गोड । देहीं दृष्टि मुराली ।
देह हें हारपलें । विदेहवृत्ति स्फुरली ।
विज्ञान हें प्रगटलें । ज्ञेय ज्ञाता निमाली ।
दृश्य तें तदाकार । ममता तेथें बुडाली ॥ ३ ॥
प्रपंचु हा नाहीं जाणा । एकाकार वृत्ति जाली ।
मी माझें हारपलें । विषयांधता बोली ।
उपरती सद्गुरुबोधीं । तेथें प्रकृति संचली ।
धर्ममार्गें शुद्ध पंथ । हातीं काठी दिधली ॥ ४ ॥
वेदमार्गें मुनी गेले । त्याच मार्गें चालिलों ।
न कळेचि विषयांधा । म्हणोनि उघड बोलिलों ।
चालतां धनुर्धरा । तरंगाकारीं हरलों ।
ज्ञानदेवो निवृत्तीचा । द्वैत अवघें निरसलों ॥ ५ ॥

हरीला सर्वभूतीं पहा असें सांगून निवृत्तिनाथांनीं 'रामकृष्ण' मंत्रानें माझीं गात्रें प्रोक्षित केल्यामुळें सर्व विश्व मला हरिमय झालें:—

**रामकृष्णमंत्रें प्रोक्षियेलीं गात्रें । हरिरूप सर्वत्र क्षर दिसे ॥ २ ॥**

## ज्ञानेश्वरींतले गुरुभक्तीचे उल्लेख.

६. ज्ञानेश्वरमहाराजांनीं निवृत्तिनाथांबद्दल जे परम प्रेमाचे, निष्ठेचे व आदराचे उद्गार आपल्या ज्ञानेश्वरींत काढले आहेत त्यांचा आतां संक्षेपानें विचार करूं. ज्ञानेश्वरींत, अमृतानुभवांत व अभंगांत जेथें तेथें महाराजांची अलोट गुरुभक्ति प्रकट झालेली आहे. समोर नित्यशः असलेली श्रीगुरूची सगुणमूर्ति आणि त्या द्वारां अंगाला आलेलें ब्रम्हज्ञान यांचें तादात्म्य त्यांच्याठायीं इतकें पूर्ण झालेलें आहे कीं, गुरुस्तवनपर उद्गारांत कोठें निवृत्तिनाथांच्या सगुणमूर्तीस उद्देशून, कोठें गुरुगम्य ब्रम्हवस्तूला उद्देशून व कोठें स्वसुखमय आत्मारामाला उद्देशून ते गुरुगौरव करीत आहेत. त्यांच्या अपूर्व गुरुभक्तीची वाखाणणी म्यां पामरानें काय करावी ! त्यांचें त्यांनाच बोलूं द्यावें व त्यांचे अमृतोद्गार तुम्हीं आम्हीं श्रद्धाप्रेमपूर्वक ऐकावे, आणि 'कई ऐशी दशा येइल माझ्या अंगा ।' ह्या तुकोक्तीप्रमाणें हा गुरुभक्तीचा गोड अनुभव मला येऊं द्या अशी सग्दुरूच्या चरणीं अनन्य-भावानें नित्य प्रार्थना करीत असावें.

( १ ) ज्ञानेश्वरीच्या उपोद्धातांत ज्याच्या कृपेनें मी हा संसार तरून गेलों व पूर्णकाम झालों त्या श्रीगुरूचें महाराजांनीं चिंतन केलें आहे:—

**मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु ।**
**म्हणऊनि विशेषें अत्यादरू । विवेकावरी ॥ २२ ॥**
**जैसें डोळ्यां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे ।**
**मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥ २३ ॥**
**कां चिंतामणि आलियां हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं ॥**
**तैसा पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेव म्हणे ॥ २४ ॥**

**६ म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होइजे ।**
**जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥ २५ ॥**
**पुढतपुढती तोची । अभिवंदिला श्रीगुरुची ।**
**अभिलषित मनोरुची । पुरविता जो ॥ २७ ॥**

ह्या उत्साहभरित नमनांत जसें महाराज ' मी पूर्णकाम आहें, तरलों आहें ' असें म्हणतात, तसेंच १७ व्या अध्यायांत त्यांनीं ' तैसा तुझिया प्रणतीं । मी पूर्ण जालों श्रीनिवृत्ति ' असें म्हटलें आहे.

## अभंग.

**श्रीगुरुसारिखा असतां पाठिराखा । इतरांचा लेखा कोण करी॥१॥**
**राजयाची कांता काय भीक मागे ? । मनाचिया जोगें सिद्धी पावे**
**कल्पतरुतळवटीं जो कोणी बैसला। काय वाणी त्याला सांगिजो जी**
**ज्ञानदेव म्हणे तरलों तरलों । साच उद्धरलों गुरुकृपें ॥ ४ ॥**

( २ ) मजवर अपार गुरुकृपा असल्यामुळें बुद्धीलाही न सांपडणारें पण इंद्रियांना चोरून जेवणाराला मात्र फावणारें असें कैवल्य मी डोळ्यांनीं पाहीन आणि अरूप व अतींद्रिय असें ब्रह्मसुखही इंद्रियांकरवीं भोगवीन असें सहाव्या अध्यायाच्या प्रारंभीं महाराज म्हणतातः—

**ते बुद्धीही आकळितां सांकडें । म्हणऊनि बोलीं विपायें सांपडे ।**
**परि श्रीनिवृत्तिकृपादीपउजियेडें । देखेन मी ॥ ३२ ॥**
**जें दिठीही न पविजे । तें दिठीवीण देखिजे ।**
**जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥ ३३ ॥**
**सद्गुरुकृपा होय । तरी करितां काय आपु नोहे ? ।**
**म्हणऊनि ते अपार मातें आहे । ज्ञानदेव म्हणे ॥ ३५ ॥**
**तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन ।**
**अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥ ३६ ॥**

ह्याच अध्यायाच्या अखेरीस महाराज म्हणतात कीं, " निवृत्तिनाथांना ज्ञानबीज पेरायचें होतें. त्याला अनुकूल साहित्यही जमलें. तुम्ही श्रोते,

मी वक्ता व श्रीगुरु बोलविणारे असा सुयोग आला आहे. सत्वगुणांची वृष्टि होऊन त्रिविधतापांचे गुंतडे वाहून गेल्यामुळें तुम्हां चतुरश्रोत्यांच्या चित्तवृत्तींचे उत्तम वाफे तयार झाले आहेत. त्यांवर अवधानाची सोन्यासारखी घात साधली, म्हणून ज्ञानबीज पेरण्याची निवृत्तिनाथांना उत्कंठा झाली. तें बीज पेरण्याकरितां त्यांनीं मोठ्या कौतुकानें चाड्याच्या ठिकाणीं माझी योजना केली व माझ्या मस्तकावर हात ठेवून तें ज्ञानबीज त्यांनीं या चाड्यांत घातलें. ”

( ३ ) दहाव्या अध्यायाच्या प्रारंभीं आपलें ‘ आराध्यलिंग ’ जे श्रीगुरु त्यांचें २१ ओव्यांत फार बहारीनें स्तवन केलें आहेः—

**नमो विशदबोधविदग्धा[१] । विद्यारविंदप्रबोधा[२] ।**
**पराप्रमेयप्रमदा-। विलासिया[३] ॥ १ ॥**
**नमो संसारतमसूर्या । अपारिमित परमवीर्या ।**
**तरुणतरतुर्या- । लालनलीला[४] ॥ २ ॥**
**नमो जगदखिलपालना । मंगलमणिनिधाना[५] ।**
**सज्जनवनचंदना । आराध्यलिंगा ॥ ३ ॥**

यापुढें महाराज गुरुकृपेचें महिमान सांगतातः—

**जी दैविकी उदार वाचा । जैं उद्देश दे ‘नाभि’ काराचा ।**
**तैं नवरससुधाब्धीचा । थाउ लाभे ॥ ७ ॥**

श्रीगुरु आपल्या उदारवाणीनें जेव्हां ‘ अभय ’ देतात तेव्हां नवरसांच्या सुधासागराचा थांग लागतो.

**हे असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकार माथां पारुखे ।**
**तो जीवचि परी तुके । महेशेंशीं ॥ ९ ॥**

---

१ विमल असा आत्मबोध देण्याविषयीं चतुर. २ ब्रह्मविद्यारूप कमलाचा विकास करणारा. ३ परावाणीच्या अर्थरूप स्त्रीशीं विलास करणारा. ४ तरुण अशा तुर्यावस्थेंत रमणारा. ५ कल्याणरूप रत्नांचा ठेवा.

फार काय सांगावें ? ज्यावर श्रीगुरूची कृपादृष्टि होते, किंवा ज्याच्या मस्तकावर त्यांचा वरदहस्त पडतो तो जीव असला तरी शिवाची साम्यता पावतो.

(४) बाराव्या भक्तियोगाच्या अध्यायाच्या मंगलाचरणांत 'सद्गुरूच्या कृपादृष्टीचें' स्तवन (१–१९) केलें आहे, त्यांतही आपल्या योगानुभवाचा उल्लेख करून वरप्रदान मागितलें आहे. हा खरोखरी आनंदाचाँ वर्षावच झाला आहे:—

जय जय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।
अनवरत आनंदे । वर्षतिये ॥ १ ॥
विषयव्याळें मिठी । दिघलिया नुठी ताठी ।
ते तुझियें कृपादृष्टी । निर्विष होय ॥ २ ॥
तरी कवणातें ताप पोळी । कैसेनि वो शोक जाळी ।
जरी प्रसादरसकल्लोळीं । पूरें येसी तूं ॥ ३ ॥

महाराज श्रीगुरूपाशीं मागणें मागतात:—

नवरसीं भरवीं सागर । करवीं उचितरत्नांचे आगर ।
भावार्थाचे गिरिवर । निफजवीं माये ॥ ११ ॥
श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करी वो सरतें ।
राणिवे बैसवीं श्रोतयांतें । श्रवणाचिये ॥ १५ ॥
ये मऱ्हाठियेचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळ करीं ।
घेणें देणें सुखचिवरी । हो देईं या जगा ॥ १६ ॥

(५) तेराव्या अध्यायांतील ज्ञानलक्षणांपैकीं ७ व्या श्लोकांतल्या 'आचार्योपासनम्' ह्या पदावर तर महाराजांनीं फारच बहार केली आहे. 'आचार्योपासनम्' हें पद कानांवर पडतांच त्यांच्या गुरुभक्तीला जो बहर आला व अंतःकरणाचा पाट फोडून जें वक्तृत्व उसळलें त्याबरोबर ९२ ओव्या तें सहज बोलून गेले! "आवघियांचि दैवां । जन्मभूमि हे सेवा । जें ब्रह्म करी जीवां । शोच्यातेंही" याप्रमाणें गुरुसेवेचें महत्व सांगून गुरुभक्त गुरुप्रेमानें कसा तल्लीन होऊन जातो, तो गुरूचें स्मरण कसें करितो,

ध्यान कसें करितो पूजन कसें करितो, गुरूची पादसेवा कशी करितो, गुरूला सर्वस्वार्पण करून आपल्या उत्कट प्रेमानें गुरुपूजेचीं सर्व उपकरणीं आपणच कसा होऊन जातो, गुरुचें दास्य कसें करितो, गुरूच्या गुणगानांत रंगून कसा जातो, याचें अत्यंत रसभरित वर्णन महाराजांनीं आपल्या परमोत्कट गुरुभक्तीस अनुसरून केलें आहे. तें मूळांतूनच वारंवार पहावें. श्रीगुरु जर दूरदेशीं रहात असतील तर त्यांच्या भेटीची अगर वार्तेची उत्कंठा त्याच्या ठिकाणीं कशी असते ?

**गुरुगृह जिये देशीं । तो देशचि वसे मानसीं ।**
**विरहिणी कां जैसी । वल्लभातें ॥ ३५५ ॥**
**तियेकडोनि येतसे वारा । देखोनि धांवे सामोरा ।**
**आड पडे म्हणे घरा । बीजें कीजो ॥ ३७६ ॥**
**म्हणे कैं हें बिरडें फिटेल । कैं तो स्वामी भेटेल ।**
**युगाहूनि वडिल । निमिष मानी ॥ ३७९ ॥**

हृदयशुद्धीच्या आवारांत आनंदाच्या राउळांत श्रीगुरुलिंगावर तो ध्यानामृताचा अभिषेक कसा करितो ?—

**एकाधिये वेळें । गुरु माय करी भावबळें ।**
**मग स्तन्यसुखें लोळे अंकावरी ॥ ३९६ ॥**
**ना तरी गा किरीटी । चैतन्यतरुतळवटीं ।**
**गुरु धेनु आपण पोटीं । वत्स होय ॥ ३९७ ॥**
**गुरुकृपास्नेहसलिलीं । आपण होय मासोळी ।**
**कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥ ३९८ ॥**
**गुरूतें पक्षिणी करी । चारा घे चांचूवरी ।**
**गुरु तारू धरी । आपण कास ॥ ४०१ ॥**

हा श्रीगुरुध्यानाचा अंतर्भाग झाला. अशीच बाह्यसेवा सर्वपरिवार मींच होऊन करावी अशी गुरुभक्त उत्कंठा वाहतो. श्रीगुरूचें भुवन मींच व्हावें, द्वार मीं व्हावें, द्वारपाळही मींच व्हावें, छत्र आणि छत्रधरही मींच व्हावें, श्रीगुरूचा चवरधर ( चवरी धरणारा ), खोलता ( दिवट्या ), हडपेकर ( विडा देणारा ), मींच व्हावें:—

होईन गुरूचें आसन । अलंकार परिधान ।
चंदनादि उपचार । होईन मी ॥ ४२१ ॥
ताट मी काढीन । सेज मी झाडीन ।
चरणसंवाहन । मीच करीन ॥ ४२४ ॥
श्रीगुरूचे डोळे । अवलोकनें स्नेहाळें ।
पाहती तिये सकळें । होईन रूपें ॥ ४२८ ॥
तिये रसने जो रुचेल । तो तो रस म्यां होइजेल ।
गंधरूपें करिजेल । घ्राणसेवा ॥ ४२९ ॥
एवं बाह्य मनोगत । श्रीगुरुसेवा समस्त ।
वेटाळीन वस्तुजात । होऊनियां ॥ ४३० ॥

मी जिवंत असतांना श्रीगुरुसेवा अशा प्रकारची करीनच, पण मेल्यावरही श्रीगुरुचरणापासून दूर होणार नाहीं. कसाः—

इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षिती ।
जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरूचे ॥ ४३२ ॥
माझा स्वामी कवतिकें । स्पर्शीत जिये उदकें ।
तेथ लया नेईल निकें । आपीं आप ॥ ४३३ ॥

गुरुभक्ताची गुरुनिष्ठा किती निस्सीम असते हें पुढील उत्कृष्ट ओव्यांत महाराज सांगतातः—

जो गुरुदास्यें कृश । जो गुरुप्रेमें सपोष ।
जो गुरुआज्ञे निवास । आपणचि ॥ ४४३ ॥
जो गुरुकुळें सुकुलीन । जो गुरुबंधुसौजन्यें सुजन ।
जो गुरुसेवाव्यसनें सव्यसन । निरंतर ॥ ४४४ ॥
गुरुसंप्रदायधर्म । तोचि जयाचे वर्णाश्रम ।
गुरुपरिचर्या नित्यकर्म । जयाचें गा ॥ ४४५ ॥
गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता ।
जो गुरुसेवेपरता । मार्ग नेणे ॥ ४४६ ॥
श्रीगुरूचें द्वार । तें जयाचें सर्वस्व सार ।
गुरुसेवकां सहोदर- । प्रेमें भजे ॥ ४४७ ॥

**जयाचें वक्त्र । वाहे गुरुनामाचे मंत्र ।**
**गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न शिवें ॥ ४४८ ॥**
**शिवतलें गुरुचरणीं । भलतैसें हो पाणी ।**
**तया तीर्थयात्रे आणी । तीर्थें त्रैलोक्यींची ॥ ४४९ ॥**
**कैवल्यसुखासाठीं । परमाणु घे किरीटी ।**
**उधळती पायांपाठीं । चालतां जे ॥ ४५१ ॥**

असो. "श्रीगुरुभक्तीचें एवढें अफाट वर्णन कांहो केलें ? 'आचार्यो-पासनम्' हें लहानसें पद कोठें व तुमचें हें अमर्याद वर्णन कोठें ? ही 'सोयचुकी बोली' म्ह० मार्ग सोडून बोलणें ( विषयांतर ) कां केलें ?" असें श्रोते विचारतील म्हणून महाराज सांगतात कीं, गुरुसेवेविषयीं मी स्वतः हात असून खुळा, भजनावधानीं आंधळा, परिचर्येला पांगळा, गुरु-वर्णनीं मुका ( हा मुकाच बोलतो आहे ! ) व आळशी आहें; तथापि गुरु-सेवेविषयीं माझ्या मनांत फार फार प्रेम आहे !! 'परि मनीं आथी निका । सानुराग' ( ४५८ ).

( ६ ) चवदाव्या अध्यायांत श्रीगुरूंच्या व्यापक स्वरूपाचें महाराजांनीं स्तवन ( १–१५ ) करून पुढें ( १६–३० ) गुरुप्रसादाची याचना केली आहे:—

**जयजय आचार्या । समस्तसुरवर्या ।**
**प्रज्ञाप्रभातसूर्या । सुखोदया ॥ १ ॥**
**जयजय सर्वविसांवया । सोहंभावसुहावया[१] ।**
**नाना लोक हेलावया[२] । समुद्रा तूं ॥ २ ॥**
**आइकें गा आर्तबंधू । निरंतर कारुण्यसिंधू ।**
**विशदविद्यावधू- । वल्लभा जी ॥ ३ ॥**

ह्यांत समस्त सुरांत श्रेष्ठ, प्रज्ञाप्रभाताचा सूर्य, सर्वांचें विश्रांतिस्थान, शिष्याच्या बुद्धींत 'सोहंभाव' उत्पन्न करणारा, पीडितांचे बंधु, करुणा-

---

१ 'मी ब्रह्म' हा भाव सुशोभित करणाऱ्या. २ लाटांप्रमाणें हेलकावे देणाऱ्या.

सागर, ब्रह्मविद्यावधूचे वल्लभ इत्यादि गोड गोड विशेषणांनीं श्रीगुरूचें स्तवन केलें आहे. पृथ्वी, रवि, चंद्र, अनिळ, वायु यांचे प्रकाशक व प्रेरक तुम्ही असून तुमचें साक्षाद्दर्शन झालें नाहीं तोंवरच वेद बोलका आहे; इत्यादि प्रकारें परमपुरुषरूपी श्रीगुरूची स्तुति करून महाराज मागतातः–

**अगा विश्वैकधामा। तुझा प्रसादचंद्रमा।**
**करूं मज पूर्णिमा। स्फूर्तीची जी ॥ २३ ॥**
**जी अवलोकिलियां मातें। उन्मेषसागरीं भरतें।**
**वोसंडेल स्फूर्तीतें। रसवृत्तीचे ॥ २४ ॥**

आपला प्रसादचंद्र मला पूर्णस्फूर्ति देवो म्हणजे माझ्या ज्ञानसमुद्राला भरतें येईल व नवरस हे स्फूर्ति भरून वोसंडू लागतील–हें ज्ञानेश्वरांचें भाषण ऐकून निवृत्तिनाथ म्हणाले कीं, " स्तवनामिषें दुजें मांडूं नकोस म्ह० मी गुरु व तूं शिष्य हा द्वैतभाव मांडूं नकोस, तर ग्रंथार्थ उघडा करून दाखीव." यावर " तुम्हीं आपल्या मुखानें 'ग्रंथ सांग' असें म्हणावें याचसाठीं म्ह० हीं आज्ञाक्षरें तुमच्या मुखांतून यावींत म्हणूनच मी वाट पाहत होतों " असें ज्ञानेश्वर म्हणाले. हें ग्रंथकर्तृत्व माझें नाहीं–' परि हें म्यां केलें। कीं हें माझोनि जालें। ऐसें नाहीं ठेविलें। वासनेमाजी ' असें सांगून महाराजांनीं सर्व भार श्रीगुरूवर टाकला व आपण मुख्य विषयाकडे वळले. ह्या प्रसंगींच्या पहिल्या १५ ओंव्या गुरुस्तुतीच्या आणि पुढल्या पंधरा ओंव्या वरयाचनेच्या व गुरुशिष्यसंवादाच्या आहेत; त्या सर्वांचा एकवट विचार केला म्हणजे आपल्यापुढें बसलेली निवृत्तिनाथांची सगुणमूर्ति व विश्वात्मक, परात्पर, पुरुषोत्तम असा परमात्मा यांचें पूर्ण तादात्म्य ज्ञानेश्वरमहाराजांच्या बुद्धीनें भावलें होतें हें सिद्ध होतें ' सगुण निर्गुण एक गोविंदु रे ' 'साकार निराकार वस्तु सद्गुरु आमुचा। तेणें या देहाचा केला उद्धारु रे ' हा त्यांचा सिद्धांत आहे. ' पै जे वानी श्यातुका। तेचि वेगळिये वाला एका। म्हणोनि एकदेशीया व्यापका। सारिसा पाडु ' ( ज्ञाने० अ० १२–२५ ) हा त्याचा सिद्धांत आहे. निवृत्ति या पदानें ते श्रीगुरु निवृत्तिनाथ व निर्गुण परब्रह्म ह्या दोहींचा एकदम बोध करितात.

**म्हणोनि शिष्य आणि गुरुनाथु । या दोनी शब्दांचा अर्थु ।**
**श्रीगुरुचि परि होतु । दोहो ठायीं ॥**—( अमृता० २–६१ )

असो. तात्पर्य, परब्रह्म वस्तु, ब्रह्मबोधक श्रीगुरु व बोध्य सच्छिष्य या तीनही पदांत जो एकपणाचा दोरा आहे, जें पूर्ण ऐक्य आहे त्या एकपणाच्या व ऐक्याच्या बैठकीवर बसून पाहिल्याशिवाय ज्ञानेश्वरींतल्या श्रीगुरुस्तवनाचें रहस्य नीटसें लक्षांत येणें शक्य होणार नाहीं. उपास्य आणि उपासक यांच्यांत पूर्ण अद्वैत झाल्यास उपासना मोडेल अशी द्वैती पंडित शंका घेत असतात, पण अभेदभक्तीचें मर्म महाराजांनीं आपल्या ग्रंथांत जागोजाग स्पष्ट सांगितलें आहे व नाथतुकोबादि संतांनींही अभेदभक्तिच सर्वत्र प्रतिपादिली आहे. " अद्वैतीं भक्ति आहे । हें अनुभवाचि जोगें, नव्हे । बोला ऐसें " ( ज्ञाने० अ० १८–११५१ ) अद्वैतभक्तीचें सुख अनुभविलेंच पाहिजे, तें वाणीनें वर्णन करून सांगतां येण्यासारखें नाहीं. अमृतानुभवांत ( प्रकरण ९ ) महाराजांनीं एका गोड दृष्टांतानें हें तत्व मजेनें सांगितलें आहे. डोंगरी लेण्यांत एखादें शिवालय पोंखरलेलें असतें. तेथें एकाच पाषाणांत देव, देऊळ व पार्षदादि भक्तगण कोरलेले असतात:—

**देव देऊळ परिवारु । कीजे कोरुनि डोंगरु ।**
**तैसा भक्तीचा वेव्हारु । कां न व्हावा ? ॥ ४१ ॥**

देव, देऊळ व परिवार हे जसे एकाच डोंगरांत कोरलेले असतात तसा एकत्वांत भक्तीचा व्यवहार कां होणार नाहीं ? अलबत्त होईल ! 'शिवो भूत्वा शिवं यजेत्' ह्याचें तात्पर्य हेंच आहे. 'अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसूख' असें तुकाराममहाराजांनीं सांगितलें आहे. " देवो देवपणें दाटला । भक्त भक्तपणें आटला । दोहींचाही अंतु आला । अभेदो जाला अंनतु " ( नाथ भागवत अ० १–८८ ) हें अभेदभक्तीचें मर्म नाथांनींही सांगितलें आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनींही ( अ० १५ ) म्हटलें आहे:—

**साडेपंधरेसीं मिसळावें । तें साडेपंधरेंचि होआवें ।**
**तेविं मी जालिया संभवे । भक्ति माजी ॥ ५६७ ॥**

इतकेंच काय पण विभक्तपणांत खरी भक्तिही संभवत नाहीं ! ! महाराज विचारतातः—

**ह्या गा सिंधूसि आनी होती । तरी गंगा कैसेनि मिळती ? ।**
**म्हणोनि मी न होतां भक्ती । अन्वय आहे ? ॥ ५६८ ॥**

सर्व प्रकारांनीं कल्लोळ जसा सागराशीं अनन्य असतो, तसें सर्व प्रकारें श्रीहरीसी म्हणजेच श्रीगुरूशीं अनन्य होणें हीच खरी खरी भक्ति आहे. असो. हें अभेदभक्तीचें रहस्य लक्ष्यांत ठेवून ज्ञानेश्वरमहाराजांनीं परब्रह्मरूप श्रीगुरूंबद्दल जे प्रेमाचे उद्गार काढले आहेत त्यांचें नीट मनन करावें. तात्पर्य, ब्रह्मवस्तु, ब्रह्मबोधक श्रीगुरु व बोध्य शिष्य यांच्यांत पूर्ण ऐक्यभाव आहे.

( ७ ) पंधराव्या अध्यायाच्या मंगलाचरणांत ( १–२८ ) श्रीगुरुचरणांचीच मानसपूजा केली असून महाराजांनीं श्रीगुरुकृपेनें आपल्या वाणीचें वैभव आणि सौभाग्य कसें अलौकिक झालें आहे तें सांगितलें आहे. हृदयाच्या चौरंगावर श्रीगुरूंच्या पादुका ठेवूं, ऐक्यभावाच्या अंजुळींत सर्वेंद्रियांच्या पुष्पकलिका ठेवून अर्घ्य देऊं, एकनिष्ठतेच्या उदकानें निर्मल झालेल्या वासनेचें चंदन लावूं, प्रेमरूपी सोन्याच्या घागऱ्या श्रीगुरूंच्या कोमल पायांत व भक्तीचीं नूपुरें ( रणजोडवीं ) त्यांच्या बोटांत घालूं, आनंदपरिमळानें भरलेलें सत्वाचें अष्टदळ गुरुचरणांवर वाहूं, 'अहं' चा धूप जाळूं, 'नाहं' चा ( निराभिमानाचा ) दीप ओवाळूं, सामरस्यानें म्हणजे ऐक्यभावानें आलिंगन देऊं, आपलें शरीर व प्राण ह्या दोन पादुका श्रीगुरूंच्या पायांत घालूं व त्यावरून भोगमोक्षांचें निंबलोण ओवाळूं— याप्रमाणें प्रथम श्रीगुरुचरणांचें ध्यान महाराज करितात त्या ध्यानांतल्या—

**आतां हृदय हें आपुलें । चौफाळूनियां भलें ।**
**वरी बैसऊं पाउलें । श्रीगुरूचीं ॥ १ ॥**

येथपासूनच्या ८ ओव्या मननपूर्वक वाचतां वाचतां वाचकाचीही समाधि लागायची वेळ येते, इतका रंग त्यांतल्या प्रत्येक पदांत भरलेला आहे !

पंधराव्या अध्यायाच्या शेवटीं पुरुषोत्तमाचें खरें स्वरूप वर्णन केल्यावर महाराज म्हणतातः—

**आतां विश्वात्मक माझा । स्वामी श्रीनिवृत्तिराजा ।**
**तो अवधारू वाक्यपूजा । ज्ञानदेव म्हणे ॥ ५९९ ॥**

( ८ ) सोळाव्या अध्यायाचें मंगलाचरण बरेंच मोठें ( १–४० ) आहे. त्याचा येथें विचार करूं गेल्यास विस्तार फार होईल म्हणून ४।२ बहारीच्या ओव्याच देऊन आटपतोंः—

**मावळवीत विश्वाभास । नवल उदयला चंडांश ।**
**अद्वयाब्जिनीविकास । वंदूं आतां ॥ १ ॥**

**जो अविद्याराती रुसोनियां । गिळी ज्ञानाज्ञानचांदणिया ।**
**तो सुदिन करी ज्ञानिया । स्वबोधाचा ॥ २ ॥**

चित्सूर्याचा उदय झाला कीं विश्वाभास मावळून अद्वैतकमलिनीचा विकास होतो. तो अविद्यारात्रीचा निरास करून ज्ञान व अज्ञान दोन्ही चांदण्या गिळून टाकतो व ज्ञान्याला आत्मबोधाचा प्रकाश करितो. बुद्धि आणि बोध ह्या चक्रवाकांच्या जोडप्याचा भेदनदीच्या कांठावर वियोग होऊन दोन्ही कांठांवर दोघे जे आरडत आहेत त्यांना चिदाकाशांत प्रकाश करणाऱ्या ह्या सूर्योदयामुळें ऐक्याचें सौख्य मिळतें—

**तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान ।**
**भोगवी जो चिद्गगन । भुवनदिवा ॥ ६ ॥**

अहोरात्रांचा म्ह० ज्ञानाज्ञानांचा पैलकड अर्थात् पलीकडचा जो ज्ञानमार्तंड तो पहावा कोणीं ? त्याला प्रकाश्य कांहीं नसून प्रकाशाचा मात्र जो सुकाळ करितो त्या चित्सूर्य श्रीनिवृत्तिनाथांना माझें वारंवार नमन असोः—

**तो अहोरात्रांचा पैलकड । कोणें देखावा ज्ञानमार्तंड ।**
**जो प्रकाश्येंवीण करी सुरवाड । प्रकाशाचा ॥ १६ ॥**
**तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आतां नमोंचि म्हणों पुढतपुढती ।**
**जे बाधका येइजतसे स्तुति । बोलाचिया ॥ १७ ॥**

सागराला शाकांचा पाहुणेर करणें किंवा सूर्याला काडवातीनें ओंवाळणें अयोग्य असलें तरी करणाराची उत्कट भक्तिच पहावी!

(९) सतराव्या अध्यायाच्या मंगलाचरणांत १८ ओंव्या असून त्या 'आराध्यलिंग श्रीगुरुरायांच्या' स्तवनपरच आहेत.

**विश्वविकासित मुद्रा । जया सोडवी तुझी योगनिद्रा ।**
**तया नमोंजी गणेंद्रा । श्रीगुरुराया ॥ १ ॥**
**त्रिगुण त्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गीं आडिला ।**
**तो आत्मशंभूनें सोडविला । तुझिया स्मृती ॥ २ ॥**

त्रिगुणरूपी तीन शहरांनीं वेढलेला म्ह० त्रिगुणांनीं गांजलेला व जीवपणाच्या किल्ल्यांत अडकलेला असा जीव तुझ्या स्मरणानें आत्मशंभूनें म्ह० शंकरांनीं सोडविला. तुला प्रथमच गणेंद्र म्हणून म्हटलें आहे तेव्हां तुलाही लोक वक्रतुंड म्हणतील. तूं वक्रतूंड आहेस पण कोणाला?

**जे तुझ्या विखीं मूढ । तयांलागीं तूं वक्रतुंड ।**
**ज्ञानियांसी तरी अखंड । उजूचि आहासी ॥ ३ ॥**

जे तुला विमुख आहेत त्यांना तूं वक्रतुंड आहेस, पण ज्ञान्यांना तूं सर्वकाळ सरलतुंडच आहेस! तुझे दिव्य नेत्र सूक्ष्म आहेत, पण त्यांच्या उघडझापींत विश्वाचा उत्पत्तिनाश होत असतो:—

**दैविकी दिठी पाहतां सानी । तऱ्हीं मीलनोन्मीलनीं ।**
**उत्पत्ति प्रळय दोन्ही । लीलाचि करिसी ॥ ६ ॥**

अहो गुरुराया! तुमची सोयरीक जो करितो तो जगाच्या सोयरिकीला मुकतो म्ह० तुमच्या स्वरूपांत मिळून जातांच जगाचा संबंध सुटतो. जो

ध्यानही विसरे तेणेसीं वालभ तुज ' म्ह० जो ध्यानही विसरतो ( ध्येय, ध्याता व ध्यान ही त्रिपुटी जो उभी करीत नाहीं ) त्यावर तुझें प्रेम असतें! तुला वेगळा करून जे तुझ्या प्राप्तीचे उपाय शोधतात त्यांपासून तूं मागेंचें राहतोस !!

**तूतें करूनि पुढें । जे उपायीं घेती दवडे ।**
**तया ठासी बहुवें पाडें । मागांचि तूं ॥ १२ ॥**

तूं सहज सिद्ध असून अशा तुला जो जाणत नाहीं त्याचा जगांत सर्वेश म्हणून डिंडिमा वाजतो; वेदाचें बोलणेंही तूं ऐकत नाहींस यावरून मला वाटतें कीं, तुझ्या राशीवरून तुझें 'मौन' हें नांव निघत असावें ! तर मग आतां तुझें स्तवन म्यां कसें करावें ? तूं देव व मी सेवक असा भाव धरूं तर यानें तुझ्या अखंडैकरसत्वाला बाध येऊन तुझा द्रोह केल्यासारखें होतें ! म्हणून आतां मी तुजलागीं कांहीं होत नाहीं. सर्वथा कांहींही न होणें ( विशेषत्वानें तुला न भजणें ) म्हणजेच हे अद्वया ! तुला पावणें आहे. हें तुझें वर्म, हे आराध्यलिंगा ! मला कळलें आहे म्हणून वेगळेपणानें न राहतां मीठ जसें समुद्रांत विरून जातें तसें हे तुला माझें नमन आहे. आतां याहून मी ज्यास्त काय बोलूं ? ( १४-१८ )

( १० ) अठराव्या अध्यायाच्या मंगलाचरणाच्या २९ ओव्या तर सर्वोत्कृष्टच आहेतः—

**जयजय देव निर्मळ । निजजनाखिलमंगळ ।**
**जन्मजराजलदजाळ । प्रभंजन ॥ १ ॥**
**जयजय देव सकळ । विगतविषयवत्सल ।**
**कलितकालकौतूहल । कलातीत ॥ ३ ॥**
**जयजय देव निष्कळ । स्फुरदमंदानंदबहळ ।**
**नित्य निरस्ताखिलमळ । मूळभूत ॥ ५ ॥**
**जय जय देव विशुद्ध । अविद्योद्यानद्विरद ।**
**शमदमसदनमदभेद । दयार्णव ॥ ७ ॥**

ह्याप्रमाणें त्या निर्विशेषाला विशेषणें लावून संबोधावयाचाहि संकोच वाटून पुढें महाराज म्हणतातः—

**जिहीं विशेषणीं विशेषिजे । तें दृश्य नव्हे रूप तुझें ।**
**हें जाणें मी म्हणोनि लाजे । वानणा इहीं ॥ १२ ॥**

तर मग स्तुति कां करितोस म्हणून म्हणाल तर सांगतों. अहो गुरुनाथा ! समुद्राला मर्यादा आहे असा त्याचा लौकिक आहे, पण चंद्रोदय झाला कीं त्याच्याच्यानें मर्यादा धरून राहवेल कां हो !

**परि मर्यादेचा सागर । हां तंवचि तया डगर ।**
**जंव न देखे सुधाकर । उदया आला ॥ १३ ॥**

सोमकांतमणि आपल्या उदकानें चंद्राला अर्घ्यादि देत नाहीं, तर चंद्रच त्याजकडून तें करवितो. वसंताच्या उदयाबरोबर वृक्षांना पालवी फुटूं लागते, किंवा रविकराचा स्पर्श होतांच पद्मिनी लाज सोडून प्रफुल्लित होते—त्या-प्रमाणेंच तुमचें स्मरण होतांच मी देहभावविवार्जित होतों. तृप्त झाल्यावर ढेंकर जसा सहज येतो तसें माझें होतें.

**तैसा तूतें जेथ मी स्मरें । तेथ मीपण मी विसरें ।**
**मग जाकाळिला ढेंकरें । तृप्त जैसा ॥ १७ ॥**

'मीपण विसरून' मी तुमचें स्तवन करितों. 'मीपण कायम ठेवून' तुमची स्तुति करावी तर तुमच्या गुणदोषांची निवड केली पाहिजे. पण गुरुनाथा, तुम्ही एकरसाचें लिंग आहांत आणि तुमच्या गुणदोषांची निवड मीं कशी बरें करावी ? मोतीं फोडून मग तें सांधीत बसण्यापेक्षां तें न फोडलेलेंच बरें नाहीं काय ?

**तरी तूं एकरसाचें लिंग । केवीं करूं गुणागुणीं विभाग ? ।**
**मोतीं फोडूनि सांधितां चांग । कीं तैसेंचि भलें ? ॥ २० ॥**

आणि 'मायबाप' म्हटलें तर ही स्तुति न होतां माझ्या लेंकुरपणाच्या उपाधीचा मात्र तुम्हांला विटाळ होईल !

**आणि बाप तूं माये । इहीं बोलीं ना स्तुति होये ।**
**डिंभोपाधिक आहे । विटाळ तेथें ॥ २१ ॥**

तात्पर्य काय कीं, तुमची स्तुति करायला जागाच नाहीं. तुम्हीं मौनाचा अलंकार अंगावर घेतला आहे.

**स्तुति कांहीं न बोलणें । पूजा कांहीं न करणें ।**
**सन्निधि कांहीं न होणें । तुझ्या ठायीं ॥ २५ ॥**

( ११ ) ज्ञानेश्वरीच्या उपसंहारांत ग्रंथकर्तृत्वाच्या अभिमानाचा परिहार करितांना महाराज म्हणतातः—

**तो सर्वोपकारी समर्थ । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथ ।**
**राहटत असे मजही आंत । रिघोनियां ॥ १७२९ ॥**
**आतां आयती गीता जगीं । मी सांगें मऱ्हाठिया भंगीं ।**
**येथ कें विस्मयालागीं । ठाव आहे ? ॥ १७३० ॥**

डोंगरावर द्रोणाचार्यांची मातीची मूर्ति स्थापून त्यांची सेवा करून एकलव्य कोळ्यानें त्रैलोक्यांत ख्याति केली नाहीं काय ?

**श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापाशीं होती ।**
**तेणें कोळियें त्रिजगती । येकवद केली ॥ ३१ ॥**

चंदनाच्या आसपासचे वृक्ष चंदनमय होतात, व वसिष्ठांची छाटी तेजानें सूर्याशीं भांडूं लागली, ह्या गोष्टी प्रसिद्धच आहेत. पण ह्या निर्जीवांच्या गोष्टी झाल्याः—

**मा मी तंव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ।**
**जो दिठीवेनि आपुला । बैसवी पदीं ॥ १७३३ ॥**
**एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें ।**
**तें ग्रंथें बांधोनि दिधलें । गोसावीं मज ॥ १७६४ ॥**
**वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणे स्वामीची ।**
**ऐसिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ॥ १७६५ ॥**
**परि साचाचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें ।**
**प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥ १७६६ ॥**

## अमृतानुभवांतले गुरुभक्तीचे उल्लेख.

अमृतानुभवाच्या दुसऱ्या प्रकरणांत सद्गुरूच्या वाच्य ( सोपाधिक ) आणि लक्ष्य ( निरुपाधिक ब्रह्म ) स्वरूपाला उद्देशून फार बहारीचें वर्णन केलें आहे त्याकडे आतां आपण वळूं.

**आतां उपायवनवसंतु । जो आज्ञेचा अहेवतंतु ।**
**अमूर्तांचि परि मूर्तु । कारुण्याचा ॥ १ ॥**

स्वरूपानुभवाचे श्रवणमननादि जे उपाय ( साधनें ) सांगितले आहेत त्या उपायरूप वनाला सद्गुरु हे वसंतासारखे आहेत, म्हणजे वसंतागमाबरोबर वनाला फलपुष्पसंमृद्धि लाभते, त्याप्रमाणें श्रवणमननादि साधनांना फलद्रूपता देण्यास मुख्य कारण म्हणजे सद्गुरु हेच होय. आज्ञा म्हणजे ब्रह्मविद्या, अहेव म्ह० सौभाग्य व अहेवतंतु म्ह० मंगळसूत्र; अर्थात् ब्रह्मविद्येचें मंगळसूत्र.

**मोडोनि मायाकुंजरु । मुक्तमोतियाचा वोगरु ।**
**जेवविता सद्गुरु । निवृत्ति वंदूं ॥ २ ॥**

मायारूप हत्तीला मारून त्याच्या गंडस्थलांतील मुक्तमोत्यांचें ( नित्यमुक्त अशा आत्मभावाचें ) भोजन देणाऱ्या सद्गुरुनिवृत्तिनाथांला मी वंदन करितों. ह्या कामांत म्हणजे बद्धाला मुक्त करण्यांत सद्गुरूंना मोठे श्रम पडत असतील काय हो ! अहो ! छे ! !—

**जयाचेनि अपांगपातें । बद्ध मोक्षपणीं आतें ।**
**भेटे जाणतया जाणते । जयापाशीं ॥ ४ ॥**

मुक्त करणें सद्गुरूंना सोपें असेल पण कांहीं अधिकार पाहावा लागत असेल कीं नाहीं ? अहो ! नाहीं. त्यांच्यापाशीं अधिकारी व बिनअधिकारी, लहान व थोर हा भेद कांहीं नाहीं !

**कैवल्यकनकाचिया दाना । जो न कडसी थोरसाना ।**
**द्रष्टयाचिया दर्शना । पाढाऊ जो ॥ ५ ॥**

कैवल्य म्ह० मोक्ष हेंच सोनें, त्याचें दान करितांना ते लहानथोर हा

विचार करीत नाहींत. कैवल्य म्हणजे केवल, चिन्मात्र, वस्तु, गुणधर्मांचा मल जिला नाहीं ती निर्मल निरंजन वस्तु. त्याचें सद्गुरु दान करितात. म्ह० स्मरण करवितात, 'तें तूं आहेस' अशी आठवण देतात व ह्यामुळें वस्तुरूपता सहजासिद्ध असून सद्गुरूंकडे पाढाऊपणा (मार्गदर्शकत्व.) येतें. अर्थात् द्रष्टा जो आत्माराम त्याच्या दर्शनाचे ते वाटाडे आहेत, ते ज्ञानपथदर्शक आहेत. सद्गुरूंना केवळ मार्गदर्शक म्हटल्यानें त्यांचें सामर्थ्य कमी आहे असें कोणास मासेल म्हणून म्हणतात:——

**सामर्थ्याचेनि बिकें । जो शिवाचेंही गुरुत्व जिंके ।**
**आत्मा आत्मसुख देखे । आरसा जिये ॥ ६ ॥**

सद्गुरु हे आपल्या सामर्थ्यानें शिवाचेंही गुरुत्व जिंकतात. अविद्योपाधि जीव हा मायोपाधि शिवाच्या नियंतृत्वाखालीं नांदत आहे. पिंडाचा चालक तो जीव व ब्रह्मांडाचा चालक तो शिव. आतां जीवापेक्षां शिव श्रेष्ठ आहे हें उघड दिसतें. शिवाचें गुरुत्व हें जीवसापेक्ष आहे, पण दोघेही उपाधींतलेच आहेत. सद्गुरु मात्र उपाधीवेगळे असल्यामुळें त्यांच्या दृष्टीनें जीवशिव सारखेच बद्ध आहेत. जसें, दोघे भाऊ सुतकी असून त्यांपैकीं एक सोंवळा व एक ओंवळा असे आहेत, पण ते दोघेही खऱ्या सोंवळ्याच्या दृष्टीनें ओंवळेच आहेत; किंवा एकाच्या पायांत बिड्या आहेत व दुसरा नजरकैदेंत आहे, पण ते दोघेही मोकळ्या मनुष्याच्या दृष्टीनें सारखेच कैदी आहेत; त्याप्रमाणें जीव आणि शिव हे दोघेही उपाधिगत असल्यामुळें सारखेच बद्ध आहेत, त्यांच्या लघुगुरुत्वाला निर्धर्म, निरुपाधिक नित्ययुक्त अशा सद्गुरूंच्या दृष्टीनें कांहीं किंमत नाहीं! जीवात्म्याला निजसुख पाहण्याला सद्गुरु हे आरशाच्या ठिकाणीं आहेत.

**जो भेटलियाचि सवे । पुरति उपायाचे धांवे ।**
**प्रवृत्तिगंगा स्थिरावे । सागरीं जिये ॥ ८ ॥**

त्या सद्गुरूंचीं भेट होतांच ज्या साधनमार्गांनीं मुमुक्षु धांवत असतो तीं साधनें थांबतात. मुक्काम गांठल्यावर मग धांवणें अर्थातच थांबतें!

गंगा सागरास जाऊन मिळाली कीं सागराशीं समरस होऊन गेल्यामुळें तिचें धांवणें बंद होतें, त्याप्रमाणें श्रवण, मनन, सत्संग, तीर्थयात्रा, जपतपानुष्ठानादि प्रकार ज्या स्वरूपप्राप्तीसाठीं असतात, ते सर्व स्वात्मारामाशीं तन्मय झाल्याबरोबर अपाप कुंठतात.

ज्याच्या अनवसरांत म्हणजे अभानांत किंवा विसरांत जीव द्रष्टेपणा धांधरून जगाला दृश्यपणा देतो व ज्याची भेट होतांक्षणींच अनेक नामरूपात्मक हें जग मावळून जातें तें सद्‌गुरूंचें खरें स्वरूप होय. तात्पर्य, आत्मस्वरूपाशीं तन्मय झालें म्हणजे द्रष्टा, दृश्य व दर्शन ही त्रिपुटी मावळते, व स्वरूपाचा विसर पडला कीं त्रिपुटी पुन्हां आपला पसारा मांडते. स्वरूप आहे म्हणजे जग नाहीं व जग आहे म्हणजे स्वरूप नाहीं. स्वरूपाच्या लोपांत जग भासतें व जगाच्या लोपांत स्वरूप प्रकटतें.

**स्वस्ति श्रीवटेशु । जो लपोनि जगदाभासु ।**
**दावी मग ग्रासु । प्रगटला करी ॥ १ ॥**—( चांगदेवपासष्टी )
**तूं जयाप्रति लपसी । तया विश्व हें दाविसी ।**
**प्रगट तैं करिसी । आघवेंचि तूं ॥**—ज्ञाने० १४–४॥

तात्पर्य हें कीं, स्वरूपतन्मयतेंत जगाचें भान नाहीं व जगाच्या भानांत स्वरूपता नाहीं. असो. तर मग गुरु आणि शिष्य हा भेद कोठें असतो हो ?

**एकपण नव्हे सुसास । म्हणूनि गुरुशिष्याचें करूनि मिस ।**
**पाहणेंचि आपली वास । पाहत असे ॥ १३ ॥**

एकपणांत श्रीगुरूंना करमेना म्हणून त्यांनीं हें मिस केलें आहे, बाकी श्रीगुरुच गुरुशिष्यरूपानें नटले आहेत व आपणच आपला आनंद भोगतात !

**शिव शिवा सद्‌गुरु । तुजला गूढा काय करूं ? ।**
**एकाही निर्धार धरूं । देतासी कां ? ॥ ३७ ॥**

शिव शिव ! दर्शन, नमन, स्तवन यांपैकीं 'तुम्ही' कशाला ही विषय होत नाहीं. मनबुद्धिइंद्रियांला तुम्ही चोरून बसले आहांत, म्हणून तुमच्या

स्वरूपाविषयीं एकही निश्चय तुम्ही मला करूं देत नाहीं ! तुमच्यावर प्रेम केल्याशिवाय राहवत नाहीं, व जीव घेतल्याशिवाय ( जीवदशा नाहींशी केल्याशिवाय ! ) तुम्ही प्रेमही जमूं देत नाहीं !

नवव्या प्रकरणांत श्रीगुरूचे उपकार आठवून प्रेमभरानें म्हणतातः—

**शिव शिवा समर्था स्वामी । केवढिये आनंदभूमि ।**
**घेपे दीजे एकें आम्हीं । ऐसें केलें ॥ ६४ ॥**
**चेतचि मा चेववीलें । निद्रेलाचि मा निदविलें ।**
**आम्हींच आम्हां आणिलें । नवल जी तुझें ॥ ६५ ॥**

नित्य स्फुरद्रूप जो आत्मभाव त्याला जागें करून आत्मत्वीं नित्यनिवृत्त जी अविद्या तिची निवृत्ति केली व माझाच आत्मभाव मला प्राप्त करून मला परमानंदाच्या परमोच्च हद्दीवर आणलें हा समर्थ श्रीनिवृत्तिनाथांचा मजवर केवढा तरी उपकार आहे !

# १० ग्रंथविवेचन.

**म्हणोनि माझे नित्य नवे। श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे।**
**श्रीगुरुकृपा काय नोहे। ज्ञानदेवो म्हणे॥**

—ज्ञानेश्वरी १८–१७३५.

१ महाराजांच्या ग्रंथांचें 'आबाळसुबोध' त्व. २ मराठी भाषेचा अभिमान व आत्मप्रत्यय. ३ त्यांची ग्रंथरचना. ४ ज्ञानेश्वरी. ५ तिचें संशोधन. ६ महाभारत, व्यास व गीताशास्त्र. ७ श्रुति व गीता. ८ श्रीकृष्णार्जुनांचें अन्योन्यप्रेम. ९ श्रोत्यांची प्रार्थना. १० ज्ञानेश्वरींतील उत्कृष्ट उतारे ११ त्यांचें विवेचन. १२ अमृतानुभव. १३ हरिपाठांतील व इतर अभंग.

१. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे चरित्र आठव्या प्रकरणांतच पूर्ण झालें. त्यानंतर त्यांच्या चरित्रांतली विशेष जी त्यांची गुरुभक्ति तिचें त्यांच्याच वचनाधारें मागील प्रकरणांत विवेचन केलें. आतां प्रस्तुत प्रकरणांत त्यांनीं जडजीवांना जो ग्रंथरूपानें अक्षय्य ठेवा ठेविला आहे, त्याचा अमळ विचार कर्तव्य आहे. सामान्यतः ग्रंथकाराच्या चरित्रांत त्याच्या ग्रंथांचें विवेचन करीत असतांना गुणदोषविवेचनात्मक एक प्रकरण अवश्य लिहावें लागतें ! तसा प्रकार ज्ञानेश्वरमहाराजांच्या ग्रंथांसंबंधानें होऊं शकत नाहीं. महात्म्यांच्या ग्रंथांत दोषांचा संभव नसल्यामुळें दोष काढतां येत नाहींत व गुणांचें माप घेण्याइतकी अक्कल कोणाही प्राकृत जीवांत असणें अशक्य असल्यामुळें गुणांचा योग्य गौरवही करितां येत नाहीं व ह्यामुळें 'गुणदोषविवेचन' हें प्रकरण त्यांच्या चरित्रकाराला लिहितांच येत नाहीं ! ज्ञानेश्वरमहाराजांच्या ग्रंथांचें गौरव तरी आम्हीं कसें करावें ! जे स्वतः सर्व सद्गुणांचा कस होऊन जन्मास आले त्यांना किंवा त्यांच्या

ग्रंथांला कोणीं कोणत्या कसाला कसें लावावें ? त्यांच्या ग्रंथांत लोकोत्तर प्रेम आहे, प्रसाद आहे, वक्तृत्व आहे, दिव्यता आहे, लोककल्याणेच्छा आहे, जडजीवांच्या उद्धाराची कळकळ आहे, आणि नाहीं काय ? अवतारी विभूतीचे सर्व गुण त्यांच्या ठिकाणीं होते व ते त्यांच्या ग्रंथांत सर्वत्र प्रकट झाले आहेत. धर्मसंस्थापनेसाठीं अवतरलेल्या परमेश्वरी विभूतीचे सर्व गुण त्यांच्या चरित्रांत व ग्रंथांत स्पष्ट दिसतात. त्यांचे ग्रंथ म्हणजे "तेणें आबाळसुबोधें। वोवियेचेनि प्रबंधें। ब्रह्मरससुस्वादें। अक्षरें गुंफिलीं (ज्ञाने० १८-१७४२) असें त्यांनींच म्हटल्याप्रमाणें ब्रह्मरसानें ओथंबिलेलीं 'आबाळसुबोध' अक्षरें आहेत. आणि खरोखरच त्यांचे ग्रंथ आबाळसुबोध आहेत. ज्ञानेश्वरींत ५६ भाषांचे शब्द आहेत व ती अतिशय कठिण आहे असा लोकप्रवाद ऐकूं येतो, पण अध्यात्मविषयाचें ज्ञान असलेल्या कोणत्याही महाराष्ट्रभाषाभिज्ञ प्रेमळास त्यांचे ग्रंथ बिकट वाटू नयेत असें मला वाटतें. ज्ञानेश्वरी घ्या, अमृतानुभव घ्या. हरिपाठ घ्या, चांगदेवपासष्टी घ्या किंवा त्यांचे स्फुट अभंग घ्या—कोठेंही क्लिष्टता नाहीं. आतां एखाद्याला वेदांत व अध्यात्म विषयच माहीत नसेल किंवा सत्संगतीनें त्यांत त्याचा प्रवेश झाला नसेल तर अशा परंपराशून्य मनुष्याला तें बिकट वाटण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणें अलीकडच्या शिक्षणपद्धतीमुळें व घरांतलेंही पारमार्थिक आचारविचारांचें जुनें वळण सुटल्यामुळें परंपरेचे विचार व जुने मराठी शब्दही आज अपरिचित झाले आहेत, पण हा दोष ग्रंथांचा नसून परिस्थितीचा आहे. महाराजांच्या वाणींत जी सरलता, प्रसाद व अस्खलितपणा आहे तो पाहिला म्हणजे त्यांच्या ग्रंथांला क्लिष्ट किंवा बिकट म्हणतां येत नाहीं. आपणां सामान्य लोकांना योगप्रक्रियेची माहिती नसल्यामुळें योगाच्या खुणांचे अभंग किंवा कुंडलिनीचें वर्णन वगैरे प्रसंग अनुभवाभावीं बिकट वाटणें साहजिक आहे. त्याचप्रमाणें त्यांचे ग्रंथ सहा शतकांपूर्वीचे असल्यामुळें त्यांतील कित्येक शब्द प्रचारांतून गेले आहेत व कित्येक वेगवेगळ्या

प्रांतांतूनच प्रचारांत राहिले आहेत. अध्यात्माचा विचार व अनुभव दुर्मिळ झाल्यामुळें त्यांच्या ग्रंथांचें काठिण्य सांप्रत जास्तच वाटूं लागलें आहे. असल्या आगंतुक कारणांमुळें त्यांचे ग्रंथ बिकट वाटतात, एरव्हीं ते 'आबाळ-सुबोधच' आहेत. ज्ञानेश्वरींत ५६ भाषा नसून एकच साधी व सुलभ मराठी भाषा आहे!

२. ज्ञानेश्वरींत 'मऱ्हाठी' भाषा व 'महाराष्ट्र' देश ह्यांविषयीं प्रेमाचे व अभिमानाचे उद्गार आले आहेत. 'ये मऱ्हाठियेचिया नगरीं। ब्रह्म-विद्येचा सुकाळ करीं' (अ० १२-१६) असें महाराजांनीं म्हटलें आहे. उपसंहारांत रामदेवराव जाधवाचा उल्लेख केला आहे तेथेंही 'गोदावरीच्या कुळीं। महाराष्ट्रमंडळीं' असे शब्द आहेत. सहाव्या अध्यायाच्या प्रस्तावनेंत 'माझा बोल मराठी आहे पण अमृताला जिंकणारीं रसभरित अक्षरें मी त्यांत मिळवीन' असें त्यांनीं म्हटलें आहे:—

**माझा मऱ्हाठाचि बोल कौतुकें। परि अमृतातेंही पैजा जिंके।**
**ऐसीं अक्षरें रसिकें। मेळवीन॥ ६-१४॥**

विभूतिविस्तारयोग सांगतांना तर महाराज मौजेनें म्हणतात:—

**देशियेचेनि नागरपणें। शांत शृंगारातें जिणें।**
**वरि वोविया होती लेणें। साहित्यासी॥ ४२॥**
**मूळ ग्रंथींचिया संस्कृता-। वरि मऱ्हाठी नीट पाहतां।**
**अभिप्राय मानालिया चित्ता। कवण भूमी हे न चोजवे॥ ४३॥**
**जैसें आंगाचेनि सुंदरपणें। लेणिया आंगचि होय लेणें।**
**तेथ अळंकारिलें कवण कवणें। हें निर्वचेना!॥ ४४॥**[1]

---

१ ही ओवी वाचून संस्कृतज्ञांस कालिदासाची आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं. अशीच कल्पना त्याच्या कुंमारसंभव व विक्रमोर्वशीय ह्या काव्यांत दोनदां येऊन गेली आहे. 'अन्योन्यशोभाजननाद्बभूव साधारणो भूषणभूष्य-भावः' (कु०) दुसरा प्रसंग:—

( पान १८७ पहा )

**तैशी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं । शोभती आयणी । चोखट आइका ॥ ४५ ॥**

अर्थः—" देशी म्ह० मराठी भाषेच्या नागरपणामुळें ( नागर म्ह० नगरांत राहणारा, सुधारलेला, चांगला. जसें:—' नगरांतरीं वसिजे । तरी नागराचि होइजे ' अ० १–४१ ) म्ह० उत्कृष्टत्वामुळें शांतरसानें शृंगाररसाला जिंकलें आहे आणि शिवाय ह्या माझ्या ओव्या साहित्यशास्त्रालाही अलंकार झाल्या आहेत. मूळ संस्कृत श्लोक व त्यावरच्या माझ्या मराठी ओव्या जर सूक्ष्मरीतीनें कोणी ताडून पाहील व त्यांतील अभिप्राय ध्यानांत आणील तर मूळ कोणतें व रूपांतर कोणतें हें सुद्धां त्यास कळणार नाहीं ! ! अंगाच्या सुंदरपणामुळें जसें अंगच अलंकारांना अलंकार होतें, मग तेथें कोणामुळें कोणाला शोभा आली हें सांगतां येत नाहीं, त्याप्रमाणें मराठी भाषा व संस्कृत भाषा ह्या समानयोग्यतेमुळें एका भावार्थाच्या सुखासनावर बसल्या आहेत !" हे महाराजांचे उद्गार किती यथार्थ आहेत हें ज्ञानेश्वरांच्या सहृदय वाचकांना तरी सांगणें नकोच. पुन्हां अकराव्या अध्यायांत ते म्हणतात कीं, ह्या विश्वरूपदर्शनाच्या अध्यायांत शांतरसाच्या घरीं अद्भुतरस पाहुणा आला असून लग्नांतल्या वऱ्हाड्यांप्रमाणें येथें इतर रसांचाही योग्यतेप्रमाणें मान ठेवण्यांत आला आहे !:—

**जेथ शांताचिया घरां । अद्भुत आला आहे पाहुणेरा ।**
**आणि येरांही रसां पांतिकरा । जाहला मान ॥ २ ॥**

**आभरणस्याभरणं प्रसाधनविधेः प्रसाधनविशेषः ।**
**उपमानस्यापि सखे प्रत्युपमानं वपुस्तस्याः ॥ १ ॥**

---

( पान १८६ वरून समाप्त )

रघुवंशांतला पहिला श्लोक ' जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ ' व अमृतानुभवांतली पहिली ओवी ' ऐशीं इयें निरुपाधिकें । जगाचीं जियें जनकें । तियें वंदिलीं मिया मूळिकें । देवोदेवी ' ह्यांत किती मजेचें साम्य आहे ! ज्ञानेश्वरांनीं कालिदासाचें ग्रंथ वाचले होते कीं नाहीं कोण जाणे, पण कालिदास त्यांच्यांत होता एवढें मात्र खास !

**अहो वधूवरांचिये मिळणी । जैशीं वराडियाही लुगडीं लेणीं ।**
**तैसे देशियेचिया सुखासनीं । मिरवले रस ॥ ३ ॥**

मराठी भाषेच्या साम्राज्यांत शांतरसाला ज्ञानेश्वरमहाराजांनीं मूर्धाभिषिक्त करून प्रथमस्थान दिलें आहे हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. 'शृंगारवीरकरुणादि नवांरसांची ' हा अनुक्रम मराठी भाषेच्यासंबंधानें खरा नसून महाराष्ट्र शारदेच्या राज्यांत ज्ञानेश्वरमहाराजांनीं पुरोहितपणानें शांतरसालाच अग्रमान देऊन सिंहासनावर बसविलें आहे, व त्यांच्या ह्या योजनेचा मान आज सहाशें वर्षें मराठी संतकवींनीं कायम राखला असून शांतरसाच्या अगलाखालीं भक्तिज्ञानवैराग्य ह्या त्रयीनें सारें महाराष्ट्रमंडळ आपल्या काबूंत ठेविलें आहे! असो. महाराज पुढें म्हणतातः—

**तीरें संस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाठी शब्दसोपानें ।**
**रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥ ९ ॥**
**म्हणोनि भलतेणें येथ सद्भावें नाहावें ।**
**प्रयागमाधव विश्वरूप पहावें ।**
**आणि संसारासि द्यावें । तिळोदक ॥ १० ॥**

संस्कृताचे दुर्लंघ्य झालेले तट तोडून माझ्या श्रीगुरूंनीं मराठी शब्दांचा सोपा दादर तयार केला आहे म्हणून येथें वाटेल त्यानें सद्भावानें स्नान करावें व विश्वरूप प्रयागमाधवाचें दर्शन घेऊन संसारावर तिळोंदकें द्यावें! तेराव्या अध्यायांत महाराज पुन्हां म्हणतातः—

**तो कृष्णार्जुनसंवाद । नागरीं बोलीं विशद ।**
**सांगोनि दाऊं प्रबंध । वोवियेचा ॥ ११५६ ॥**
**नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा ।**
**जे शृंगाराच्या माथां । पाय ठेवी ! ॥ ११५७ ॥**
**दाऊं वेल्हाळ देशी नवी । जे साहित्यातें वोजावी ।**
**अमृतातें चुकी ठेवी । गोडसपणें ॥ ११५८ ॥**
**बोल वेल्हाळवितेनि गुणें । चंद्रासि घे उमाणे ।**
**रसरंगा भुलवणें । नाद लोपी ॥ ११५९ ॥**

खेचराचियाही मना । आणी सात्विकाचा पान्हा ।
श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ ११६० ॥
तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेसीं विश्व भरूं ।
आनंदाचा आवारू । मांडूं जगा ॥ ११६१ ॥
फिटो विवेकाची वाणी । हो कानामना जिणी ।
देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ११६२ ॥
दिसो परतत्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोधसुकाळा । माजी विश्व ॥ ११६३ ॥
म्हणोनि अक्षरीं सुभेदीं । उपमा श्लोक कोंदाकोंदी ।
झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी ॥ ११६४ ॥
हा ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें ।
केलें असे श्रीमंतें । श्रीगुरुरायें ॥ ११६६ ॥

तात्पर्य:—"लोकांना प्रिय झालेला जो शृंगार त्याच्या मस्तकावर पाय ठेवील असा शांतरस मी आतां बोलेन. नवी व परमप्रिय अशी मराठी भाषा मी आतां लीलेनें दाखवीन—कीं जी साहित्य शिकवील, व गोडींत अमृताला मागें सारील. शांतरसानें पूर्ण अशा चंद्राशीं माझ्या ओव्या बरोबरी करतील, व रसरंग खुलवून सोडतील. तेणेंकरून तामस वृत्तीच्या पिशाच्यांच्या मनाला सुद्धां सात्विकप्रेमाचा पान्हा फुटेल. शुद्धचित्त पुरुषाला तरें श्रवणाबरोबर समाधि लागेल. अशा प्रकारचा रम्य वाग्विलास आतां विस्तारूं. गीतार्थानें विश्व भरून टाकूं. जगाला आनंदाचें आवार घालूं. तेणेंकरून विवेकाचें दारिद्र्य फिटेल. कानामनाला सजीवता येईल. वाटेल त्यांना ब्रह्मविद्येची खाण उघडेल. परतत्व डोळ्यांना दिसेल, सुखाचा उदय होईल, आत्मबोधाच्या सुकाळांत विश्व बुडून जाईल. हें सर्व होईल. मी आपल्या ग्रंथांत मार्मिक शब्दांची योजना करून प्रतिपदीं गीतारहस्य प्रकट करीन व उपमादिकांची गर्दी करून सोडीन. मी हें सर्व करीन, कारण एवढें सामर्थ्य देऊन माझ्या श्रीगुरूंनीं मला पूर्ण विद्यावंत केलें आहे."

३. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे चार ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यांची **भावार्थ-दीपिका** उर्फ ज्ञानेश्वरी, **अमृतानुभव**, **हरिपाठाचे अभंग** व **चांगदेव-पासष्टी**. ह्याशिवाय त्यांचे सातआठशें अभंग तूर्त उपलब्ध झाले आहेत. त्यांनीं योगवासिष्ठावर टीका केली होती असें नामदेवांनीं समाधीच्या अभंगांत म्हटलें आहे. तो ग्रंथ कोठेंही उपलब्ध झालेला नाहीं. ज्ञानेश्वरीचे जे कर्ते तेच अभंगांचेही कर्ते होत. ज्ञानेश्वरीपेक्षां अभंगांची भाषा सोपी आहे म्हणून दोन ज्ञानेश्वर झाले असावेत असें मत मागें एकवार निघून त्याचा बराच खल झाला होता. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव ह्या ग्रंथांचे जे कर्ते त्यांच्याच मुखांतून हरिपाठ व इतर अभंग निघाले आहेत अशी आपली पूर्वपरंपरेची समजूत आहे व ती बरोबर आहे असें वरील ग्रंथ बारकाईनें वारंवार पाहून माझी खात्री झाली आहे. हरिपाठांतले व इतर अभंग यांची भाषा ज्ञानेश्वरीभाषेहून फार सोपी व अर्वाचीन आहे आणि हरिपाठादि अभंगांत पंढरी व विठ्ठल यांचें महात्म्य व अत्यंत प्रेमाचें वर्णन असून ज्ञानेश्वरींत त्यांचा उल्लेखही नाहीं असे दोन आक्षेप वरील समजुती-विरुद्ध घेण्यांत येतात. हे आक्षेप विचार करण्यासारखे आहेत यांत शंका नाहीं; तथापि त्यांना तसेंच सयुक्तिक उत्तरही देतां येतें. भाषेचा प्रश्न कित्येक शोधकांस अत्यंत महत्वाचा वाटतो व तो तसा आहेही, पण ज्ञानेश्वरमहाराजांच्या ग्रंथाची एकही अस्सल प्रत मिळाली नसल्यामुळें त्या-बद्दल शोधकांनीं उगीच तर्कांच्या व कल्पनेच्या भराऱ्या मारीत बसणें युक्त नाहीं. ज्ञानेश्वरीची भाषा हरिपाठादि अभंगांपेक्षां कठिण व प्राचीनतर भरी वाटते, पण त्यांत विचारांत घेण्यासारखी एक गोष्ट आहे. ज्ञाने-श्वरीची विशेष प्रसिद्धि नाथांच्या वेळेपासून झाली असल्यामुळें तिच्या भाषेची दुर्बोधता कायम राहिली व शिवाय ज्ञानेश्वरी हा मोठा ग्रंथ असून

१ ज्ञानेश्वरांचें योगवासिष्ट म्हणून एक अगदीं गचाळ ग्रंथ धुळ्याच्या **सत्कार्योत्तेजक सभेनें** छापला होता पण तो त्यांचा नाहीं असें सभेनें मागाहून **कबूल केलें**!

हरिपाठादि अभंग हजारों लोकांच्या नित्य पाठांतले असल्यामुळें अभंगांच्या भाषेला अर्वाचीनत्व आलें आहे. हरिपाठाचे अभंग भक्तिप्रधान् सुलभ व प्रत्यहीं अठरापगड जातींच्या लोकांच्या तोंडांत आल्यामुळे त्यांना सहजासहजीं अर्वाचीनत्व येत गेलें. ग्रंथांची भाषा जितकी मूळाला धरून रहाते तितकी आबालवृद्धांच्या व स्त्रीपुरुषांच्या नित्य तोंडीं असणाऱ्या अभंगांची भाषा राहणें प्रायः दुरापास्त आहे. ज्ञानेश्वरमहाराजांच्या वेळची ज्ञानेश्वरीची व हरिपाठाची पोथी जर आज सांपडेल तर त्या दोहोंची भाषा एक सारखी मिळण्याचा अत्यंत संभव आहे; पण ज्ञानेश्वरी बहुतकाळ नुसती पोथींत राहिल्यामुळें व हरिपाठाइतकी ती लोकांच्या तोंडीं राहणें केव्हांही अशक्य असल्यामुळें तिच्या भाषेंतलें प्राचीनत्व अधिक प्रमाणानें कायम राहिलें. हा भाषेसंबंधाचा विचार झाला, आतां उपास्यासंबंधानें विचार पाहूं. ज्ञानेश्वरींत व अमृतानुभवांत पंढरीच्या विठोबाचें नांवही नसून केवळ श्रीगुरूंचेंच महात्म्य वर्णिलें आहे. ही गोष्टही कांहीं मोठी कूटांतली नाहीं. ज्ञानेश्वरमहाराजांनीं नेवाशास निवृत्तिनाथांसमोर ज्ञानेश्वरी सांगितली व मुकुंदराजांचें उदाहरण देऊन स्वतंत्र ग्रंथ करण्यास श्रीगुरूंनीं ज्ञानेश्वरमहाराजांस सांगितलें तेव्हां निवृत्तिनाथांसमोरच त्यांनीं अमृतानुभव सांगितला ! ! ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे ग्रंथ साक्षात् श्रीगुरुनिवृत्तिनाथांच्या प्रेरणेनें व आज्ञेनें त्यांच्या समक्ष त्यांच्यासमोर होत असतांना त्यांत गुरुगौरवपर उद्गार येणेंच साहजिक आहे. असा प्रकार हरिपाठाचा नाहीं. ज्ञानेश्वरमहाराज नेवाशास वरील दोन ग्रंथ संपवून कांहीं काळानें तीर्थयात्रेस निघाले व पंढरीस आले. पंढरीस विठ्ठलमंदिराच्या जीर्णोद्धाराचें अलीकडेच समाप्त झालेलें काम पाहून व नामदेवादि विठ्ठलभक्तांच्या विठ्ठलप्रेमाच्या गोष्टी ऐकून व पाहून त्यांना मिळालेल्या उपासनेंतलें त्यांचें विठ्ठलप्रेम द्विगुणित झालें व जाणत्यानेणत्या करितां रचलेल्या हरिपाठांत त्यांनीं सर्वांचें परमप्रिय उपास्य जें श्रीविठ्ठल याच्याच प्रेमानें भरलेले उद्गार काढले. तात्पर्य, त्यांचे दोन मुख्य ग्रंथ.

श्रीगुरूसमोर झाले असल्यामुळें व तेव्हां पंढरीच्या कीर्तनसोहळ्याचा एवढा आनंद त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेला नसल्यामुळें त्यांत श्रीगुरुमाहात्म्यच सर्वत्र वर्णिलें आहे व हरिपाठ (हरिपाठाचे अभंग म्हणजे वारकऱ्यांची संध्या होय!) ज्यांच्यासाठीं मुख्यतः केला ते विठ्ठलोपासक असल्यामुळें त्यांत विठ्ठलगौरवच आलें आहे. 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' तेंच श्रीगुरुनिवृत्तिनाथ व तेच पंढरीचे श्रीविठ्ठल होत ही भावना महाराजांची दृढ होती हें काय कोणी सांगायला पाहिजे?

४. आतां प्रथम आपण ज्ञानेश्वरीचा विशेष विस्तारानें विचार करूं. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ मराठी भाषेंत जसा कालानें तसा योग्यतेनेंही पहिलाच आहे. धर्मग्रंथ म्हणून, काव्य म्हणून, व्यवहारनीति शिकविणारा म्हणून—कोणत्याही दृष्टीनें ज्ञानेश्वरीकडे पहा-ज्ञानेश्वरीचें सिंहासन डळमळायला लावणारा दुसरा ग्रंथच झाला नाहीं. कोणी ज्ञानेश्वरींतले सिद्धांत व विषयप्रतिपादनाची रम्य शैली पाहून डोलेल; कोणी भाषागौरव व उपमा-दृष्टांतादिकांची समर्पक योजना पाहून नाचेल; कोणी दृष्टांतद्वारां महाराजांनीं व्यक्त केलेलें व्यवहारज्ञान पाहून चकित होईल; कोणी महाराजांची निस्सीम गुरुभक्ति व त्यांच्या वाणींतलें अद्भुत प्रेम पाहून रंगेल; कोणी कर्म, ज्ञान व उपासना ह्यांतील सिद्धांत—शास्त्र व व्यवहार यांचा उत्कृष्ट मेळ बसेल अशा पद्धतीनें—महाराजांनीं मांडलेले पाहून संतुष्ट होईल. पण एवढें खरें कीं, जो जो ज्ञानेश्वरीचा परिचय करूं जाईल तो तो परम समाधान पावेल. ज्ञानेश्वरीचें अंतरंग संतसज्जनांना सुखवील व शब्दसौष्ठव रसिकांना रमवील. शब्दही गोड व अर्थही गोड. महाराजांनींच आपल्या वाचकांचें द्विविधत्व ओळखूनच कीं काय कोण जाणे "तैसें अध्यात्मशास्त्रीं इये। अंतरंगचि अधिकारिये। येर लोक वाक्चातुर्यें। होईल सुखिया" (अ० १८-१७५०) असें म्हटलें आहे. ज्ञानेश्वरींत परमार्थ व प्रपंच दोन्ही सांगितले आहेत. **महाराजांनीं सिद्धांतांत परमार्थ व दृष्टांतात व्यवहार शिकविला आहे.** उपमा, रूपक व दृष्टांत यांच्या द्वारें त्यांनीं

व्यवहारनीतिबोध केला आहे. सोन्याचे मणि सोन्याच्याच सुतानें ओवावेत तसा त्यांनीं अध्यात्माच्या दोरांत व्यवहार असा उत्कृष्ट ओंवला आहे कीं प्रपंच, परमार्थ यांत बिलकुल वेगळिक करतां येत नाहीं असाच बोध ज्ञानेश्वरीच्या वाचकांस होतो. हा एकच ग्रंथ पुरें आहे. अशी सर्वांगपूर्णता त्यांत आहे. असो. महाराजांच्या वेळीं १५।१५॥ किंवा १६ दराचें सोनें होतें; 'त्रिमाळिकें धवळारें' म्ह० तीनमजली चुनेगची वाडे व गवताच्या झोंपड्या होत्या; चव्हाट्यावर दुकानें उघडत असत; अन्नछत्रें होतीं, गारुडी व बहुरूपी होते, टांकसाळी, नाणीं व कातड्याच्या नोटी डांकलग अलंकार, सोन्यामोत्याचे दागिने यांचाही प्रसार होता; मंदिरें, मठ, दीपमाळा, नगारे, संन्यासी, वेश्यागारें, चेंडुलगोऱ्याचा खेळ हे सर्व होते; या बाजूनें ज्ञानेश्वरीकडे पाहूं लागणाऱ्यास तत्कालीन देशस्थितीचें पुष्कळ ज्ञान होईल. ज्ञानेश्वरींत शेतकी, ज्योतिष, सूपशास्त्र, शिकार इत्यादि धंद्यांतली विविध प्रकारची माहिती सांपडते. सूर्य हा खरोखरी चालत नसून पृथ्वीच्या परिभ्रमणामुळें चालल्या सारखा दिसतो. "आणि उदोअस्ताचेनि प्रमाणें। जैसें न चलतां सूर्याचें चालणें" हा ज्योतिषसिद्धांत ज्ञानेश्वरींत सांपडतो. समुद्राच्या पाण्यापासून मेघ बनतात, ते पावसाच्या रूपानें पृथ्वीवर येऊन नद्या भरतात व नद्या समुद्राला मिळून पुन्हां मेघोदक बनतें हा भौतिकशास्त्रांतला बाष्पीभवनाचा सिद्धांत त्यांत आढळतो. भौतिकशास्त्राच्या किंवा इतिहासाच्या किंवा भाषेच्या विद्यार्थ्यांनाही ज्ञानेश्वरीच्या अध्ययनापासून लाभ होईल. ज्ञानेश्वरमहाराजांसारख्या योगेश्वरांना भौतिकशास्त्रें पाहिल्याशिवायही त्यांतील सिद्धांत बरोबर कळतात. सूक्ष्मांत बसून पाहणाऱ्याला स्थूळाचें यथार्थ ज्ञान असतें, त्याला कांहीं स्थूळाचें अध्ययनच करायला पाहिजे असें नाहीं. ह्याप्रमाणें कोणीही कोणत्याही बाजूनें ज्ञानेश्वरीचें अध्ययन करील तरी त्यास त्याच्या अपेक्षेप्रमाणें लाभ होईल.

५. **ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत** मिळविण्याचे प्रयत्न नाथांच्या वेळेपासून आजवर अनेक झाले, पण त्या सर्वांत नाथांचाच प्रयत्न अधिक यशस्वी

व सर्वमान्य झाला आहे. एकनाथमहाराजांनीं ज्ञानेश्वरीचें संशोधन केलें व ज्ञानेश्वरीवर पैठणास पुराण सांगण्याचा प्रघात पाडला. नाथांच्या पूर्वीं ज्ञानेश्वरी महाराष्ट्रीयांस माहीत नव्हती असें नाहीं, तथापि ज्ञानेश्वरीची योग्यता नाथांनीं लोकांस पटविली व तिची अधिक गोडी लावून दिली ही गोष्ट निर्विवाद आहे. 'विश्रांतीचें स्थान संतांचें माहेर। तें या भूमीवर अलंकापूर' असें लोकांस सांगून आळंदीचें माहात्म्यही नाथांनीं वाढविलें. यांच्या वेळेपासून आळंदीच्या यात्रेचा प्रघात जास्त पडला व ज्ञानेश्वरमहाराजांविषयीं महाराष्ट्रीयांची परम पूज्यबुद्धिही फार वेगानें वाढत गेली. नाथ शके १५०५ मध्यें आळंदीहून गेल्यानंतर यात्रा वाढत चाललीसें पाहून आंबेकर देशपांड्यानें ११ वर्षांनीं समाधिमंदिर बांधलें तें आजपर्यंत त्याच स्वरूपांत आहे. तुकोबारायांनीं स्वतः एका बाजूची भिंत बांधल्याचें सांगतात. ज्ञानोबारायांच्या समाधीपुढला भव्य सभामंडप शिंद्यांचे कारभारी रामचंद्र मल्हार यांनीं शके १६८२ मध्यें बांधला. ज्ञानेश्वरी ग्रंथाचें संशोधन करून त्यावर पुराणें सांगून व आळंदीच्या यात्रेचा प्रघात जारीनें पाडून एकनाथांनीं ज्ञानेश्वरमहाराजांच्या ऋणांतून आपणांस मुक्त करून घेतलें. एकनाथांस ज्ञानेश्वरांचा अवतार समजतात-त्यामुळें त्यांनीं केलेली सुधारणा साक्षात् ज्ञानेश्वरांनीं केलेल्या सुधारणे, इतकीच विश्ववंद्य झालेली आहे. नाथांनीं मूळ ज्ञानेश्वरींत ज्या किमयेच्या ओव्या होत्या त्या काढून टाकल्या व कांहीं ओव्या पदरच्या घातल्या असें कित्येक विद्वानांचें मत आहे; पण तें साधार दिसत नाहीं. त्यांनीं 'पाठांतरीं शुद्ध अबद्ध' झालेले पाठ पहिल्यासारखे सुसंगत केले, पण मूळ ओव्यांत त्यांनीं फिरवाफिरव केली असें मानण्यास कांहीं आधार नाहीं! ज्ञानेश्वरीच्या पाठांत जो पदरची ओवी करून घालील त्यानें अमृताच्या ताटांत नरोटी ठेवल्यासारखें निंद्य होईल असा शेरा मारून ठेवणारे नाथ स्वतःच्या कांहीं ओव्या ज्ञानेश्वरींत घुसडून देतील हें संभ-

वत नाहीं. विस्कळित झालेल्या ओव्या त्यांनीं नीट केल्या पण अगदींच स्वतंत्र ओव्या त्यांत दडपून दिल्या असें म्हणण्यास कांहीं तसाच स्पष्ट पुरावा पाहिजे. असाच प्रयत्न काशीक्षेत्रीं राहणाऱ्या नगर जिल्ह्यांतील रघुनाथशिष्य भास्कर नामक पुरुषानें नाथांनंतर केला. ह्या भास्करानें ज्ञानेश्वरीला४००ओव्यांची स्वतंत्र पुरवणी जोडलेली माझ्या पाहण्यांत आलेली आहे. त्या पुरवणीवरून ज्ञानेश्वरींत अशुद्ध पाठ कोणत्या कारणांनीं घुसडले असावेत याचें अनुमान होतें. भास्कर म्हणतो:—

**अर्थवेली ढळलिया । मात्रका निघोनि गेलिया ।**
**वोविया अशुद्ध जालिया । लेखकयोगें ॥ १९२ ॥**
**प्रती जालिया बहुतीं । जेहीं लिहिलें बाळमती ।**
**त्यांचिया आल्या युक्ति । म्हणोनि अर्थ ढांसळला ॥ १९३ ॥**

भास्कराच्या म्हणण्याप्रमाणें अशुद्ध प्रति व अशुद्ध ओव्या लेखकांच्या प्रमादानें पसरल्या व लिहिण्यांत अर्थवेली ढळल्या व मात्राकाने निघोन गेले. ज्ञानेश्वरींत कोणी ओव्या मागून घुसडून दिल्यां व त्यामुळें क्षेपक ओव्या त्यांत शिरल्या असें भास्कर म्हणत नाहीं. मूळ ग्रंथाविषयींच्या पूज्यभावामुळें त्यांत भाविक लोक पदरच्या ओव्या करून सहसा घालणार नाहींत. एकनाथांनीं सुद्धां ज्ञानेश्वरीच्या प्रती मिळविल्या; पण ‘ पाठांतरीं शुद्ध अबद्ध’ ज्या झाल्या होत्या तेवढ्याच ओव्या त्यांनीं शुद्ध करून नवीन प्रत तयार केली व तिचेंच पाठ महाराष्ट्रांत चालू आहेत.

**ज्ञानेश्वरीपाठीं । जो वोवी करील मराठी ।**
**तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ १ ॥**

या ओळींत ‘ पाठीं ’ याचा अर्थ ‘ नंतर ’ असा कोणी करितात; पण तो चुकीचा आहे. तसा अर्थ घेतल्यास ज्ञानेश्वरीनंतरच्या ओवीबद्ध ग्रंथांना ‘ नरोट्या ’ म्हटल्याचा दोष नाथांवर येईल व स्वतः पाऊण लाख ग्रंथ रचणाऱ्या नाथांवर तसा दोष येऊं देणें युक्त नाहीं. ‘पाठीं’

याचा अर्थ 'पाठांत' असाच पाहिजे. ज्ञानेश्वरीच्या पाठांत पदरच्या ओव्या कोणी घालूं नयेत असा नाथांनीं निर्बंध करून ठेविला. नाथांच्या म्हणून ज्या चारयमकी व चारचरणी पांचसहा ओव्या ज्ञानेश्वरींत आढळतात, त्याही सर्वांशीं नाथांच्या नसाव्यात, कानामात्रा किंवा एखादा चरण ढळलेला तेवढा नाथांनीं शुद्ध करून घातलेला असावा.

६. ज्ञानेश्वरीच्या उपोद्घातउपसंहारांत **महाभारत ग्रंथ, भारतकर्ते व्यासोनारायण** आणि **गीताशास्त्र** यांचा जो महाराजांनीं गौरव केला आहे तो अतिशय बहारीचा आहे. महाभारताचें गौरव करतांना "जें सकळकथा जन्मस्थान, प्रमेयमहानिधि, नवरससुधाब्धि, सर्व विद्यांचें मूळपीठ, अशेष शास्त्रजातांचें वसौट म्ह० आश्रयस्थान," इत्यादि विशेषणें त्यास लावून महाराज म्हणतात कीं, महाभारत सकळ धर्मांचें माहेर, सज्जनांचें जिव्हार व शारदेचें लावण्यरत्नभांडार आहे, किंबहुना व्यासांच्या बुद्धींत आविष्करून प्रत्यक्ष भारती ( सरस्वती ) च भारतरूपानें प्रकटली आहे! आणि म्हणूनच "एथ चातुर्य शाहणें झालें। प्रमेय रुचीस आलें। सौभाग्य पोखलें। सुखाचें एथ॥" रसांना येथें डौल चढला, कलाकुशलता यांना येथें तेज चढले, शब्दश्री येथें शोभली, विवेकतरूंना येथें बहर आला, व महाबोध येथें कोंवळा होऊन सर्वसेव्य झाला! पुराणें सुद्धां आपणांस पूर्ण प्रतिष्ठा प्राप्त व्हावी म्हणून सानीव म्ह० लघुपण पांघरून आख्यानरूपानें भारतांत प्रविष्ट झालीं! ह्याप्रमाणें वेदशास्त्रपुराणांचा अर्क काढून व्यासांनीं हा भारताख्य अपूर्व मेवा तयार केला असल्यामुळें:—

**म्हणऊनि महाभारतीं नाहीं। तें नोहे लोकीं तिहीं।**
**येणेंकारणें म्हणिपे पाहीं। व्यासोच्छिष्ट जगत्रय॥ ४७॥**

असला महाभारत ग्रंथ व त्यांतही अमूल्य गीतारत्न जगाला देणाऱ्या व्यासांची बुद्धिमत्ता काय सांगावी आणि त्यांचे उपकार तरी केवढे म्हणून म्हणावेत?

भानुतेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळलें ।
तैसें व्यासमती कवळलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥

वेदशास्त्रपुराणांचा अर्क महाभारत आणि महाभारताचा अर्क गीताशास्त्र असल्यामुळें गीताशास्त्रांत सर्व शब्दब्रह्म प्रकट झालें आहे.

आतां भारतकमलपराग । गीताख्य प्रसंग ।
जो संवादला श्रीरंग । अर्जुनेसीं ॥ ५० ॥
नातरी शब्दब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धी ।
निवडलें निरवधि । नवनीत हें ॥ ५१ ॥

गीतेची महती केवढी आहे !——

जे अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं ।
सोहंभावें पारंगतीं । रमिजे जेथ ॥ ५३ ॥

अशी ही गीता सामान्य ग्रंथांसारखी ओरबाडून टाकायची नाहीं तर शरदतूंतल्या चंद्रकळेचे कोंवळे अमृतकण चकोरतलगें ( चकोराचीं पिलें ) जशीं मवाळ ( कोंवळ्या ) मनानें घेतात, त्याप्रमाणें हें गीतामृत श्रोत्यांनीं 'अति हळुवारपण चित्तां आणूनियां' प्राशन केलें पाहिजे.

हें शब्देंवीण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे ।
बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ॥ ५८ ॥

चंचलपणा सोडून 'गंभीरपणें व स्थिरावलेनि अंतःकरणें' जो गीतेकडे पाहील त्याचाच गीताशास्त्र पाहण्याचा अधिकार आहे. गीताशास्त्र हें संसार जिंकणारें शस्त्र आहे किंवा गीतेचीं अक्षरें हीं आत्मा अवतरविणारे म्हणजे जीवपणाचें दारिद्र्य घालवून आत्मभाव उद्दीपित करणारे मंत्र आहेतः——

साचाचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पै संसार जिणतें शस्त्र ।
आत्मा अवतरवी ते मंत्र । अक्षरें इयें ॥ अ० १५–५७७ ॥

गीता ही समस्तमोह घालविणारी ज्ञानवल्ली आहेः——

हे बोलों कांय गीता । हे माझी उन्मेषलता ।
जाणे तो समस्तां । मोहा मुके ॥ अ० १५–५८३ ॥

हें गीतानाम विख्यात । सर्व वाङ्मयाचें मथित
आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय ॥ अ० १८–१३२३ ॥
कीं गीता हे सप्तशती । मंत्रप्रतिपाद्य भगवती ।
मोहमहिषा मुक्ती । आनंदली असे ॥ १६६७ ॥
कीं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडव जाली आहे गीता ।
संसारपथश्रांता । विसंबावया ॥ १६७० ॥
कीं निजकांता आत्मया । आवडी गीता मिळावया ।
श्लोक नव्हती बाह्या । पसर कां जो ॥ १६७४ ॥

इत्यादि प्रकारें गीतागौरव करतांना गीतेचे सातशें श्लोक 'एक एका आगळे' एकापक्षां एक सरस असल्यामुळें त्यांत उत्तम कनिष्ठ अशा प्रकारची निवड करायलाही येत नाहीं असें महाराज म्हणतातः 'दीपा आगिल मागील । सूर्य धाकुटा वडील । अमृतासिंधु खोल । उथळ कायसा ?' ( १६८० ). गीताशास्त्राचा एक विशेष असा आहे कीं, तेथें श्रीकृष्णच वाच्य आणि श्रीकृष्णच वाचक आहेत ! येथें 'अर्थें तेंचि पाठें' फळ मिळतें व अन्य ग्रंथांचा जसा 'अर्थ सार शब्द फोल' असा प्रकार असतो तसा येथें नसून सारी गीता ही प्रभूची वाङ्मयी मूर्तिच आहेः—

म्हणोनि मज कांहीं । समर्थनीं आतां विषय नाहीं ।
गीता जाणा हे वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभूची ॥ १६८५ ॥
शास्त्र वाच्यें अर्थें फळे । मग आपण मावळे ।
तैसें नव्हे, हें सगळें । परब्रह्मचि ॥ १६८६ ॥

देवानें अर्जुनाच्या मिषानें महानंद सोपा केला आहे ही त्याची मानवांवर केवढी कृपा आहे !:—

कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद सोपा ।
अर्जुनव्याजें रूपा । आणिला देवें ॥ १६८७ ॥
चकोराचेनि निमित्तें । तिन्ही भुवनें संततें ।
निववलीं कळावंतें । चंद्रें जावें ॥ १६८८ ॥

कृष्णार्जुनांचा संवाद व्यासांनीं ग्रंथरूपानें प्रकट केला नसता तर जगाला कोठून मिळता ? 'म्हणोनि व्यासाचा हा थोर । विश्वासि जाला उपकार.'

कोणी गीतेचा अर्थ न समजतां नुसतें पठण करील, कोणी अर्थज्ञान करून घेईल, कोणी नुसतें श्रवणच करील. पण मोक्षप्रासादीं सर्वांना सारखीच गति आहे. जातिवंत धनिकांच्या घरीं वरिष्ठ कनिष्ठ सर्व लोकांना पंक्तिभेद केल्याशिवाय एकसारखें अन्न वाढलें जातें तसाच प्रकार गीता-माउलीच्या घरीं आहेः—

**समर्थाचिया पंक्तिभोजनें । तळिल्यावरिल्या एक पक्वान्नें ।**
**तेंवि श्रवणें अर्थें पठणें । मोक्षचि लाभे ॥ अ० १८–४८ ॥**

पुष्कळ मोतीं एकवटलीं म्हणजे एकावळी हार होतो पण तेथें शोभा एकच असते, किंवा फुलें व फुलसर ( दोरे ) वेगळे असतात पण द्रुती ( सुगंध ) एकच असतो त्याप्रमाणें गीतेंत १८ अध्याय व ७०० श्लोक आहेत तरी देवांनीं एकच गोष्ट सांगितली आहेः एकमेवाद्वितीय ब्रह्म आहे व ब्रह्माहून दुसरें कांहीं नाहींः 'देव बोलिले येक । जें दुजें नाहीं.'

पुढें महाराज म्हणतात, कीं ' ती सोय ( मार्ग, धोरण ) न सोडतां ' म्ह० पूर्ण अद्वैताची कास धरून मीं ही ग्रंथरचना केली आहे. गीता अद्वैत-प्रतिपादक असून माझी ज्ञानेश्वरीही अद्वैतप्रतिपादकच आहे असें महाराजांना येथें सांगावयाचें आहे व ह्या प्रतिज्ञेप्रमाणें ज्ञानेश्वरीभर त्यांनीं अद्वैतामृताचा वर्षाव केला आहे. अध्यायाची संगति, श्लोकांचे भावार्थ किंवा शब्दांचे स्पष्टार्थ देतांनाही त्यांचें हें एक धोरण सर्व ग्रंथभर कायम राहिलें आहे. 'एवं जन्यजनकभावें । अध्याय अध्यायातें प्रसवे' ह्या त्यांच्या म्हणण्याप्रमाणें त्यांनीं प्रत्येक अध्यायाची व श्लोकाची संगति मोठ्या मजेनें लाविली आहे. कृष्ण, अर्जुन, धृतराष्ट्र व संजय ह्यांच्या स्वभावांचीं हुबेहूब चित्रें त्यांनीं त्यांच्या वचनांचें विवेचन करतांना जशीं सूक्ष्मदृष्टीनें काढिलीं आहेत तशीं तुम्हांला कोणत्याही गीताटीकेंत पहावयास मिळणार नाहींत !

७. ज्ञानेश्वरीच्या शेवटीं शेवटीं गीतामाहात्म्य सांगतांना तिसऱ्या अध्यायांत कर्मकांड, चवथ्यापासून बाराव्याच्या अर्धापर्यंत देवताकांड व बाराव्याच्या मध्यापासून पंधराव्याच्या अंतापर्यंत ज्ञानकांड ह्याप्रमाणें गीतेंत

कर्मउपासनाज्ञान हे तिन्ही सांगितले असल्यामुळें 'गीता कांडत्रयरूपिणी। श्रुतीच -हे कोडिसवाणी ॥' म्हणजे गीता ही चिमुकली श्रुतिच आहे असें महाराजांनीं म्हटलें आहे ! श्रुतीप्रमाणें गीताही मोक्षफळ देणारी आहे, पण ती औदार्यगुणांत श्रुतीहूनही श्रेष्ठ आहे. श्रुतीचा अधिकार तीन वर्णांसच आहे; पण स्त्रीशूद्रादिकांस श्रुतीचा अधिकार नसल्यामुळें श्रुतीवर कृपणत्वाचा दोषारोप होण्यासारखा आहे:—

**वेद संपन्न होय ठाई। परि कृपण ऐसा आन नाहीं।**
**जे कानीं लागला तिहीं। वर्णांच्याची ॥ १८–१४५७ ॥**
**येरां भवव्यथा ठेलियां। स्त्रीशूद्रादि प्राणियां।**
**अनवसर मांडूनियां। राहिला आहे ॥ १८–१४५८ ॥**

वेद तीन वर्णांच्याच कानाला लागला आहे व स्त्रीशूद्रादिकांना मोक्षाचें द्वार त्यानें खुलें केलें नाहीं म्हणून महाराजांनीं त्याला 'कृपण' म्हटलें आहे. वेदावर महाराजांनीं कृपणपणाचा आरोप केला आहे व श्रुतीपेक्षां गीतेची महती जास्त वाखाणिली आहे हें पाहून कित्येकांस फार आश्चर्य वाटेल ! आणि श्रुतीपेक्षां गीतेचें माहात्म्य एकपरी जास्त आहेही. 'यस्य निश्वसितं वेदाः' म्हणजे श्रुति भगवंताच्या निश्वासाबरोबर प्रकट झाली, पण गीता भगवंताच्या साक्षात् मुखांतून प्रकट झाली आहे !! "हा गीतार्थसागर जय निद्रिताचा घोर। तो स्वयें श्रीसर्वेश्वर। प्रत्यक्ष अनुवादला ॥" (अ० १–७२). किंबहुना "बाप बाप ग्रंथ गीता। जो वेदीं प्रतिपाद्य देवता। तो तो श्रीकृष्ण वक्ता। जिये ग्रंथीं ॥" (अ० ११–२६) तर मग ज्ञानेश्वरमहाराजांना श्रुति जरा कमी प्रिय आहे असें कोणी म्हणेल तर महाराजांनींच "पैं अहितापासूनि काढिती। हित देऊनि वाढविती। नाहीं श्रुतीपरौती। माउली जगा" (अ० १६–४६२) असें अन्यत्र स्पष्ट म्हटलें आहे ! 'जगीं समान सकृप। हिताहित दाविता दीप' (अ० १६–४४६) एकीकडे ते श्रुतिमाउलीची निस्सीम स्तुति करितात व दुसरीकडे श्रुति कृपण असून गीता 'औदार्यें आगळी' म्ह०

उदारपणांत श्रुतीहून श्रेष्ठ आहे आणि शिवाय वेद ' निद्रिताचा घोर ' असून गीता तर साक्षात् प्रभूच्या मुखांतून विनिःसृत झाली असल्यामुळें अधिक योग्यतेची आहे, असेंही म्हणतात ! ! तर मग श्रुति श्रेष्ठ कां गीता श्रेष्ठ ? वेदाहून दुसरा कोणताही धर्मग्रंथ—अर्थात् गीताही—न मानणारे अर्वाचीन मतवादी वेदालाच घेऊन बसतात व गीतामृताला पारखे होतात, आणि श्रुतीचे अनधिकारी किंवा श्रुत्यर्थ जाणण्यास असमर्थ असे स्त्रीशूद्रादिकांचे विशेष कैवारी केवळ गीतेचाच पक्ष घेऊन उठतात. केवळ निर्गुणवादी लोक वेदाला तेवढें मानतात व केवळ भक्तिमार्गी लोक गीतेला तेवढें मानतात ! तूर्त तरी उभयवादी कोठें कोठें बरेच वर्दळीवर आलेले दिसतात. असो. एकच पक्ष घेऊन अभिमानाला पेटलेले लोक खुशाल भांडोत, पण आमचे ज्ञानेश्वरमहाराज दोहोंचा समेट कसा मौजेनें करितात तो पहा. महात्मे हे शांतिसुखाच्या अभिवृद्धयर्थ अवतरलेले असतात. सारेच पक्ष पोटांत घेऊन त्यांना बोलतां येतें. एखाद्या विशिष्ट पक्षाचा अभिमान घेऊन बोलणाऱ्या एकांडी पंडितांहून 'सर्वही जेथें पूर्वपक्ष' आहेत अशा शुद्ध स्वरूपाच्या अनुभवानें बोलणारे महात्मे सर्व पक्षांना कुरवाळून समानसत्य प्रतिपादीत असतात. त्यांच्या भाषणांत विरोध कधीं सांपडायचा नाहीं. निर्मळ त्रिकालाबाधित सत्य त्यांना गोड वाणीनें सांगतां येतें. महात्मे जगांतले विरोध मिटविण्याकरितां अवतरलेले असल्यामुळें सर्वांना प्रिय अशा रीतीनें त्यांना सत्य सांगतां येतें. असो. वेद आणि गीता ह्यांच्यांत पूर्ण ऐकात्म्य आहे, हें सांगण्यासाठीं ते पुढें म्हणतातः—

**तरी मज पाहतां ते मागील उणें । फेडावया गीतापणें ।**
**वेद वेठला भलतेणें । सेव्य होआवया ॥ १८–१४५९ ॥**
**यालागीं मागिली कुटी । स्याला वेद-गीतेच्या पोटीं ।**
**रिगाला, आतां गोमटी । कीर्ति पावला ! ॥ १८–१४६० ॥**
**म्हणोनि वेदाची सुसेव्यता । ते हें जाण मूर्त गीता ।**
**श्रीकृष्णें पंडुसुता । उपदेशिली ॥ १८–१४६४ ॥**

**परि वत्साचेनि वोरसें । दुभतें होय घरा उद्देशें ।**
**जालें पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ॥ १४६७ ॥**
**तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें ।**
**संसाराएवढें थोर ओझें । फेडिलें जगाचें ॥ १४७० ॥**

८. आतां आपण श्रीकृष्णार्जुनप्रेमाकडे वळूं. श्रीकृष्णाचें पार्थावर प्रथमपासूनच निरुपम प्रेम असल्यामुळें युद्धारंभीं त्यांनीं त्याचें सारथ्य स्वीकारिलें. "देखा नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्ताचें । जें सारथ्य-पण पार्थाचें । करित असे" ॥ १–१४२ ॥ भीष्मद्रोणादि गुरूंचा व इतर गोत्रजांचा वध आपल्या हातून झाला तर पूर्वसुकृतबळानें श्रीकृष्णाचें जोडलेलें सख्य ह्या पातकामुळें नष्ट होईल ( १–२२८ ) अशा भीतीनें अर्जुन युद्धपराङ्मुख झाला होता. गोत्रजांचें प्रेम व क्षात्रधर्म यांच्या परस्परविरुद्ध विचारांनीं अर्जुन गोंधळला व 'शिष्यस्तेहं शाधि मां त्वां प्रपन्नम्' असें म्हणून तो श्रीकृष्णास शरण गेला. गीतेच्या प्रारंभीं अर्जुन शिष्यभावानें शरण गेला व श्रीकृष्णानीं त्याला कर्मज्ञानउपासना ह्यांचें मर्म सांगून निर्मोह केला. विराट्स्वरूपदर्शनापासून श्रीकृष्ण साक्षात् परमात्मा आहेत हें कळून अर्जुनाच्या ठिकाणीं कृष्णाविषयीं देवत्वबुद्धि दृढ झाली व पुढें गुरुशिष्यांच्या ऐक्यबोधांत भ्रांति जाऊन 'करिष्ये वचनं तव' ह्याप्रमाणें पार्थ निरहंकार झाला. ज्ञानेश्वर हे निस्सीम गुरुभक्त असल्यामुळें कृष्णार्जुनसंवादांत त्यांनीं अपूर्व प्रेमरस ओतला आहे. सच्छिष्य अर्जुनासारखा असतो व सद्‌गुरु श्रीकृष्णासारखे असतात हें रहस्य ह्या संवादाच्या द्वारें त्यांनीं प्रकट केलें आहे ! ज्ञानेश्वरींत कृष्णार्जुनप्रेमाचा रंग इतका उत्कृष्ट उतरला आहे कीं हाच एक ज्ञानेश्वरींत दहावा गुरुभक्तिरस महाराजांनीं निर्माण केला आहे असें वाटतें ! ! ह्या गुरुशिष्यप्रेमरसाला अन्यत्र कोठेंही तुलना सांपडणार नाहीं. अर्जुनाच्या भाषणांत सच्छिष्य पहावा व श्रीकृष्णाच्या भाषणांत सद्‌गुरु पहावेत. असो महाराजांच्या वाणीनेंच आपण ह्या प्रेमामृतरसाचे चार घोट घेऊं. तिसऱ्या अध्यायाच्या प्रारंभीं अर्जुन म्हणतोः—

हां गा ! कर्म तूंचि अशेष । निराकरिशी निःशेष ।
तरी मजकरवीं हें हिंसक । कां करविसी ? ॥ ४ ॥
आम्ही तनुमनजीवें । तुझिया बोला वोटंगावें ।
आणि तुवांचि ऐसें करावें । तरी सरलें म्हणे ॥ १२ ॥
देवा ! तुजऐसा निजगुरु । आजि आर्तिधणी कां न करूं ।
एथ भीड कवणाची धरूं । तूं माय आमुची ॥ २१ ॥
जैसे मातेच्या ठायीं । अपत्या अनवसर नाहीं ।
स्तन्यालागूनि पाहीं । जियापरी ॥ २९ ॥
तैसें देवा ! तूतें । पुसिजतसे आवडे तें ।
आपुलेनि आर्तें । कृपानिधी ॥ ३० ॥

श्रीकृष्णानीं प्रेमपूर्ण दृष्टीनें अर्जुनाकडे पाहिलें. ज्ञानेश्वरमहाराज श्रीकृष्णदृष्टीचें वर्णन करितातः—

ते म्हणे कारुण्यरसाची वृष्टि । कीं नवया स्नेहाची सृष्टी ।
हें असो, नेणिजे दृष्टी । हरीची वानूं ॥ ५-१७१ ॥
जे अमृताची वोतली । कीं प्रेमचि पिऊन मातली ।
म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणे ॥ ५७२ ॥

प्रेम पिऊन मातल्यामुळें अर्जुनाच्या मोहाला गुंतून त्याच्या ठिकाणीं स्थिरावलेल्या श्रीकृष्णदृष्टीचें असें सर्वोत्कृष्ट वर्णन ज्ञानेश्वरांशिवाय दुसरा कोण करूं शकेल ? सहाव्या अध्यायांत 'योगी युंजीत सततं आत्मानं रहसि स्थितः' ह्या श्लोकाच्या श्रवणाबरोबर अर्जुनाची अशी तन्मयता झाली कीं क्षणभर श्रीकृष्णाचें बोलणेंच खुंटलें. श्रीकृष्ण आनंदित तर झालेच, पण अर्जुन जर स्वस्वरूपाशीं असा समरस आतांच झाला तर सख्यभक्तीच्या सुखाला आपण मुकूं असें वाटून श्रीकृष्णांनीं त्याला व्युत्थानावर आणलें. श्रीकृष्ण म्हणतातः—

अहंभाव ययाचा जाईल । मी तोंचि हा जरी होईल ।
तरी मग काय कीजेल । एकलेया ॥ ११६ ॥

**दिठीचि पाहतां निविजे । कां तोंड भरोनि बोलिजे ।**
**ना तरी दाटूनि खेंव दीजे । ऐसें कोण आहे? ॥ ११७ ॥**
**आपुलिया मना बरवी । असमाई गोठी जीवीं ।**
**तें कवणेंसि चावळावी । जरी ऐक्य जाहलें ! ॥ ११८ ॥**

श्रीकृष्णाचें निस्सीम अर्जुनप्रेम पाहून म्हातारपणीं झालेल्या एकुलत्या एक पोराचें कौतुक करणाऱ्या वांझोटीचें ज्ञानेश्वरमहाराजांना स्मरण झालें !

**हें असो, वयसेचिये शेवटीं । जैसें एकचि विये वांझोटी ।**
**मग तें मोहाचो त्रिपुटी । नाचों लागे ! ॥ १२१ ॥**

अर्जुनाच्या सख्यभक्तीचें यापुढील वर्णन पहाः—

**यापरी बाप पुण्यपवित्र । जगीं भक्तिबीजासी सुक्षेत्र ।**
**तो श्रीकृष्णकृपे पात्र । याचिलागीं ॥ १२६ ॥**
**हो कां आत्मनिवेदनातळींची । जे पीठिका होय सख्याची ।**
**पार्थ अधिष्ठात्री तेथींची । मातृका गा ॥ १२७ ॥**
**पाहा पा अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे ।**
**ते पतीहूनि काय न वानिजे । पतिव्रता ? ॥ १२९ ॥**
**तैसा अर्जुनचि विशेषें स्तवावा । ऐसें आवडलें मज जीवा ।**
**जे तो त्रिभुवनींचिया दैवा । एकायतन जाहला ॥ १३० ॥**
**जयाचिया आवडीचेनियोगें । अमूर्तही मूर्ति आवगे ।**
**पूर्णाहि परी लागे । अवस्था जयाची ॥ १३१ ॥**

अर्जुनाच्या सख्यभक्तीचें हें अतिप्रेमळ वर्णन वाचून कोण सुखरोमांचित होणार नाहीं ? "देवकीया उदरीं वाहिला । यशोदा सायासें पाळिला । शेखीं उपेगा गेला । पांडवांसी ! !" ॥ ( १३७ ). 'भिडेची शींव लंघों न देतां' गुरुला प्रश्न करण्याची अर्जुनाची जी प्रेमळ रीत तिची त्यांनीं एके ठिकाणीं गोड तारीफ केली आहे (अ० ७–२००।२०२); व 'अहो श्रीगुरुतें जें पुसावें । तें येणेंमानें सावध व्हावें' ह्याप्रमाणें अर्जुनाचा कित्ता साधकांपुढें ठेविला आहे. पुढें एकदां अर्जुनाच्या 'आस्थे' ची स्तुति करून 'गुह्य' कोणाला सांगावें याची त्यांनीं छान फोड केली आहेः—

**परी परियेसीं गा प्राज्ञा । तूं आस्थेचीच संज्ञा ।**
**बोलिलिये गोष्टीची अवज्ञा । नेणसी करूं ॥ ९-३६ ॥**

स्तनांत दूध आहे पण तें स्तनालाच गोड नसतें, तसें आमचें गूढ ( रहस्य ) आमच्यापाशींच राहून उपयोग काय ? अनन्य भेटावा अशी आमची उत्कंठा असते. " या लागीं सुमन आणि शुद्धमती । जो अनिंदक अनन्यगती । गा गौप्यही तयाप्रती । चावळिजे सुखें " ( अ० ९-४० ) असा न्याय असल्यामुळें श्रीकृष्णानीं आपल्या ह्या अनन्यभक्ताला ९ व्या अध्यायांत गुह्य राजविद्या सांगितली आहे. अर्जुनानें विश्वरूपदर्शन मागितलें मात्र तों 'पश्य मे पार्थ रूपाणि' असें म्हणत श्रीकृष्णांनीं तें दिलें-हें शिष्यप्रश्नोक्तीचें तात्काळ समाधान करण्याचें गुरुव्रत पाहून महाराज विचारतातः—" अहो वासरूं देखिलियाचि साठीं । धेनु खडबडोनि मोहें उठी । मग स्तनामुखाचिये भेटी । काय पान्हा धरे ? ॥" (अ० ११-४० ) पार्थावर देवाचें प्रेमच तसें होतें. " अहो शेषाचेही डोळे चोरिले । वेद जयालागीं झकविलें । लक्ष्मियेही राहाविलें । जिव्हार जें ! ! "॥ (अ० ११-११८ ) तें अर्जुनाला देवांनीं पुसतांक्षणींच दिलें. एक विश्वरूप पहावें असें त्याला वाटलें मात्र तों देवांनीं 'विश्वरूपमय आघवें । करूनि घातलें !' कामुक जसा अंगनेच्या अधीन असतो तसे देव अर्जुनाच्या छंदानें वागले. महाराज मौजेनें म्हणतातः—

**पढविलें पांखरूं ऐसें न बोले । क्रीडामृगही तैसा न चले ।**
**कैसें दैव येथ सुरवाडलें । तें जाणों नये ॥ १७० ॥**
**आजि परब्रह्म सगळें । भोगावया सदैव याचेचि डोळे ।**
**कैचे वाचेचे हन लळे । पाळीत असे ॥ १७१ ॥**
**हा कोपे कीं निवांत साहे ! । हा रुसे तरी बुझावीत जाये ! ।**
**नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ! ! ॥ १७२ ॥**

देवांच्या मुखांतून जीं अक्षरें निघत तीं तात्काळ अविद्येचे आंधारें ळवून लावीत. महाराज म्हणतातः " तीं अक्षरें नव्हतीं देखा । ब्रह्म-

साम्राज्यदीपिका । अर्जुनालागीं चित्कळिका । उजळली श्रीकृष्णें" ॥ (अ० ११-१७८ ). श्रीकृष्णमुखांतून जीं अक्षरें निघत तीं अर्जुन अत्यंत उत्कंठेनें ऐके. 'कानचि करीं हो सर्वांगा' असें महत्वाचा विषय निघाला, कीं श्रीकृष्णांनीं म्हणावें तों 'अवधान अर्जुनाकारें । मूर्त जाहलें' असें त्यास लगेंच आढळून यावें ! देवांच्या तोंडून जीं अक्षरें निघावींत तीं यानें सगळींच गिळून घालावींत.

**"श्रीकृष्णोक्तिसागरा । हा अगस्तीच दुसरा ।**
**म्हणोनि घोंट भरों पाहे एकसरा । अवधेयाचा" ॥ अ० १५-७० ॥**

देवांनीं जेवढें निरुपण करावें तेवढें सगळें यानें सर्वेंद्रियांचे कान करून ऐकावें. 'देव निरुपिती तें थेकुलें । येवढें श्रोतेपण फांकलें.' असा श्रोता भेटल्यावर देवांच्या पोटांत काय बरें राहील ! श्रीकृष्णांचें वक्तृत्व व पार्थाचें अवधान ह्या दोन्ही गोष्टी अपूर्वच आहेत. श्रोत्याची निष्ठा व अवधान इतकें उत्कट असल्यावर मग बोधाला काय उशीर ?:-

**'तो आघवाचि बोध सहसा । अर्जुनीं उमटला कैसा ।**
**व्योमींचा चंद्रोदय जैसा । क्षीरार्णवीं ॥ १५-४४३ ॥**
**कां प्रतिभिंती चोखटें । समोरील चित्र उमटे ।**
**तैसा अर्जुनें आणि वैकुंठें । नांदतसे बोध ॥ ४४४ ॥**

आपण फार फार प्रश्न विचारतों म्हणून अर्जुनाला क्वचित् शंका आली तर देवांनीं त्याला निःसंदेह करण्यासाठीं प्रेमानें म्हणावें:-" पै अर्जुना आम्हांही वाडेंकोडें । अखंड बोलों आवडे । परी काय कीजे न जोडे । पुसतें ऐसें " ( १५-४४८ ). इतकेंच नव्हे तर उलट त्याचेच उपकार मानावेत:—

**आजि मनोरथांसी फळ । जोडलासि तूं केवळ ।**
**जें तोंड भरोन निखळ । आलासि पुसों ॥ ४४९ ॥**
**जें अद्वैतावरीही भोगिजे । तें अनुभवीचें तूं विरजें ।**
**पुसोनि मज माझें । देतोसि सुख ॥ १५-४५० ॥**

मी वक्ता व तूं श्रोता हा भेद उगीच असून दोघेही एकच अर्थ पाहत आहोंत असें म्हणत देवांनीं अर्जुनास प्रेमालिंगन द्यावें आणि हें पूर्ण ऐक्य झालें तर संवादसुख मोडेल असें भय वाटून आपला वेग आपणच जिरवावा ! ह्या प्रसंगाचें महाराजांनीं किती मनोहर शब्दचित्र काढलें आहे !

**पै दोहीं वोठीं एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें ।**
**तैसें पुसणें सांगणें । तुझें माझें ॥ १५–४५४ ॥**
**एवं आम्ही तुम्हीं येथें । देखावें एका अर्थातें ।**
**सांगतें पुसतें येथें । दोन्ही एक ॥ ४५५ ॥**
**ऐसें बोलत देव भुलला मोहें । अर्जुनातें आलिंगूनि ठाये ।**
**मग बिहाला, म्हणे नोहे । आवडी हे ! ॥ ४५६ ॥**
**आधींच आम्हां यया कांहीं । नरनारायणासी भेद नाहीं ।**
**परी आतां जिरो माझ्या ठायीं । वेग हा माझा ॥ ४५८ ॥**

पार्थाच्या मनीं बोध मुराला म्हणून देव उगेच एखादवेळ स्वस्थ बसले तर तें अर्जुनासही सहन न व्हावें. देवांनीं बोलावें व आपण ऐकावें असें अर्जुनास वाटे व देवांसही तेंच प्रिय होतें.

**वत्स धालियाहीवरी । धेनू न वचावी दुरी ।**
**अनन्यप्रीतीची परी । ऐसी आहे ॥ १८–७८ ॥**
**तेणें काजेंवीणही बोलावें । तें देखिलें तरी पाहावें ।**
**भोगितां चाड दुणावें । पढियंतयाठायीं ॥ ७९ ॥**

ब्रम्हबोधाचें पूर्ण रहस्य जेव्हां श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें तेव्हां देव-भक्त एक झाले, त्यांची प्रेममिठी पडली.

**हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचे तें हृदयीं घातलें ।**
**द्वैत न मोडतां केलें । आपणपां ऐसें ॥ १८–१४२१ ॥**
**दीपें दीप लाविला । तैसा परिष्वंग तो जाला ।**
**द्वैत न मोडितां केला ! । आपणपें पार्थ ॥ १४२२ ॥**

श्रीकृष्णांनीं स्वशरण भक्तराज तो अर्जुन आलिंगिला व श्रोतेवक्ते दोघेही स्वानंदसागरांत मग्न झाले.

९. ज्ञानेश्वरमहाराजांनीं जागोजाग श्रोत्यांची प्रार्थना मोठ्या आदरानें, लडिवाळपणाच्या धिटाईनें व आत्मविश्वासाच्या सहजपणानें केली आहे. नेवाशास संतसज्जनांसमोर त्यांनीं गीताटीका सांगण्यास प्रारंभ केला व तेथेंच ती समाप्त झाली. श्रोतृमंडळांत श्रीगुरु निवृत्तिनाथ सन्मुख बसले होते. इतरही अनेक अधिकारी संत श्रोतृमंडळांत बसले होते. त्यांच्या वारंवार केलेल्या श्रोतृप्रार्थनेंत विनय आणि आत्मविश्वास यांचें मनोहर मिश्रण झालेलें दृष्टीस पडतें. त्यांनीं गीताश्लोकांवर ओंव्या स्वमुखानें बोलत असावें व सच्चिदानंदबावांनीं त्या लिहून घेत असावें असा क्रम चालला होता. श्रोत्यांच्या प्रथमप्रार्थनेंत ते म्हणतातः—

**अहो अर्जुनाचिये पांती । जे परिसणया योग्य होती ।**
**तिहीं कृपा करून संतीं । अवधान द्यावें ॥ १-६२ ॥**
**हें सलगी म्यां म्हणितलें । चरणीं लागोनि विनविलें ।**
**प्रभू सखोल हृदय आपुलें । म्हणऊनियां ॥ ६३ ॥**
**जैसा स्वभाव मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा ।**
**तरी अधिक तयाचा । संतोष आथी ॥ ६४ ॥**

तुम्हीं संतांनीं माझा अंगीकार केला आहे म्हणून मी गीतार्थ कवळूं पाहत आहें. "कीं टिटिभू चांचूवरी । माप सूये सागरीं । मी नेणत त्यापरी । प्रवर्ते येथ" असें आहे तरी श्रीगुरु सानुकूल आहेत व संतकृपादीपक सोज्वळ आहे ह्या आधारावर मी गीताभाष्य करावयास उद्युक्त झालों आहे. प्रार्थना हीच कीं:—

**तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।**
**करूनि घ्यावें हें तुमतें । विनवित असे ॥ ८० ॥**

चवथ्या अध्यायांत 'आजि श्रवणेंद्रियां पाहिलें । जें येणें गीतानिधान देखिलें' असें म्हणून ते श्रोत्यांना सांगतात कीं, 'सर्वेंद्रियांनीं श्रवणाच्या घरांत शिरून हें गीताख्य संवादसुख भोगावें.' सहाव्या अध्यायाच्या प्रारंभीं ते सांगतात कीं, इंद्रियांना चोरून कैवल्यरसाचीं पक्वानें खाणारे

जे निष्काम सज्जन त्यांच्यासाठींच मी ही ग्रंथरचना करीत आहे! 'ही प्रतिपत्ति मियां केली। निष्कामासी' केवळ विषयसुखांत लोळणाऱ्या प्राकृतांना हा ग्रंथ कळणार नाहीं. त्यांच्यासाठीं दुसरे पुष्कळ ग्रंथ आहेत! 'सज्ञानासी तरी हा ठावो। अज्ञानासी आन गांवो।' श्रोत्यांना ब्रह्मसुख भोगण्याचा अधिकार नसेल तर माझें हें बोलणें त्यांना पचणार नाहीं:—

**ऐसें हळुवारपण जरी येईल। तरीच हें उपेगा जाईल।**
**येऱ्हवीं आघवी गोठी होईल। मुकया बहिरयाची!॥ २६॥**
**परि तें असो आतां आघवें। नलगे श्रोतयांतें कडसावें।**
**जे अधिकारिये येथ स्वभावें। निष्कामकाम॥ २७॥**
**जैसा वायसीं चंद्र नोळखिजे। तैसा प्राकृतीं ग्रंथ हा नेणिजे।**
**आणि तो हिमांशूचि खाजें। चकोराचें॥ २९॥**

श्रोते किंवा वाचक जर अधिकारी असतील तरच त्यांना ग्रंथगर्भ उकलेल, नाहींतर विषयी जीव केवळ भाषागौरव, पदलालित्य, उपमाचातुर्य इत्यादिकांवरच मिटक्या मारूं लागतील! "ज्ञानेश्वरांची वर्णनशक्ति किती लोकोत्तर आहे हो! काय त्यांच्या उपमा, काय त्यांचे दृष्टांत, किती विलक्षण त्यांची विषयप्रतिपादन शैली!" अशा प्रकारचे बाहेरून बाहेरून पाहून धन्यवाद गाणारे श्रोते किंवा वाचक पुष्कळ सांपडतील. अंतरंग पुरुषच ह्या ग्रंथाविषयीं अधिकारी आहेत; बाकी इतर सामान्य पुरुष—विद्वान्, रसिक, शोधक, लेखक वगैरे—ह्याच्या वाक्चातुर्यानेंच सुखी होतील व ते झाले आहेत. असो. नवव्या अध्यायाच्या उपोद्घातांत पुन्हां त्यांनीं श्रोत्यांना 'ऐकलें अवधान' देण्याविषयीं विनविलें आहे:—

**तरी अवधान एकलें दीजे। मग सर्वसुखासि पात्र होइजे।**
**हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड आइका॥ १॥**

ही धिटाईची उक्ति अर्थात् गुरुकृपाबळावरच ते बोलून गेले; पण पुढें लगेच विनयान्वित होऊन ते म्हणतात:—

**परी प्रौढी न बोले हो जी । तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं ।
देयावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची ॥ २ ॥**

येथून पुढें सर्व बोलणें अपूर्व विनयाचें व लडिवाळपणाचें आहे. वरील धिटाईचा उद्गार तरी तुमच्याच कृपेचा आहे:—

**कां जें लळेयाचे लळे सरती । मनोरथांचे मनोरथ पुरती ।
जरी माहेरें श्रीमंतें होती । तुम्हांऐसी ॥ ३ ॥**

तुमचें अवधान मागितलें खरें पण तुह्मी तृप्त व्हाल असें दांडगें वक्तृत्व कोणाजवळ आहे ? तुम्ही तृप्त, निष्काम, स्वसुखानुभवी असेच आहांत. चंद्राला विंजणवारा घालणें, नादाला ऐकविणें, अलंकारावर अलंकार चढविणें हें कधीं झालें आहे ? परिमळानें काय हुंगावें ? सागरानें कोठें नाहावें ? गगन सांठविणारा अवकाश कोठें आहे ? तसें तुम्हांला रिझविण्याइतकें वक्तृत्व माझ्यापाशीं कोठें आहे ? ( अ० ९ )

**तरि विश्व प्रगटितिया गभस्ती । काय हातिवेन न कीजे आरती ।
कां चुळोदकें अपांपती । अर्घ्य नेदिजे ॥ १३ ॥**

तरी सूर्याला काडवातीनें ओवाळीत नाहींत काय ? किंवा सागराला चूळभर पाण्यानें अर्घ्य देत नाहींत काय ? फार काय सांगू ?:—

**प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुबळा अर्चितसें भक्ती ।
म्हणोनि बोल जरी गंगावती । तरी स्वीकाराल कीं ॥ १४ ॥**

तुम्ही साक्षात् शंकर आहात आणि माझीं वचनें हीच निर्गुडीचीं पानें यांनीं मी तुमची अर्चा भक्तीनें करीत आहें. अथवा:—

**बाळक बापाचिये ताटीं रिगे । आणि बापातेंच जेववूं लागे ।
कीं तो तोषलेनि वेगें । मुखचि ओढवी ॥ १५ ॥**

वत्स गाईला ढुसण्या देऊं लागलें कीं तिला अधिकच पान्हा फुटतो किंवा प्रिय मनुष्याच्या रोषानें प्रेम दुणावतें तसें माझ्या बोलानें तुमचें कृपाळूपण जागृत झालें आहे असें आतां मला कळलें आहे ! तुमची दृष्टि प्रेमामृताचा वर्षाव करूं लागली कीं सकळार्थ माझ्या चित्तांत स्फुरतात,

"येऱ्हवीं कोंभेला उन्मेष सुके। जरी उदास तुम्ही" म्ह० तुमचें अनवधान झालें कीं होणारी स्फूर्ति सुकून जाते! यासाठीं तुम्ही अवधान द्या असें मी म्हणतों आहें. अहो! तुमचें अवधान मिळालें कीं "अर्थ बोलाची वाट पाहे। तेथें अभिप्रावोचि अभिप्रायातें विये। भावाचा फुलौरा होत जाये। मतिवरी" असा अनुभव येतो. बरें, उलट असाच प्रकार लोकांत दिसतो कीं 'श्रोता दुश्चित तरी वितुळे। मांडला रस!' श्रोतेच वक्त्याच्या वक्तृत्वाचे खरेखरे प्रेरक आहेत:—

**चंद्रकांत द्रवता कीर होये। परी ते हातवटी चंद्रींचि आहे।**
**म्हणऊनि वक्ता तो वक्ता नोहे। श्रोतेंविण ॥ २९ ॥**

अशा प्रकारें महाराजांनीं श्रोत्यांची विनवणी केली आहे. बाराव्या अध्यायांत "हें सारस्वताचें गोड। तुम्हींच लाविलें जी झाड। तरी आतां अवधानामृतें वाड। सिंपोनि कीजे" (१९) असें त्यांनीं प्रेमानें श्रोत्यांस प्रार्थिलें आहे.

# ११ उत्कृष्ट वेंचे.

१. पुढें ज्ञानेश्वरींतले निवडक वेंचे दिले आहेत त्यावरून महाराजांनीं मनुष्यमात्रास केलेला बोध त्यांच्याच प्रासादिक शब्दांनीं स्वच्छ कळणार आहे. पुढील निवडक वेंचे काढतांना माझी जी तिरपिट उडाली ती कांहीं पुसूंच नये! एकापेक्षां एक सरस अशा ओव्यांची जी रत्नमाला त्यांनीं निर्माण केली, तींतून कोणतीं रत्नें अधिक सरस म्हणून निवडावींत? ज्ञानेश्वरींत अनेक गुण आहेत, पण एक मोठा दोष आहे तो ह्या वेळीं माझ्या लक्षांत आला!! तो कोणता म्हणाल तर नीरस किंवा कमी सरस अशा ओव्या महाराजांना रचतांच आल्या नाहींत व त्यामुळें मजसारख्याला सरस ओव्या निवडून काढायला मोठीच अडचण पडली! 'उडदांमाजी काळें गोरें। काय निवडावें निवडणारें?' ही म्हण खरीच आहे. पण उडीद सगळेच काळे असल्यामुळें निवड करतां येणें जसें कठिण आहे, तसें मोतीं सगळेंच धवल असल्यामुळें त्यांतही गोऱ्याकाळ्यांची निवड अशक्य आहे! ज्ञानेश्वरींतल्या ओव्यांसंबंधानें वरील म्हण फिरवून असें म्हणतां येईल कीं 'मोतियांमाजी गोरेकाळे। काय निवडावे वेगळवेगळे!'

## १ मंगलाचरण.

ॐ नमोजी आद्या। वेदप्रतिपाद्या। जयजय स्वसंवेद्या। आत्मरूपा ॥१॥ देवा तूंचि गणेश। सकळार्थमतिप्रकाश। म्हणे निवृत्तिदास। अवधारिजो जी ॥ २ ॥ मज हृदयीं सद्गुरु। जेणें तारिलों हा संसारपूरु म्हणऊनि विशेषें अत्यादरु। विवेकावरी ॥ २२ ॥

## २ नित्यानित्यविवेक.

तूं आपणपें तरी नेणसी। परी या कौरवांतें शोचूं पाहसी। हा बहु विस्मय आम्हांसी। पुढतपुढती ॥ ९४ ॥ तूं एक वधिता। आणि सकळ

लोक हा मरता । ऐसी भ्रांति झणें चित्ता । येवों देसी ॥ ९९ ॥ अनादिसिद्ध हें आघवें । होत जात स्वभावें तरी तुवां कां शोचावें । सांगें मज ॥१००॥ देखें विवेकी जे होती । ते दोहींतेंही न शोचिती । जे होय जाय हे भ्रांति । म्हणऊनियां ॥ १०१ ॥ हें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे । येऱ्हवीं तत्वतां वस्तु जें असे । तें अविनाशचि ॥ १०५ ॥ या उपाधिमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत । तें तत्वज्ञ संत । स्वीकारिती ॥ १२६ ॥ सलिलीं पय जैसें । एक होऊनि मिनलें असे । परी निवडूनि राजहंसें । वेगळें कीजे ॥ १२७ ॥ कीं अग्निमुखें किडाळ । तोडोनियां चोखाळ । निवडिती केवळ । बुद्धिमंत ॥१२८॥ तैसें विचारितां निरसलें । तें प्रपंच सहजें सांडवलें । मग तत्वतां तत्व उरलें । ज्ञानियांसी ॥ १३१ ॥ ( अ० २ )

## ३ स्थितप्रज्ञ.

नाना दुःखीं प्राप्तीं । जया उद्वेग नाहीं चित्तीं । आणि सुखाचिया आर्तीं । अडपैचिजेना ॥ २९४ ॥ अर्जुना ! तयाच्या ठायीं । कामक्रोध सहजें नाहीं । आणि भयातें नेणे कहीं । परिपूर्ण तो ॥ २९५ ॥ जो सर्वत्र सदा सरिसा । परिपूर्ण चंद्र कां जैसा । अधमोत्तम प्रकाशा–। माजि न म्हणे ॥ २९७ ॥ ऐसी अनवच्छिन्न समता । भूतमात्रीं सदयता । आणि पालट नाहीं चित्ता । कवणे वेळे ॥ २९८ ॥ गोमटें कांहीं पावे । तरी संतोषें तेणें नाभिभवे । जो ओखटेनि नागवे । विषादासी ॥२९९॥ ऐसा हरिखशोखरहित । जो आत्मबोधभरित । तो जाण पां प्रज्ञायुक्त । धनुर्धरा ॥३००॥ जैसा सूर्य आकाशगत । रश्मिकरें जगातें स्पर्शत । तरी संगदोषें काय लिंपत । तेथिचेनि ? ॥ ३३३ ॥ तैसा इंद्रियार्थी उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न । जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ॥ ३३४ ॥ जैसा निर्वातीचा दीप । सर्वथा नेणे कंप । तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूप । योगयुक्त ॥ ३४१ ॥ तो अहंकारातें दवडूनि । सकळकाम सांडूनी । विचरे विश्व होउनी । विश्वामाजी ॥३६७॥ ( अ० २ )

## ४ स्वधर्मानुष्ठान.

जंव निरार्तता नाहीं । तंव व्यापार असे पाहीं । मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे सहजें ॥ ४९ ॥ म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त । तें कर्म हेतुरहित । आचरें तूं ॥ ७८ ॥ म्हणोनि स्वधर्मानुष्ठान । तें अखंड यज्ञयाजन । जो करी तया बंधन । कहींच न घडे ॥ ८३ ॥ तुम्हां वर्ण-विशेषवशें । आम्हीं हा स्वधर्म विहिला असे । यातें उपासा मग आपैसे । पुरती काम ॥ ८८ ॥ तुम्ही देवांतें भजाल । देव तुम्हां तुष्टतील । ऐसी परस्परें घडेल । प्रीति जेथ ॥ ९७ ॥ तेथ तुम्ही जें करूं म्हणाल । तें आपैसें सिद्धि जाईल । वांछितही पुरेल । मानसींचें ॥ ९८ ॥ देखा विहित क्रियाविधी । निर्हेतुका बुद्धि । जो असतिये समृद्धि । विनियोग करी॥११९॥ गुरुगोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं । निमित्तादिकीं यजीं । पितरोद्देशें ॥१२०॥ या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेशीं हवन करितां । हुतशेष स्वभावता । उरे जें जें ॥ १२१ ॥ तें मुखें आपुले घरीं । कुटुंबेसी भोजन करीं । कीं भोग्याचि तें निवारी । कल्मषातें ॥ १२२ ॥ म्हणोनि स्वधर्में जें अर्जे । तें स्वधर्मेंचि विनियोगिजे । मग उरे तें भोगिजे । संतोषेंशीं ॥ १२५ ॥ इंद्रियरुचीसारिखें । करविती पाक निकें । ते पापिये पातकें । सेविती जाण ॥ १२९ ॥ हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें । मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ १३० ॥

## ५ कामक्रोध.

तरी हे कामक्रोध पाहीं । जयांतें कृपेची सांउवण नाहीं । हे कृतांताच्या ठायीं । मानिजती ॥ २४० ॥ हे ज्ञाननिधीचे भुजंग । विषयदरींचे वाघ । भजनमार्गींचे मांग । मारक जे ॥ २४१ ॥ हे देहदुर्गींचे धोंड । इंद्रियग्रामींचे कोंड । यांचे व्यामोहादिक बंड । जगावरी ॥२४२॥ हे जळेवीण बुडविती । आगीवीण जाळिती । न बोलतां कवळिती । प्राणियांतें ॥२५७॥ हे शस्त्रेंवीण साधिती । दोरेंवीण बांधिती । ज्ञानियासी तरी वधिती । पैज

घेऊनी ॥ २५८ ॥ इहीं संतोपवन खांडिलें। धैर्यदुर्ग पाडिलें। आनंदरोप सांडिले। उपडूनियां ॥ २५२ ॥

( ६ ) 'यदा यदाहि धर्मस्य' आणि 'परित्राणाय साधूनां' ह्या श्लोकांवर भाष्य करतांना अवतारांबद्दल महाराज म्हणतातः—

जें धर्मजात आघवें। युगायुगीं म्यां रक्षावें। ऐसा ओघ हा स्वभावें। आद्य असे ॥ ४–४९ ॥ म्हणोनि अजत्व परतें ठेवी। मी अव्यक्तपणही नाठवी। जे वेळीं धर्मातें अभिभवी। अधर्म हा ॥ ४–५० ॥ ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें। मी साकार होऊनि अवतरें। मग अज्ञानाचे आंधारें। गिळोनि घालीं ॥ ४–५१ ॥ अधर्माची अवधी तोडीं। दोषांचीं लिहिलीं फाडीं। सज्जनांकरवीं गुढी। सुखाची उभवी ॥ ४–५२ ॥ दैत्यांचीं कुळें नाशीं। साधूंचा मान गिंवशीं। धर्मासीं नीतीशीं। शेस भरीं ॥४–५३॥ स्वसुखें विश्व कोंदे। धर्मचि जगीं नांदे। भक्तां निघती दोंदें। सात्विकांची ॥ ४–५५ ॥ तैं पापांचा अचळ फिटे। पुण्याची पहांट फुटे। जैं मूर्ति माझी प्रगटे। पंडुकुमरा ॥ ४–५६ ॥

( ७ ) सर्व यज्ञांत ज्ञानयज्ञ अत्यंत श्रेष्ठ असून 'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया' ह्याप्रमाणें तें ज्ञान ज्ञान्यांपाशींच मागावें:—

ते द्रव्यादि कीर होती। परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती। जैसी तारा-तेजसंपत्ती। दिनकरापाशीं ॥ १५९ ॥ तें गा ज्ञान पैं बरवें। जरी मनीं आथि जाणावें। तरी संतांतें भजावें। सर्वस्वेसीं ॥ १६५ ॥ तनुमनजीवें। चरणांसीं लागावें। आणि अगर्वता करावें। दास्य सकळ ॥ १६७ ॥ मग अपेक्षित जें आपुलें। तेंही सांगतील पुसिलें। जेणें अंतःकरण बोधलें। संकल्पा नये ॥ १६८ ॥

( ८ ) पांचव्या अध्यायांत सांख्य म्ह० कर्मसंन्यास व योग म्ह० कर्मयोग हे दोन्ही मोक्षप्रद आहेत, व कर्मयोगाचरणांत संन्यासाचींही 'लक्षणें अंगीं उमटत असतात' असें सांगून तशा लक्षणांचें वर्णन केलें आहे:—

तरी गेलियाची से न धरी । न पवतां चाड न धरी । जो सुनिश्चळ अंतरी । मेरु जैसा ॥ १९ ॥ आणि ' मी माझें ' ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥ २० ॥ जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें । गुरुवाक्यें मन धुतलें । मग आत्मस्वरुपीं घातलें । रोवोनियां ॥ ३४ ॥ तरी आत्मयोगें आथिला । जो कर्मफळाशीं विटला । तो घर रिघोनि वरिला । शांतीं जगीं ॥ ७१ ॥ नवद्वारदेहीं । तो असताचि परी नाहीं । करिताचि न करी कांहीं । फळत्यागी ॥ ७५ ॥ जैसा कां सर्वेश्वर । पाहिजे तंव निर्व्यापार । परि तोचि रची विस्तार । त्रिभुवनाचा ॥ ७६ ॥ जगाच्या जीवीं आहे । परी कवणाचा कहीं नोहे । हें जगचि होय जाये । तो शुद्धीही नेणे ॥ ७९ ॥ जेथ हें संसार चित्र उमटे । तो मनोरूप पट फाटे । जैसें सरोवर आटे । मग प्रतिभा नाहीं ॥ १५६ ॥ तैसें मन येथ मुदल जाये । मग अहंभावादिक कें आहे । म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होय । अनुभवी तो ॥ १५७ ॥

हीं लक्षणें ज्याच्या अंगीं बाणलीं आहेत त्याचा प्रपंच परमार्थाहून वेगळा नाहीं. सांख्य तोच योग, परमार्थ तोच प्रपंच, संन्यास तोच संसार. महाराजांनीं म्हटलें आहे कीं, " तयासीचि जगीं पाहलें । आपणपें तेणेंचि देखिलें । जया सांख्ययोग जाणवले । भेदेवीण ॥ ३१ ॥"

( ९ ) योगाभ्यासाचें स्थान कसें असावें ? त्या 'शुचि देशा'चें महाराज बहारीचें वर्णन ( ६ अ० ) करितातः—

जेथ आराणुकेचेनि कोडें । बैसलियां उठों नावडे । वैराग्यासी दुणीव चढे । देखिलियां जें ॥ १६४ ॥ अभ्यासचि आपण यातें करी । हृदयातें अनुभव वरी । ऐसी रम्यपणाची थोरी । अखंड जेथ ॥ १६६ ॥ जयां आड जातां पार्था । तपश्चर्या मनोरथा । पाखांडियाही आस्था । समूळ होय ॥ १६७ ॥ हें राज्य वर सांडिजे । मग निवांता एथेंचि असिजे । ऐसें शृंगारियांहीं उपजे । देखतखेवो ॥ १७० ॥ आणिकही

एक पाहावें। जें साधकीं वसतें होआवें। आणि जनाचेनि पायरवें। रुळेंचिना ॥ १७२ ॥ जेथ अमृताचेनि पाडें। मुळाही सकट गोडें। जोडती दाटें झाडें। सदा फळती ॥ १७३ ॥ पाउला पाउला उदकें। वर्षाकाळावीण अतिचोखें। निर्झरें कां विशेषें। सुलभें जेथें ॥ १७४ ॥ हा आतपही अळुमाळ। जाणिजे तरी शीतळ। पवन अतिनिश्चळ। मंद झुळके ॥ १७५ ॥ बहुतकरूनि निःशब्द। दाट न रिघे श्वापद। शुक हन षट्पद। तेउतें नाहीं ॥ १७६ ॥ पाणिलगें हंसें। दोनी चारी सारसें। कवणें एकेवेळे बैसे। कोकिळही हो कां ॥ १७७ ॥ निरंतर नाहीं। तरि आलीं गेलीं कांहीं। होतु कां मयूरेंही। आम्ही ना न म्हणों ॥ १७८ ॥ परि आवश्यक पांडवा। ऐसा ठाव जोडावा। तेथ निगूढ मठ होआवा कां शिवालय ॥ १७९ ॥

(१०) कुंडलिनीचें मनोहर वर्णन केल्यावर 'योगसाधन पाहिजे त्याला साधेल कां हो ? कां येथें योग्यता किंवा अधिकार पाहिजे ?' ह्या अर्जुनाच्या प्रश्नास भगवंतांनीं जें उत्तर केलें आहे तें सर्व मुमुक्षुसाधकांनीं लक्षांत ठेवावें:—

योग्यता जे म्हणिजे। ते प्राप्तीचि अधीन जाणिजे। कां जे योग्य होऊनि कीजे। तें आरंभिलें फळे ॥ ३४० ॥ तरी तैसी एथ कांहीं। सावियांचि केणी नाहीं। आणि योग्यतेची कांहीं। खाणी असे ? ॥ ३४१ ॥ नावेक विरक्त। जाहला देहधर्मीं नियत। तरि तोचि नव्हे व्यवस्थित। अधिकारिया ॥ ३४२ ॥ मग म्हणे पार्था। ते हे ऐसी व्यवस्था। अनियतासी सर्वथा। योग्यता नाहीं ॥ ३४४ ॥

( ११ ) मनाचे चंचलत्वादि भाव पहा:—

हें मन कैसें केवढें। ऐसें पाहों म्हणों तरी न सांपडे। येऱ्हवीं राहाटावया थोडें। त्रैलोक्य यया ॥ ४१२ ॥ म्हणोनि ऐसें कैसें घडेल। मर्कट समाधि घेईल। का रहा म्हणितलिया राहेल। महावात ॥ ४१३ ॥ जें बुद्धीतें सळी। निश्चयातें टाळी। धैर्येंसी हातफळी। मिळऊनि जाय ॥ ४१४ ॥

जें विवेकातें भुलवी । संतोषासी चाड लावी । बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा ॥ ६–४१५ ॥

( १२ ) मन चंचल तर खरेंच, पण अभ्यासवैराग्यानें तें वश करून घेतलें तर तेंच तारक होतें. मनाचा सद्गुण पहाः—

परि वैराग्याचेनि आधारें । जरि लाविलें अभ्यासाचिये मोहरें । तरि केतुलेनि एकें अवसरें । स्थिरावेल ॥ ६–४१९ ॥ कां जे यया मनाचें एक निके । जे देखिले गोडीचिये ठाया सोके । म्हणोनि अनुभवसुखचि कव-तिकें । दावीत जाइजे ॥ ६–४२० ॥

( १३ ) " मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव " ह्या गीताश्लो-कार्धाबद्दल महाराजांनींः—

ऐसें होय दिसे न दिसे । हें मजचिमाजी असे । मियां विश्व धरिजे जैसें । सूत्रें मणी ॥ ७–३१ ॥ सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोविले । तैसें म्यां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरीं ॥ ७–३२ ॥

अशा दोन मार्मिक ओव्या केल्या आहेत. 'मणि सुवर्णाचे आणि सूतही सुवर्णाचेंच' ह्या दृष्टांतानें देव आणि जग यांतलें अभेदत्व येथें सुचविलें आहे.

( १४ ) ब्रह्मीं माया कशी झाली ?:—

परि उदकीं जालीं बाबुळी । ते उदकातें जैसी झांकोळी । कां वायाचि आभाळीं । आकाश लोपे ॥ ७–६० ॥ हें असो डोळ्यांचें । डोळांचि पडळ रचे । तेणें देखणेपण डोळ्यांचें । न गिळिजे कायि ? ॥ ७–६२ ॥ तैसी हे माझीच बिंबली । त्रिगुणात्मक साउली । कीं मजाचि आड वोडवली । जवनिका जैसी ॥ ७–६३ ॥ म्हणऊनि भूतें मातें नेणती । माझीच परी मी नव्हती । नैसीं जळींचीं जळीं न विरती । मुक्ताफळें ॥ ७–६४ ॥

( १५ ) 'दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया' ह्या श्लोकांवर (७–१४) व 'इच्छाद्वेषसमुत्थेन' (७–२७) ह्यावर महाराजांनीं उत्कृष्ट

रूपकें केलीं आहेत. मायेवर नदीचें रूपक पूर्ण बसलें आहे तें मूळांतच पहावें. मायामयसरितेंतून तरतात कोण ? :—

येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले । तयां ऐलीच थडी सरले । मायाजळ ॥ ७–९७ ॥

( १६ ) चतुर्विध भक्तांतला ज्ञानी भक्त देवाला कसा आवडतो ?:—

तैसे शरीरीं इन कर्मे । तो भक्त ऐसा गमे । परी अंतरप्रतीतिधर्मे । मींचि जाला ॥ ७–११६ ॥ पाहे पां दुभतेयाचिया आशा । जग धेनूसि करितसे फांसा । परि दोरेवीण कैसा । वत्साचा बळी ? ॥७–१२०॥ कां जे तनुमनप्राणें । तें आणिक कांहींच नेणे । देखतसांतें म्हणे । हे माय माझी ॥ ७–१२१ ॥ तें येणें मानें अनन्यगती । म्हणऊनि धेनूही तैसीच प्रीति । तयालागीं लक्ष्मीपती । बोलिलें साचें ॥७–१२२॥ अंतःकरणकुहरीं जन्मलीं । जयाची प्रतीतिगंगा मज मीनली । तो मी हे काय बोलीं । फार करूं ? ॥ ७–१२५ ॥

( १७ ) मी देव सहजसिद्ध असतां आहें तसा न पाहतां साधनें करणें हें:—

अमृताच्या सागरीं बुडिजे । आणि तोंडा वज्रमिठी पाडिजे । आणि मनीं तरी आठविजे । थिल्लरोदकातें ॥ १५२ ॥ हें ऐसें कासया करावें । जें अमृतींही रिगोनि मरावें । तें सुखें अमृत होऊनि कां नसावें । अमृतामाजी ? ॥ १५३ ॥ तैसा फळ हेतूचा पांजरा । सांडूनियां धनुर्धरा । कां प्रतीतिपाखीं चिदंबरा । गोसाविया नोहावे ? ॥१५४॥ उमपा माप कां सुवावें ?। मज अव्यक्ता व्यक्त कां मानावें ? । सिद्ध असतां कां निमावें । साधनवरी ? ॥ ७–१५६ ॥

( १८ ) अभ्यासयोग कोणता ? अभ्यास कसला करायचा ?:—

तेंवि सदभ्यास निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर । लावीं मग शरीर । राहो अथवा जावो ॥ ८–८२ ॥

( १९ ) मी देव जवळ असून अश्रद्धधान व विषयी जीवांना कसा दुरावलों आहे पहा:—

पाहें पां दूध पवित्र आणि गोड । पासीं त्वचेचिया पदराआड । परि तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्धचि सेवी ॥ ९–५७ ॥ कां कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि घरीं । परि पराग सेविजे भ्रमरीं । येरा चिखलचि उरे ॥९–५८॥ तैसा हृदयामध्यें मी राम । असतां सर्वसुखाचा आराम । कां भ्रांतासी काम । विषयांवरी ॥ ९–६० ॥

( २० ) 'मया ततमिदं सर्वं' ह्या पदावरच्या पुढील दोन ओव्या पाहिल्या म्हणजे उत्तरोत्तर अधिक चांगल्या दृष्टांत देण्याची महाराजांची खुबी लक्षांत येईलः—

माझिया विस्तारलेपणाचेनि नांवें । हें जगचि नोहे आघवें ? । जैसें दूध मुरालें स्वभावें । तरि तेंचि दहीं ॥ ९–६४ ॥ कां बीजचि जाहलें तरु । अथवा भांगारचि अलंकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हें जग ॥ ९–६५ ॥

येथें 'माझा विस्तार तें हें जग' हा मुख्य सिद्धांत सांगावयाचा असून त्याला दूध–दहीं, बीज–तरु व भांगार–अलंकार हे तीन दृष्टांत दिले आहेत. हे दृष्टांत चढत्या पायरीचे म्ह० एकाहून एक वरचे आहेत. माझा विस्तार म्ह० जग, मीच जग झालों आहे. कसा ? दुधाचें दहीं होतें तसा. पण दहींपणांत दूध आलें कीं त्याचें दूधपण जातें ह्या दृष्टांतांत कार्यकारणाची एकात्मता फक्त आरंभीं आहे, पुढें नाहीं, ही त्यांत गोम आहे. म्हणून दुसरा दृष्टांत बीजतरूचा देतात. ह्यांत आरंभीं व शेवटीं कार्यकारणाची एकात्मता आहे. आधीं बीज व शेवटींही बीजच, पण मध्यें पत्रपुष्पफलरूपता येते तेव्हां बीजत्व दिसत नाहीं. हाही उणेपणा काढून टाकण्यासाठीं सोनें व अलंकार हा दृष्टांत दिला आहे. सोनें आधीं सोनेंच असतें, अलंकारपणांत आलें तरी सोनेंच असतें व अलंकार आटवला तरी सोनेंच रहातें. त्याप्रमाणें जगाच्या पूर्वी, जग जगपणांत असतांना व जगाचा प्रळय झाला तरी त्यांत श्रीहरि शाश्वतच आहे. जगाच्या उत्पत्तिस्थितिलय ह्या तीनही काळीं परमात्मा अखंड,

अनुस्यूत व नित्य आहे. तिसरा दृष्टांत त्रिकालदर्शक असल्यामुळें पूर्ण आहे.

( २१ ) गीताज्ञानेश्वरींतला ९ वा अध्याय भाविक वारकऱ्यांचा फार आवडता आहे. यांत व मुख्यतः यांतील १४, ३१, ३२ ह्या तीन श्लोकांवरील ओव्यांत महाराजांनीं भक्तिमार्ग सांगून टाकिला आहे.

'सततं कीर्तयन्तो मां' ह्या श्लोकांतील 'कीर्तयंतः' ह्या पदावरील टीकाः—

तरी कीर्तनाचेनि नटनाचे । नाशिले व्यवसाय प्रायश्चितांचे । जे नामाचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥ ९–१९७ ॥ यम म्हणे काय यमावें । दम म्हणे कवणातें दमावें । तीर्थें म्हणतीं काय खावें । दोष औषधासि नाहीं ॥ ९–१९९ ॥ ऐसें माझेनि नामघोषें । नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें । अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥ ९–२०० ॥ राया रंका पाड धरूं । नेणती सानेयांथोरां कडणसी करूं । एकसरें आनंदाचें आवारु । होत जगा ॥ २०२ ॥ कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें । ऐसें नामघोषगौरवें । धवळलें विश्व ॥ २०३ ॥ तो मी वैकुंठीं नसे । वेळ एक भानुबिंबींही न दिसे । वरी योगियांचीही मानसें । उमरडोनि जाय ॥२०७॥ परी तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा । जेथ नामघोष बरवा । करिती माझा ॥ २०८ ॥ कैसे माझ्या गुणीं धाले । देशकाळातें विसरले । कीर्तनसुखें सुखावले । आपणपांचि ॥ २०९ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामांचे निखिल प्रबंध । माजीं आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ ९–२१० ॥

( २१ ) 'यांति मद्याजिनोपि माम्' ( ९–२५ ) ह्या चरणावरील गोड टीकाः—

मग मीचि डोळां देखिला । जिहीं कानीं मीचि ऐकिला । मीचि मनीं भाविला । वानिला वाचा ॥ ३५९ ॥ सर्वांगीं सर्वांठायीं । मीचि नमस्कारिला जिहीं । दानपुण्यादिकें जें कांहीं । तें माझियाचि मोहरां ॥ ३६० ॥

जिहीं मातेंचि अध्ययन केलें। जे आंतबाहेरि मियांचि धाले। जयांचें जीवित्व जोडलें। मजचिलागीं ॥ ३६१ ॥ जे अहंकार वाहत अंगीं। आम्ही हरीचे भूषावयालागीं। जे लोभिये एकचि जगीं। माझेनि लोभें ॥ ३६२ ॥ जे माझेनि कामें सकाम। जे माझेनि प्रेमें सप्रेम। जे माझिया भुली सभ्रम। नेणती लोक ॥ ३६३॥ अर्जुना! माझे ठायीं। आपणपेंवीण सौरस नाहीं। मी उपचारें कवणाही। नाकळे गा! ॥ ३६७ ॥ थोरपण पऱ्हां सांडिजे। एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे। जैं जगा धाकुटें होइजे। तैं जवळिक माझी ॥ ९–३७८ ॥

( २३ ) भक्तीचें वर्म महाराज सांगतातः—

माझिये भक्तीविण। जळो तें जियालेपण। अगा! पृथ्वीवरी पाषाण। नसती काई? ॥ ४३६ ॥ पै हिवराची दाट साउली। सज्जनीं जैसी वाळिली। तैसीं पुण्यें डावलूनि गेलीं। अभक्तातें ॥४३७॥ जयांचिये वाचे माझे आलाप। दृष्टी भोगी माझेंचि रूप। जयांचें मन संकल्प। माझाचि वाहे ॥ ४४५ ॥ माझिया कीर्तीवीण। जयांचे रिते नाहीं श्रवण। जयां सर्वांगीं भूषण। माझी सेवा ॥ ४४६ ॥ ते पापयोनीही होतु कां। ते श्रुताधीतही न होतु कां। परि मजसीं तुकितां तुका। तुटी नाहीं ॥४४९॥ पाहे पां भक्तीचेनि आथिलेपणें। दैत्यीं देवां आणिलें उणें। माझें नृसिंहत्व लेणें। जयाचिये महिमे ॥ ४५० ॥ उत्तमत्व तैंचि तरे। तैंचि सर्वज्ञता सरे। जैं मनोबुद्धि भरे। माझेनि प्रेमें ॥ ४५५ ॥ म्हणोनि कुळजातिवर्ण। हें आघवेंचि गा अकारण। एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक ॥४५६॥ तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया। कां शूद्र अंत्यजादि इया। जाती तंवचि वेगळालिया। जंव न पवती मातें ॥ ४५७ ॥ यालागीं पापयोनीही अर्जुना। कां वैश्य शूद्र अंजना। मातें भजतां सदना। माझिया येती ॥ ४७४ ॥

( २४ ) भक्तियोगाचें लक्षण ऐकाः—

ऐसे जे निजज्ञानी। खेळत सुखें त्रिभुवनीं। जगद्रूपा मनीं। सांठवूनि

मातें॥१०–११७॥जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत । हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ॥ १०–११८ ॥

( २५ ) त्याच त्या सिद्धांताच्या गोष्टी वारंवार सांगून पुनरुक्तिदोष होतो त्याच्या परिहाराची पुढील सुंदर ओवी पहा:—

हां गा सूर्य काय शिळा ? । अग्नि म्हणों येत आहे वोवळा ? । कां नित्य वाहतया गंगाजळा । पारसेपण असे ? ॥ १०–२०२ ॥

( २६ ) प्रत्यहीं कांहीं नियमित काळपर्यंत हरिभजनीं चित्त लावीत जा म्हणजे तें हळू हळू विषयांतून निघून चैतन्यरूप होईल, हा **अभ्यास-योग** सांगतांना महाराज म्हणतात:—

तरी गा ऐसें करीं । यया आठां पाहारांमाझारीं । मोटकें निमिषभरी । देत जाईं ॥ १०५ ॥ मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख । तेंतुलें आरोचक । विषयी घेईल ॥ १०६ ॥ पुनवेहूनि जैसें । शशिबिंब दिसें-दिसें । हारपत अवसें । नाहींच होय ॥ १०८ ॥ तैसें भोगाआंतूनि निगतां चित्त मजमाजी रिगतां । हळू हळू पंडुसुता । मीचि होसील ॥ १०९ ॥ अगा ! अभ्यासयोग म्हणिजे । तो हा एक जाणिजे । येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥ ११० ॥ पै अभ्यासाचेनि बळें । एका गति अंतराळें । व्याघ्र सर्प प्रांजळें । केले एकीं ॥ १११ ॥ विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे । एकीं वाग्ब्रह्म थोकडें । अभ्यासें केलें ॥ ११२ ॥ म्हणोनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं । यालागिं माझ्या ठायीं । अभ्यासें मिळे ॥ १२–११३ ॥

( २७ ) बाराव्या अध्यायांत ' अद्वेष्टा सर्व भूतानां ' येथपासूनच्या ७।८ श्लोकांवर जें महाराजांनीं अनुपम भाष्य केलें आहे त्यांत शांतिसुख भोगणाऱ्या भक्तांचीं लक्षणें फार बहारीचीं सांगितलीं आहेत. ह्या ओव्या अत्यंत प्रसिद्ध आहेत. त्यांतील उपमा उदात्त व गोड आहेत, आणि वाक्प्रवाह सहज व अस्खलित आहे. थोड्याशा ओव्या पहा:—

तो सर्वभूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेचि कहीं । आपपर जया नाहीं । चैतन्या जेवीं ॥ १४४ ॥ उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे । हें

कांहींचि नेणिजे । वसुधा जेवीं ॥ १४५ ॥ कां रायाचे देह चाळूं । रंका परौते गाळूं । हें न म्हणेचि कृपाळू । प्राण पैं गा ॥ १४६ ॥ गाईची तृषा हरूं । व्याघ्रा विष होऊनि मारूं । ऐसें नेणेचि गा करूं । तोय जैसें ॥ १४७ ॥ आणि मी हें भाष नेणे । माझें कांहींच न म्हणे । सुखदुःख जाणणें । नाहीं जया ॥ १४९ ॥ वार्षियेवीण सागर । जळें जैसा निर्भर । तैसा निरुपचार । संतोषी जो ॥ १५१ ॥ जीव परमात्मा दोनी । बैसले एकासनीं । जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ॥ १५३ ॥ जगचि देह जाहलें । म्हणोनि प्रियाप्रिय गेलें । हर्षामर्ष ठेले । दुजेनाविण ॥ १६८ ॥ आंत बाहेरि चोखाळ । सूर्य जैसा निर्मळ । आणि तत्वार्थींचा पायाळ । देखणा जो ॥ १७९ ॥ व्यापक आणि उदास । जैसें का आकाश । तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥ १८० ॥ जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींच न देखे । म्हणोनि भोगविशेखें । हरिखेना जो ॥ १९० ॥ पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे । हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ १९२ ॥ पार्था! जयाचिया ठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं । रिपुमित्रां दोहीं । सरिसा पाडु ॥ १९७ ॥ कां घरिंचिया उजियेड करावा पारखियां आंधार पाडावा । हें नेणेचि गा पांडवा । दीप जैसा ॥ १९८ ॥ जो खांडावया घाव घाली । कां लावणी जयानें केली । दोघां एकचि साउली । वृक्ष दे जैसा ॥ १९९ ॥ ना तरी इक्षुदंडु । पाळितया गोडु । गाळितया कडु । नोहेचि जेविं ॥ २०० ॥ अरिमित्रीं तैसा । अर्जुना जया भाव ऐसा । मानापमानीं सरिसा । होत जाय ॥ २०१ ॥ तिहीं ऋतूंसमान । जैसें कां गगन । तैसा एकचि मान । शीतोष्णीं जया ॥ २०२ ॥ दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पांडुसुता । तैसा सुखदुःख प्राप्ता । मध्यस्थ जो ॥ २०३ ॥ माधुर्यें चंद्रिका । सरिसी राया रंका । तैसा जो सकळिकां । भूतां सम ॥ २०४ ॥ आघवियां जगा एक । सेव्य जैसें उदक । तैसें जयातें तिन्ही लोक । कांक्षिती गा ॥ २०५ ॥ जो निंदेतें नेघे । स्तुती न श्लाघे । आकाशा न लगे । लेप जैसा ॥ २०७ ॥ जो यथालाभें संतोखे । अलाभें

न पारुखे । पाउसेंवीण न सुके । समुद्र जैसा ॥ २१० ॥ हें विश्वाचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ २१३ ॥ तो पाहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसि मज डोळे । हातीं-चेनि लीलाकमळें । पूजूं तयातें ॥२२३॥ दोंवरी दोनी । भुजा आलों घेऊनी आलिंगावया लागूनी । तयाचें आंग ॥ २२४ ॥

तेराव्या अध्यायांत 'अमानित्वा'दि ज्ञानाचीं २६ लक्षणें सांगितलीं आहेत व 'मानित्वा'दि अज्ञानाचीं त्याचप्रमाणें २६ लक्षणें सांगितलीं आहेत. त्यांचें स्पष्टीकरण महाराजांनीं किती उत्कृष्ट केलें आहे हें मूळ पाहिल्याशिवाय नीट कळणार नाहीं. ह्या प्रसंगावरच्या मूळ ६ श्लोकांवर त्यांनीं सुमारें ७०० अत्यंत रसभरित ओव्या केल्या आहेत. तेराव्या अध्यायापासून तो सोळाव्याच्या अखेरपर्यंत त्यांनीं अनेक शब्दांच्या उत्कृष्ट व्याख्या दिल्या आहेत, अनेक शब्दांचीं रसपूर्ण अशीं व्याख्यानें दिलीं आहेत व अनेक शब्दांचे भावार्थ मनावर पूर्ण ठसण्यासारखे सद्गुण-विशिष्ट अशा लोकांचीं मनोरम वर्णनें दिलीं आहेत. ग्रंथविस्तारभयास्तव कांहीं थोडेच मासले देतों.

## २८ अमानित्व.

पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी । हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोका ॥ १८९ ॥ वाचस्पतीचेनि पाडे । सर्वज्ञता जरी जोडे । परि वेडिवेमाजि दडे । महिमेभेणें ॥ १९१ ॥ चातुर्य लपवी । महत्व हारवी । पिसेपण मिरवी । आवडोनी ॥ १३–१९२ ॥

## २९ अदांभित्व.

खडाणे आला पान्हा । पळवी जेविं अर्जुना । कां लपवी पुण्यांगना । वडिलपण ॥ २०५ ॥ आढ्य आंतुडे अडवी । मग आढ्यता जेविं हारवी नातरी कुळवधू लपवी । अवयवांतें ॥ २०६ ॥ नाना कृषीवळ आपुलें ।

पांघुरवी पेरिलें । तैसें झांकी निपजलें । दान पुण्य ॥ २०७ ॥ वरिवरी देह न पूजी । लोकांतें न रंजी । स्वधर्म वाग्ध्वजीं । बांधों नेणे ॥२०८॥ परोपकार न बोले । न मिरवी अभ्यासिलें । न शके विकूं जोडलें । स्फीती-साठीं ॥ १३–२०९ ॥

## ३० ज्ञान्याचें चालणें.

कमळावरी भ्रमर । पाय ठेविती हळुवार । कुचंबेल केशर । इया शंका ॥२४८॥ तैसे परमाणु पा गुंतले । जाणूनि जीव सानुले । तेथ कारुण्यामाजि पाउलें । लपवूनि चाले ॥ २४९ ॥ ते वाट कृपेची करित । ते दिशाचि स्नेहभरित । जीवातळीं आंथरित । आपुला जीव ॥१३–२५०॥

## ३१ ज्ञान्याचें बोलणें.

स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार । मुख मोहाचें माहेर । माधुर्या जाहले अंकुर । दशन तैसे ॥ १३-२६२ ॥ पुढां स्नेह पाझरे । माघां चालती अक्षरें । शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥२६३॥ तंव बोलणेंचि नाहीं । बोलों म्हणे जरी कांहीं । तरी बोल कोणाही । खुपेल कां ॥ २६४ ॥ तरि दुवाळी कोणा नोहावी । भंवई कवणाची नुचलावी । ऐसा भाव जीवीं । म्हणोनियां ॥ २६७ ॥ मग प्रार्थिला विपायें । जरि लोभें बोलों जाये । तरि परिसत्या होये । मायबाप ॥ २६८ ॥ कां नादब्रह्मचि मुसें आलें । कीं गंगापय अळसलें । पतिव्रते आलें। वार्धक्य जैसें॥२६९॥ तैसे साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ । शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ २७० ॥

## ३२ क्षांति.

त्रिविध मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे । वरि पडिलिया नव्हे । वांकुडा जो ॥ ३४४ ॥ जो मानापमानातें साहे । सुखदुःख जेथ सामाये निंदास्तुति नोहे । दुखंड जो ॥ ३४६ ॥ घेऊनि जळाचे लोट । आलिया नदीनदांचे संघाट । करी वाड पोट । समुद्र जेविं ॥ ३५० ॥ तैसें

जयाचिया ठायीं । न साहणें कांहींचि नाहीं । आणि साहतसें ऐसेंही । स्मरण नुरे ॥ ३५१ ॥

## ३३ आर्जव म्ह० सरळपणा.

तोंड पाहूनि प्रकाशु । न करी जेविं चंडांशु । जगा एक अवकाशु । आकाश जैसें ॥३५६॥ तैसें जयाचें मन । माणुसाप्रति आन आन । नोहे आणि वर्तन । ऐसें पै तें ॥ ३५७ ॥ जे जगचि सनोळख । जगेंसी जुनाट सोयरिक । आपपर हे भाख । जाणणें नाहीं ॥ ३५८ ॥ वारियाची धांव । तैसें सरळ भाव । शंका आणि हांव । नाहीं जया ॥ ३६० ॥ मायेपुढें बाळका । रिगतां नाहीं शंका । तैसें मन देतां लोकां । नालोची जो ॥ ३६१ ॥ फांकलिया इंदीवरा । परिवर नाहीं धनुर्धरा । तैसा कोनाकोपरां । नेणेचि जो ॥३६२॥ चोखाळपण रत्नाचें । रत्नावरी कनकाचें । तैसें पुढें मन जयाचें । करणें पाठीं ॥ ३६३ ॥ दिठी नोहे मिणधी । बोलणें नाहीं संदिग्धीं । कवणेसीं हीनबुद्धी । राहटों नेणे ॥ ३६५ ॥ दहाही इंद्रियें प्रांजळें । निष्प्रपंचें निर्मळें । पांचही पालव मोकळे आठही प्रहर ॥ ३६६ ॥

## ३४ स्थैर्य.

देह तरी वरचिलीकडे । आपुलियापरी हिंडे । परी बैसका न मोडे । मानसीची ॥ ४८६ ॥ जातया अभ्रासवें । जैसें आकाश न धांवे । भ्रमणचक्रीं न भंवे । ध्रुव जैसा ॥ ४८९ ॥ दैन्यदुःखीं न तपे । भयशोकीं न कंपे । देहमृत्यु न वासिपे । पातलेनी ॥ ४९३ ॥ निंदा निस्तेज दैडी । काम लोभ वरपडी । परी रोम नोहे वांकुडी । मानसाची ॥ ४९५ ॥

## ३५ अनन्यभक्ति.

शरीरवाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोश । एक मीवांचूनि वास । न पाहती आन ॥ ६०५ ॥ मिळोनि मिळताचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें । मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥ ६०८ ॥

## ३६ एकांतप्रीति.

आणि तीर्थें धौतें तटें । तपोवनें चोखटें । आवडती कपाटें । वसवूं जया ॥ ६१२ ॥ शैलकक्षांचीं कुहरें । जळाशयपरिसरें । अधिष्ठी जो आदरें नगरा न ये ॥ ६१३ ॥ बहु एकांतावरी प्रीती । जया जनपदाची खंती । जाण मनुष्याकारें मूर्ती । ज्ञानाची तो ॥ ६१४ ॥

## ३७ अज्ञानी पुरुष.

घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा । करी तेतुलें मोहरा । स्फीतीचिया ॥ ६६० ॥ निंदा मोटकी आइके । आणि कपाळ धरूनि ठाके । थेंबे विरे, वारेनि शोखे । चिखल जैसा ॥ ६६७ ॥ जैसें पोटालागीं सुणें । उघडें झांकलें न म्हणे । तैसें आपुलें परावें नेणे । द्रव्यालागीं ॥६८०॥ तयाच्या ठायीं उदंड । अज्ञान असे वितंड । जो चांचल्यें भावंड । मर्कटाचें ॥ ६९२ ॥ आंधळें हातिरूं मातलें । कां डोंगरीं जैसें पेटलें । तैसें विषयीं सुटलें । चित्त जयाचें ॥ ६९९ ॥ जो लाटणें ऐसा न लवे । पाथर तेंवि न द्रवे । गुणियासी नाठवे । फोडसें जैसें ॥७२६॥ आंगामनासि रुचावें । येतुलेनि कृत्याकृत्य नाठवे । जो करणेंयाचेनि नांवें । भलतेंचि करी ॥ ७७८ ॥ ठेला बेडुक कुंडीं । मशक गुंतला शेंबुडीं । जसा ढोर सबुडबुडीं । रुतला पंकीं ॥ ७८४ ॥ तेतुलेंनि पाडें पार्था । घरीं जया प्रेमआस्था । आणि स्त्रीवांचूनि सर्वथा । जाणेना जो ॥ ७८९ ॥ चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेनि छंदें नाचे । माकड गारुडियाचें । जैसें होय ॥ ७९३ ॥

## ३८ देह आणि आत्मा.

देह तंव पांचांचें जालें । हें कर्माचे गूणीं गुंथलें । भंवतसे चाकीं सूदलें । जन्ममृत्यूच्या ॥ ११०४ ॥ हें काळानळाच्या कुंडीं । घातली लोणियाची उंडी । माशी पांख पाखडी । तंव हें सरे ॥ ११०५ ॥ हें विपायें

आगींत पडे । तरि भस्म होऊनि उडे । जाहलें श्वानावरपडें । तरी तें विष्ठा ॥११०६॥ या देहाची हे दशा । आणि आत्मा तो ऐसा । पै शुद्ध नित्य अपैसा । अनादिपणें ॥११०८॥ सकळ ना निष्कळ । अक्रिय ना क्रियाशीळ । कृश ना स्थूळ । निर्गुणपणें ॥ ११०९ ॥ साभास ना निराभास । प्रकाश ना अप्रकाश । अल्प ना बहुवस । अरूपपणें ॥ १११० ॥ आनंद ना निरानंद । एक ना विविध । मुक्त ना बद्ध । आत्मपणें ॥ १११२ ॥ येतुला ना तेतुला । आइता ना रचिला । बोलता ना उगला । अलक्षपणें ॥ १११३ ॥ मवे ना चर्चे । वाढे ना खांचे । विटे ना वेंचे । अव्ययपणें ॥ १११५ ॥ एवंरूप पै आत्मा । देही जें म्हणती प्रियोत्तमा । तें मठाकारें व्योमा । नाम जैसें ॥ १११६ ॥

## ३९ परमेश्वर आणि जग.

याकरणें मी पिता । महद्ब्रह्म हे माता । अपत्य पंडुसुता जगडंबर ॥ १४–११७ ॥ आणि संबंध तोही ऐसा । मृत्तिके घट लेंक जैसा । कां पटत्व कापुसा ॥ नातू होय ॥ १२१ ॥ नाना कल्लोळपरंपरा । संतती जैसी सागरा । आम्हां आणि चराचरा । संबंध तैसा ॥ १२२ ॥ जालेनि जगें मी झांकें । तरि जगत्वें कोण फांके ? । किळवरी माणिकें । लोपिजे काई ? ॥ १२४ ॥ अळंकारातें आलें । तरी सोनेंपण काई गेलें ? । कीं कमळ फांकलें । कमळत्वा मुके ? ॥ १२५ ॥ सांग पा धनंजया । अवयवीं अवयविया । आच्छादिलें कीं तया । तेंचि रूप ? ॥ १२६ ॥ म्हणोनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें । तैसा नोहे उखितें । आघवें मीचि ॥ १२८ ॥

## ४० वैराग्य.

मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाहीं आन । परि तेंचि थारे ऐसें मन । शुद्ध होआवें ॥ ३५ ॥ तरि विरक्तीवांचूनि कहीं । ज्ञानासि तगणें नाहीं । हें विचारूनि ठाईं । ठेविलें देवें ॥ ३६ ॥ जें विषें रांधिली रससोये । जैं

जेवणारा । ठाउवी होये । तैं तो ताटचि सांडूनि जाये । जयापरी ॥ ३८॥ तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठी लागे ॥ १५–३९ ॥

## ४१ दान.

आतां देह वाचा चित्तें । यथासंपन्नें वित्तें । वैरी जालियाही आर्ततें । न वंचणें जें कां ॥ १६–८५ ॥ फुलीं फळीं छाया । मुळीं पत्रींही घनंजया । वाटेचा न चुके आलिया । वृक्ष जैसा ॥ ८६ ॥ तैसें मनौनि धनवरी । विद्यमानें आल्या अवसरीं । श्रांतांचिये मनोहारीं । उपेगा जाणें ॥ ८७ ॥ तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानाचें अंजन । ... ...

## ४२ स्वाध्याय.

आतां चेंडुवें भूमी हाणिजे । हें नव्हे, तो हातां आणिजे । कीं शेतीं बीं विखुरिजे । परि पिकीं लक्ष ॥ १६—१०० ॥ तैसा प्रतिपाद्य जो ईश्वर । तो होवयालागीं गोचर । श्रुतीचा निरंतर । अभ्यास करणें ॥ १०३ ॥ तें द्विजांसींच ब्रह्मसूत्र । येरां स्तोत्र कां नाममंत्र । आवर्तणें पवित्र । पावावया तत्व ॥ १०४ ॥ पार्था गा स्वाध्यावो । बोलिजे तो हा म्हणे देवो । ... ...

## ४३ तप.

तरी दानें सर्वस्व देणें । वेंचणें तें व्यर्थ करणें । जैसें फळौनि स्वयें सुकणें । ओषधीचें ॥ १०६ ॥ तैसा स्वरूपाचिया प्रसरा—। लागीं प्राणेंद्रियशरीरा । आटणी करणें जें वीरा । तेंचि तप ॥ १६—१०८ ॥

## ४४ अहिंसा.

आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीरवाचामानसें । राहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥ १६–११४ ॥

## ४५ अपैशुन म्ह० सौजन्य.

अगा पुढिलाचे दोष । करूनि आपुलिये दिठी चोख । मग घापे अवलोक । तयावरी ॥ १४७ ॥ जैसा पुजूनि देव पाहिजे । पेरूनि शेता जाइजे । तोषौनि प्रसाद घेइजे । अतिथीचा ॥ १४८ ॥ तैसें आपुलेनि गुणें । पुढिलाचें उणें । फेडूनियां पाहणें । तयाकडे ॥ १४९ ॥

## ४६ आहारशुद्धि.

येऱ्हवीं तरी पाहीं । स्वभाववृद्धीच्या ठायीं । आहारावांचूनि नाहीं । बळी हेतु ॥११२॥ जैसा घेपे आहार । धातु तैसाचि होय आकार । आणि धातु ऐसा अंतर–। भाव पोखे ॥ ११६ ॥ जैसें भांडियाचेनि तापें । आंतुलें उदकही तापे । तैशी धातुवशें आटोपे । चित्तवृत्ती ॥ ११७ ॥ म्हणौनि सात्विक रस सेविजे । तैं सत्वाची वाढी पाविजे । राजसा तामसा होइजे । येरीं रसीं ॥ १७–११८ ॥

## ४७ त्रिविध ज्ञान.

तरि अर्जुना गा तें फुडें । सात्विक ज्ञान चोखडें । जयाच्या हृदयीं ज्ञेय बुडे । ज्ञातेनिसी ॥५२९॥ जैसा सूर्य न देखे आंधारें । सरिता नेणिजती सागरें । कां कवळिलिया न धरे । आत्मच्छाया ॥ ५३० ॥ तयापरी जया ज्ञाना । शिवादि तृणावसाना । इया भूतव्यक्ति भिन्ना । नाडळती ॥५३३॥ तें सात्विक ज्ञान । जें मोक्षलक्ष्मीचें भुवन । हें असो आइक चिन्ह । राजसाचें ॥ १८–५५७ ॥

× × × × × ×

तरि पार्था परियेस । तें ज्ञान गा राजस । जें भेदाची कांस । धरूनि चाले ॥ ५३८ ॥ अळंकारपणें झांकलें । बाळकां सोनें वायां गेलें । तैसें नामीं रूपीं दुरावलें । अद्वैत जया ॥ ५४२ ॥ अवतरलीं गाडग्यां घडां । पृथ्वी अनोळख झालीं मूढां । वन्हि झाला कानडा । दीपत्वासाठीं

॥ ५४४ ॥ तैसी जया ज्ञाना । जाणोनि भूतव्यक्ति भिन्ना । ऐक्यबोधाची भावना । निमोनि गेली ॥ ५४५ ॥

× × × × × ×

आतां तामसाचेंही लिंग । सांगेन तें ओळख चांग । डावलावया मातंग– । सदन जैसें ॥ ५४८ ॥ तरि किरीटी जें ज्ञान । हिंडे विधीचेनि वस्त्रें हीन । श्रुती पाठमोरी नग्न । म्हणोनि तया ॥ ५४९ ॥ अगा वांता कां वाढिलेया । साजुक कां सडलिया । विवेक कावाळिया । नाहीं जैसा ॥ ५५६ ॥-तैसें निषिद्ध सांडूनि घ्यावें । कां विहित आदरें घ्यावें । हें विषयांचेनि नांवें । नेणेचि जें ॥५५७॥ जेतुलें आड पडे दिठी । तेतुलें घेचि विषयासाठीं । मग तें स्त्रीद्रव्य वाटी । शिश्नोदरा ॥५५८॥ तयाचिपरी खाद्याखाद्य । न म्हणे निंद्यानिंद्य । तोंडा आवडे तें मेध्य । ऐसाचि बोध ॥ ५६० ॥ ऐसेंनि विश्व सकळ । जेणें विषयचि मानिलें केवळ । तया एकं जाण फळ । देहभरण ॥ ५६४ ॥

## ४८ स्वजातिधर्म.

तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥ ९१७ ॥ अगा ! आपला हा स्वधर्म । आचरणीं जरी विषम । तरि पहावा तो परिणाम । फळेल जेणें ॥ ९२३ ॥ अगा ! पाणियाहूनि बहुवें । तुपीं गुण कीर आहे । परि मीना काय होये । असणें तेथ ? ॥ ९२९ ॥ पै आघविया जगा जें विख । तें विखकिडिया पीयूख आणि गुळ तें देख । मरण दे तया ॥ ९३० ॥ यालागीं कर्म आपलें । जें जातिस्वभावें असे आलें । तें करी तेणें जिंतिलें । कर्मबंधातें ॥ ९३३ ॥

## ४९ भक्ताची देवपूजा.

म्हणोनि सर्व मी जालेपणें । ठेलें तया येणें जाणें । तेंचि गा यात्रा करणें । अद्वया मज ॥ ११६८ ॥ एवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन । अद्वया मज गमन । तो चाले तेंवी ॥ ११८० ॥ तो करी तेतुली

पूजा । तो कल्पी तो जप माझा । तो निजे तेचि कपिध्वजा । समाधि माजी ॥११८१॥ जैसें कनकेसीं कांकणें । असिजे अनन्यपणें । तो भक्तियोगें येणें । मजसी तैसा ॥ ११८२ ॥

## ५० " मामेकं शरणं व्रज. "

हातीं घेऊनि तो दोर । सांडिजे जैसा सर्पाकार । कां निद्रात्यागें घरावार । स्वप्नींचा जैसा ॥ १३९२ ॥ तैसें धर्माधर्मांचे टवाळ । दावी अज्ञान जें कां मूळ । तें त्यजूनि त्यजी सकळ । धर्मजात ॥१३९५॥ मग अज्ञान निमालिया । मीचि एक असे अपैसया । सानिद्र स्वप्न गेलिया । आपणपें जैसें ॥१३९६॥ तैसा मी एकत्वांचूनि कांहीं । मग भिन्नाभिन्न आन नाहीं । सोऽहंबोधें तयाच्या ठायीं । अनन्य होय ॥१३९७॥ पै आपुलेनि भेदेंवीण । माझें जाणिजे जें एकपण । तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥१३९८॥ जैसें घटाचेनि नाशें । गगनीं गगन प्रवेशे । मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ॥ १३९९ ॥ सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळ जैसा पाणिया । तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥ १४०० ॥ मजही शरण रिघिजे । आणि जीवत्वेंचि असिजे । धिक् बोलीं इया नलजे । प्रज्ञा केंवि ॥ १४०२ ॥ अगा ! प्राकृताही राया । आंगीं पडे जें धनंजया । तें दासिरूही कीं तया । समान होय ! ॥१४०३॥ मा मी विश्वेश्वर भेटे । आणि जीवग्रंथी न सुटे । हे बोल नको वोखटे । कानीं लाऊं ॥ १४०४ ॥

× × × × × ×

ऐसें सर्वरूपरूपसें । सर्वदृष्टिडोळसें । सर्वदेशनिवासें । बोलिलें श्रीकृष्णें ॥ १४१७ ॥ मग सांवळा सकंकण । बाहु पसरोनि दक्षिण । आलिंगिला स्वशरण । भक्तराज तो ॥ १४१८ ॥ हृदया हृदय एक जालें । ये हृदयींचें तें हृदयीं घातलें । द्वैत न मोडितां केलें । आपणा ऐसें अर्जुना ॥१४२१॥ दीपें दीप लाविला । तैसा परिष्वंग तो जाला । द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थ ॥ १४२२ ॥

## ५१ अर्जुनाची कबुली.

आतां मोह असे कीं नाहीं । हें ऐसें जी पुससी काई । कृतकृत्य जाहलों पाहीं । तुझे गुणें ॥ १५६२ ॥ गुंतलों होतों अर्जुनपणें । तो मुक्त जाल्रें तुझेपणें । आतां पुसणें सांगणें । दोन्हीं नाहीं ॥ १५६३ ॥ तुझेनि मज मी पावोनि । कर्तव्य गेलें निपटूनि । परि आज्ञा तुझीवांचोनि । आन नाहीं प्रभो ॥ १५६७ ॥ जें मज—तुम्हां आड । होतें भेदाचें कवाड । तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ १५७४ ॥

संजय म्हणतातः—

उटूनि दोन्ही आरसे । वोढविलिया सरिसे । कोणकोणा पाहातसे । कल्पावे पा ! ! ॥ १५७७ ॥

× × × × × ×

२. हे उतारे पुष्कळच झाले, पण ज्ञानेश्वरमहाराजांची वाग्दानपद्धति किती रमणीय आहे, व वाचा आणि अर्थ हे कसे अन्योन्यशोभादायक आहेत हें वाचकांस समजून त्यांचा लीलेनें केलेला बोध वाचकांच्या मनावर ठसावा यासाठीं ते दिले आहेत. गीतेप्रमाणें ज्ञानेश्वरींत कर्म, उपासना व ज्ञान हे तीनही मार्ग मोक्षदायक कसे आहेत, व त्यांचें जीवानें कसें अनुष्ठान करावें हें महाराजांनीं फार मनोहर रीतीनें सांगितलें आहे. कर्म, ज्ञान व उपासना हे शब्द दिसायला मात्र वेगळे आहेत, पण 'तेचि भक्ति तेचि ज्ञान एक विठ्ठलचि जाण' हेंच सर्व ग्रंथाचें मर्म आहे. अद्वैत आणि भक्ति किंवा निर्गुण आणि सगुण यांचा ज्ञानेश्वरींत उत्कृष्ट मिलाफ झाला आहे. महाराज ज्ञानीभक्त असल्यामुळें अद्वैतभक्तीच्या प्रेमानें सर्व ज्ञानेश्वरी रंगलेली आहे. आचार्यांच्या भाष्याची थोडीशी छाया ज्ञानेश्वरीवर पडलेली आहे. पंधराव्या अध्यायांत वृक्षरूपकाचें महाराजांनीं प्रयोजन सांगितलें आहे तें वर ३९ व्या अवतरणांत दिलें आहे. त्याच्याशीं आचार्यांच्या भाष्यांतील " तत्र तावद्वृक्षरूपककल्पनया वैराग्यहेतोः संसारस्वरूपं वर्णयति विरक्तस्यहि संसाराद्भगवत्तत्वविज्ञानेऽधिकारो नान्यस्येति "

हा उतारा ताडून पाहण्यासारखा आहे. 'दंभ' म्हणजे 'धर्मध्वजित्वम्' असें आचार्य म्हणतात व 'स्वधर्म वाग्ध्वजीं बांधों नेणें' ह्या प्रमाणें महाराज त्याचा अर्थ सांगतात. 'भाष्यकारातें वाट पुसत' मीं टीका केली आहे असें ( अ० १८–१७२३ ) महाराज स्वतः सांगतात. अद्वैतप्रतिपादनापुरती महाराजांनीं आचार्यांना वाट पुसली असेल, बाकी ज्ञानेश्वरींतलां सर्व रंग त्यांच्या अंगचा आहे. महाराजांचें अंतःकरण कृष्णप्रेमानें सगुणप्रेमानें, अत्यंत रंगलेलें असे. ज्ञानेश्वरीवर शंकराचार्यांपेक्षां रामानुजांच्या मतांची अधिक छाप पडली आहे असें एक मत निघालें आहे, पण ज्ञानेश्वरांचें सारें तत्वज्ञान अद्वैतपर आहे यांत शंका नाहीं. आचार्य व ज्ञानेश्वर यांत भेद उभा करण्याचा प्रयत्नही यशस्वी होणें शक्य दिसत नाहीं. निर्गुणप्रतिपादनप्रसंगीं सुद्धां झट्दिशीं ते सगुणाकडे येतात व सगुणनिर्गुणांची एकात्मता दाखवितात. एकच उदाहरण देतों. सहाव्या अध्यायांत कुंडलिनीच्या वर्णनौघांत वाहत जातां जातां ते निर्गुणबोधांत गेले व "जेथून शब्दजात मागें सरतें, जेथें संकल्पाचें आयुष्य संपतें, विचार जेथें मावळतो, जें उन्मनीचें लावण्य, जें तुर्येचें तारुण्य, जें विश्वाचें मूळ, जें योगद्रुमाचें फळ, जें महाभूतांचें बीज, जें महातेजाचें तेज" असें सांगत सांगत "जें आकाराचा प्रांत । जो मोक्षाचा एकांत । जेथ आदि आणि अंत । विरोनि गेले" अशा प्रकारें पार गेले आणि लगेच सगुणप्रेम चित्तांत उचंबळून "ते हे चतुर्भुज कोंभेली । जयाची शोभा रूपासि आली। देखोनि नास्तिकीं नोकिलीं । भक्तवृंदें" ( अ० ६–३२४ ) असें म्हणून सगुणानिर्गुण एक असें सांगून गेले ! त्यांच्या अभंगांतही हाच प्रकार आहे ! महाराजांचें तत्त्वज्ञान अमृतानुभवांत स्पष्ट केलें आहे, तथापि त्याची दिशा त्यांनीं ज्ञानेश्वरींतही दाखविली आहे. वरील ३८ व्या उताऱ्याचा नीट विचार करावा म्हणजे तें कळेल. हें जग मिथ्या, मायिक, अज्ञानकृत असें नसून तें श्रीहरीचा विलास आहे, जग केवळ चिद्विलास आहे असें

त्यांनीं तेथें अनेक दृष्टांतांसह दाखविलें आहे. वरील दोन सिद्धांतांच्या पायावर त्यांच्या बोधाची उभारणी झालेली आहे. सगुणनिर्गुण एक हरि आहे, म्हणजेच जग हें चिद्विलास आहे, ह्या सिद्धांताच्या रेषेंत त्यांचा सारा नीतिबोधही आहे. नीति धर्माला सोडून नाहीं व नीतिबोध धर्मतत्वांला दूर सारून केला तर तो तितका लंगडा राहतो ही गोष्ट कित्येक अर्वाचीनांस नीट समजत नाहीं. अमानित्व, अदंभित्व, क्षांति, आर्जव, स्थैर्य, अनन्यभक्ति, तप, स्वाध्याय, अहिंसा, अपैशुन, इत्यादि शब्दांच्या व्याख्या महाराजांनीं कशा सर्वोत्कृष्ट केल्या आहेत व त्या सर्व आत्मबोधाच्या रेषेंत कशा येतात हें वरील उताऱ्यांवरून नीट ध्यानांत येईल. पुरुषार्थवादाच्या तेजानें महाराजांची वाणी कशी दीप्तिमंत झाली आहे हें १० व २६ ह्या अवतरणांवरून समजेल. संत, योगी, ज्ञानी, भक्त यांचें सुरेख वर्णन ३।७।१६।२७।४५ इत्यादि अवतरणांवरून कळेल.

३ ज्ञानेश्वरींत महाराजांनीं अध्यात्माचे मुख्य सिद्धांत थोडे तरी आड-पडद्यानें सांगितले आहेत, पण अमृतानुभवांत तसा प्रकार नाहीं. ज्ञानेश्वरी ही गीताटीका असल्यामुळें गीतेच्या मर्यादेनें त्यांना तें भाष्य करावें लागलें; पण निवृत्तिनाथांच्या आज्ञेवरून त्यांनीं अमृतानुभव हा अगदीं स्वतंत्र ग्रंथ केला. हा ‘ अमृतानुभव ’ या नांवानें प्रसिद्ध आहे, तथापि स्वतः महाराजांनीं यास शेवटच्या ओवींत ‘ अनभवामृत ’ असें नांव दिलें आहे. याचे मंगळाचरणाचे पहिले पांच श्लोक संस्कृत आहेत, बाकी सर्व ग्रंथ ओवीबद्ध आहे. याचीं प्रकरणें दहा असून ओवीसंख्या ८०६ आहे. अमृतानुभव हा महाराजांचा पूर्णोद्गार आहे. यावर शिवकल्याणांची ओवी-बद्ध टीका प्रसिद्ध आहे. श्रीएकनाथमहाराजांनींही ह्या ग्रंथावर ओवीबद्ध टीका केल्याचें ऐकिवांत आहे पण ती मला पाहण्यासही मिळाली नाहीं. नाथांची टीका उपलब्ध होईल तर फारच बहार होईल. पंढरपूरचे सत्पुरुष प्रल्हादबोवा बडवे यांनीं दर ओवीस एक संस्कृत श्लोक याप्रमाणें

संस्कृत टीका उर्फ भाषांतर केलेलें आहे ! मराठी ग्रंथास संस्कृत पोषाख चढविल्याचें हें उदाहरण पहिलेंच आहे. ह्याशिवाय आणखी कांहीं गद्य-पद्यात्मक टीका झालेल्या आहेत. अमृतानुभवाचें साग्र विवरण करण्याचा माझा अधिकार नाहीं व ह्या ग्रंथांत आतां स्थलावकाशही नाहीं, तथापि या ग्रंथाच्या तोलाचा अध्यात्मग्रंथ संस्कृत वाङ्मयांतही विरळच सांपडेल असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. तत्वज्ञानाच्या अत्युच्च पायरीवरचा हा ग्रंथ आहे. हा सिद्धानुवाद आहे. हें अनुभवाचें अमृत आहे. येथें बोल काय बोलेल ? पूर्णबोधाचे वर्म दाखविणारी ही सिद्धवाणी आहे. ज्ञानेश्वरी-प्रमाणेंच हा ग्रंथ भाषेच्या दृष्टीनें अत्यंत सुबोध असून काव्याच्या मनोहर भाषेनें व उपमादृष्टांतादिकांनीं नटलेला आहे. अत्युच्च तत्वज्ञान काव्याच्या अतिमनोहर भाषेंत व्यक्त करण्याचें ज्ञानेश्वरमहाराजांचें सामर्थ्य केवळ अनन्य-साधारण आहे. तत्वज्ञान आणि काव्य यांचा अपूर्व संयोग त्यांच्याशिवाय-पृथ्वीवरच्या सर्व वाङ्मयांत कोणींही केलेला आढळणार नाहीं ! **पहिल्या** प्रकरणांत प्रकृतिपुरुषांचें ऐक्य, **दुसऱ्यांत** सद्गुरुस्तवन, **तिसऱ्यांत** अविद्या-त्मक चारी वाणींच्या बंधांतून सुटल्यावरही विद्यात्मक वाणीचें जें बंधन उरतें त्याचा निरास होण्याचा उपाय, **चवथ्यांत** ज्ञानाज्ञानधर्मरहित आत्म-भावाचा विकास, **पांचव्यांत** ज्ञानमात्र आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं सच्चिदा-नंदकल्पनेचा होत असलेला लय, **सहाव्यांत** शब्दमंडण व शब्दखंडण, **सातव्यांत** अज्ञानखंडणपूर्वक ‘ जग आघवी वस्तुप्रभा ’ किंवा ‘ जग चिद्वि-लास आहे’ ह्या मुख्य सिध्दांताचें स्पष्टीकरण, **आठव्यांत** ज्ञानखंडण, **नव-व्यांत** अभेदभक्ताचीं कर्में व **दहाव्यांत** ग्रंथमहिमावर्णनपूर्वक उपसंहार इतक्या विषयांचें अमृतानुभवांत विवरण केलेलें आहे. ह्या दहाही प्रकरणां-तून पुष्कळ वेंचे देतां येतील पण विस्तृत विवरणाशिवाय नुस्ते वेंचे कळणें सामान्यत: कठिण जाईल व इतका अवकाशही आपल्यापाशीं नाहीं. शिवाय दुसरें सद्गुरुस्तवनाचें जें प्रकरण त्याचा सारांश मागें प्रसंगानुरोधानें दिलेलं आहे, त्यावरूनही ग्रंथपद्धतीचा अंदाज होण्यासारखा आहे.

ह्यास्तव चारदोन महत्वाचे उतारे देऊन हें प्रकरण संपवूं. पहिल्या प्रकरणांत प्रकृतिपुरुष किंवा शिवशक्ति यांचें ऐकात्म्य दाखवितांना पतिपत्नींच्या अन्योन्यसंबंधाचा निघणारा कोमल ध्वनि सूक्ष्मदृष्टीच्या रसिक वाचकांला परमाल्हाद दिल्याशिवाय राहणार नाहीं. त्यांत सर्वोत्कृष्ट काव्य आहे. प्रकृतिपुरुषांचें ऐक्य पहाः—

**ऐसीं इये निरुपाधिकें । जगाचीं जिथें जनकें ।**
**तिये वंदिलीं मियां मूळिकें । देवोदेवी ॥ १ ॥**
**कैसी स्वसुखाची आळुकी । जे दोनीपण मिळोनि एकी ।**
**नेदितीच कवतुकीं । एकपण फुटों ॥ ५ ॥**
**हा ठावोवरी वियोगभेडें । जें बाळ जगायेवढें ।**
**वियाली परी न मोडे । दोघुलेपण ॥ ६ ॥**
**जया एके सत्तेचें बैसणें । दोघां एका प्रकाशाचें लेणें ।**
**जे अनादि एकपणें । नांदती दोघे ॥ ८ ॥**
**जिहीं एकएकावीण । न कीजे तृणाचेंही निर्माण ।**
**जिये दोघे जीवप्राण । जिया दोघा ॥ १२ ॥**
**स्त्रीपुरुषनामभेदें । शिवपण एकलें नांदे ।**
**जग सगळें अधाधे ।-पणें जिहीं ॥ १७ ॥**
**दो दांडीं एक श्रुती । दोहीं फुलीं एक द्रुती ।**
**दोहीं दिवीं दीप्ती । एकीचि जेवीं ॥ १८ ॥**
**दो ओठीं एक गोठी । दों डोळां एक दिठी ।**
**तेवीं दोघीं जिहीं सृष्टी । एकीचि जे ॥ १९ ॥**

आत्मस्वरूपीं अविद्याकृत बंधाचीच कल्पना नाहीं व म्हणून तेथें बंधसाक्षेप जो विद्याकृत मोक्ष त्याचीही कल्पना नाहीं हें सांगतांना महाराज विचारतात कीं, ''बागुलाचेनि मरणें । तोषावें कीं बालपणें । येरा तो नाहीं, मा कोणें । मृत्यु मानावा ? ॥३—१३॥ सच्चिदानंद हीं तीन पदें आत्म्याचा द्रष्टृत्वभाव प्रकट करून नाहींशीं होतात आणि म्हणून तीं वस्तुवाचक नाहींत असें प्रतिपादन करतांना ते म्हणतातः—

**फळ विउनी फूल सुके । फळ नाशे रसपरिपाकें ।**
**तोही रस उपखे । तृप्तिदानीं ॥ ५-२२ ॥**

**कां आहुती अग्निआंत । घालूनि वोसरे हात ।**
**सुख घेवऊनि गीत । उगा राहे ॥ ५-२३ ॥**

**तैसें सच्चिदानंदा चोखटा । दाऊनि द्रष्टयाद्रष्टा ।**
**तिन्हीं पदें लागती वाटा । मौनाचिया ॥ ५-२४ ॥**

सहाव्या प्रकरणांत शब्दाचें प्रथम मंडण करून मग उत्कृष्ट खंडण केलें आहे. आधीं **मंडण** पहाः—

**बाप उपेगी वस्तु शब्दु । स्मरणदानीं प्रसिध्दु ।**
**अमूर्ताचा विशदु । आरिसा नव्हे? ॥ १ ॥**

**विधिनिषेधाचिया वाटा । दाविता हाचि दिवटा ।**
**बंधमोक्षकळिकटा । शिष्ट हाची ॥ ५ ॥**

**जीव देहें बांधिला । तो बोलें एकें सुटला ।**
**आत्मा बोलें भेटला । आपणपया ॥ ८ ॥**

शब्द ( वेद ) ही केवढी उपयोगी वस्तु आहे ! हा स्मरण देण्याविषयीं प्रसिद्ध आहे. ‘ तत्वमासि, ’ ‘ अहं ब्रम्हास्मि, ’ ‘ प्रज्ञानं ब्रम्ह, ’ ‘ अयमात्मा ’ हीं चार वेदांचीं चार महावाक्यें स्मारक आहेत. जीवात्मा अमूर्त असून आपल्या निजरूपाला विसरला आहे, त्याला स्वस्वरूपाची आठवण करून स्वरूपस्मृतीवर आणणारा हा शब्द आरसा नाहीं काय ? हा विधिनिषेधाच्या वाटा दाखविणारा मशालजीच आहे ! बंधमोक्षांच्या कल्पनांचा कलह मिटवणारा शिष्ट हाच आहे. देहबुद्धीनें बांधलेला जीव सद्गुरु ‘ तत्वमासि ’ ह्या एका शब्दानें सोडवितात व त्यायोगानें त्याची आत्म्याशीं भेट होते. शब्दाचे एवढे थोर उपकार आहेत, पण त्या शब्दाचाही आत्मस्वरूपाशीं संबंध नाहीं. आतां शब्दाचें **खंडण** पहाः— आत्मा स्वसंवेद्य आहे, तेथें शब्द कोणाचें स्मरण करून देणार ? आत्मा आपणच आपल्याला कसा विसरेल व कसा आठवेल ? ज्ञानमात्र आत्म-

वस्तु आठवविसररहित आहे. जागृतींत निद्रा नाहीं मग जागेपणा कोठचा ? "स्मरणास्मरण दोन्हीही । स्वरूपीं तैशी!" सूर्याच्या ठिकाणीं रात्र व दिवस ह्या दोन्ही कल्पना नाहींत तसें आत्मवस्तूच्या ठिकाणीं विस्मरण व स्मरण ह्या परस्परसाक्षेप दोन्ही कल्पना नाहींत ! विस्मरण म्हणजे अविद्या ही कांहीं अशी चीज आहे काय कीं जिचा निरास झाला पाहिजे ! अविद्या ( या न विद्यते सा ) ही, मी अस्तित्वांत नाहीं असें आपल्या नांवानेंच सुचवित आहे. अविद्या जर नाहींच तर तिचा निरास झाला पाहिजे व त्यासाठीं शब्दानें स्मरण दिलें पाहिजे असें काय उरलें ? शब्दानें काय नासावें ?

**ऐसी अविद्या नासावी । हे वाहेल जो जीवीं ।**
**त्यानें साली काढावी । आकाशाची ! ॥ ६-४७ ॥**
**तेणें शेळी गळा दोहावी । गुडगाडोळां वास पहावी ।**
**वाळवूनि काचरी करावी । सांजवेळेची ॥ ४८ ॥**
**जांभई वाटूनि रसू । तेणें काढावा बहुवसु ।**
**कालवूनी आळसू । मोदळा पाजावा ॥ ४९ ॥**
**तो बागुलातें मारू । प्रतिबिंब खोळे भरू ।**
**तळहाताचे विंचरू । केश सुखें ॥ ५१ ॥**
**घटाचें नाहींपण फोडू । गगनाचीं फुलें तोडू ।**
**सशियाचें मोडू । शिंग सुखें ॥ ५२ ॥**
**तो कापुराची मशी करूं । रत्नदीपीं काजळ धरूं ।**
**वांझेचें लेंकरूं । परणू सुखें ॥ ५३ ॥**
**अहो ! हे किती बोलावें । अविद्या रचिली अभावें ।**
**आतां काय नासावें । शब्दें येणें ! ! ॥ ५५ ॥**

मार्मिक दृष्टांतांची केवढी गर्दी ही ! आत्मा स्वयंसिद्ध व स्वयंवेद्य आहे, आणि अविद्या मुळींच नाहीं म्हणून शब्दाचें प्रयोजनच नाहीं. माध्यान्हीं लावलेला दिवा जसा अंधारही नाहींसा करीत नाहीं व दिवसही दाखवीत नाहीं, त्याप्रमाणें अविद्या नाहीं व आत्मा नित्यज्ञानरूप आहे ह्यामुळें शब्द निरुपयोगी आहे ! तात्पर्यः—

**आतां अविद्या नाहींपणें । नाहीं तये नासणें ।**
**आत्मा सिद्धाचि मा कोणें । काय साधावें ? ॥ ६–९७ ॥**
**एवं शब्दैकजीवनें । बापुडीं ज्ञानें अज्ञानें ।**
**साचपणें वनें । चित्रींचीं जैशीं ! ! ॥ ६–१०२ ॥**

सातव्या प्रकरणांत अज्ञानखंडणप्रसंगीं महाराजांनीं असे अपूर्व कोटिक्रम केले आहेत कीं, ते पाहून न्यायशास्त्र्यांनींही तोंडांत बोटें घालावींत ! अमृतानुभवांत युक्ति, तर्क, कोटिक्रम इत्यादिकांचें असें बहारीचें छत उभारलें आहे कीं, न्यायशास्त्र महाराजांच्या कुशाग्रबुद्धीला भुलून त्यांच्या सेवेंत सर्वदा हजर होतें असें वाटतें. दोन उदाहरणें घेऊं:—

**अहो आपणयाही पुरता । नेणू न करवे जाणता ।**
**तयातें अज्ञान म्हणतां । लाजिजे कीं ? ॥ १५ ॥**

अज्ञान ( माया किंवा अविद्या ) जर आपल्या योगानें ज्ञानरूप आत्म्याला पूर्ण झांकीत नाहीं तर अज्ञान आहे असें म्हणण्यांत तरी काय अर्थ आहे ? जेथें असावें-तेथें स्वाश्रयाला झांकावें हा अज्ञानाचा स्वभाव प्रसिद्ध आहे, पण तें जर आत्म्याला झांकीत नाहीं तर तें नाहीं हेंच सिद्ध आहे.

**नातरी अज्ञान एक घडे । हें जयास्तव निवडे ।**
**तें अज्ञान नव्हे फुडें । कोण्हेकाळीं ॥ १८ ॥**

'हें अज्ञान आहे' असें ज्या ज्ञानाच्या योगें प्रकाशलें गेलें त्याला 'अज्ञान' असें म्हणतां येणार नाहीं ! अमृतानुभवांतला मुख्य सिद्धांत जो 'सर्व जग हा चिद्विलास आहे' त्याचें उत्कृष्ट विवरण ७ व्या प्रकरणांत ओवी १२३ ते २६७ पर्यंत केलें आहे. जग हें अज्ञानकार्य आहे म्ह० अविद्याकृत आहे ह्या पूर्वपक्षाचें खंडण करीत करीत महाराज्ञांनीं 'जग आघवी वस्तुप्रभा' हा सिद्धांत प्रस्थापित केला आहे. ब्रह्मानें 'उघडिलीं कवाडें । प्रकाशाचीं' म्ह० नामरूपात्मक जगद्रूपानें ती ब्रह्मवस्तु विकासित

झाली. द्रष्टा ( आत्मा ) व दृश्य ( जगत् ) यांचें पूर्ण ऐक्य आहे, दृश्य ( विश्व ) अध्यारोपित आहे असें मानण्याचें कारण नाहीं.

यालागीं एकें चिद्रूपें । आपणपया आपणपें ।
देखिजे का आरोपें । काय काज ? ॥ १६५ ॥
किळेचें पांघरूण । आपुलवी रत्ना कोण ? ।
कीं सोनें ले सोनेपण । जोडजोडूं ? १६६ ॥
आतां दृश्यपणें दिसो । कां द्रष्टा होऊनि असो ।
परी हा वांचूनि अतिसो । नाहीं येथें ॥ २४० ॥
गंगा गंगापणें वाहो । कीं सिंधु होऊनि राहो ।
परी पाणीपण नवलावो । न देखों कीं ॥ २४१ ॥
थिजावें कीं विघरावें । हें अप्रयोजक आघवें ।
घृतपण नव्हे । अनारिसें ॥ २४२ ॥
तैसें दृश्य का द्रष्टा । या दोनी दशा वांझटा ।
पाहतां एकीकाष्टा । स्फूर्तिमात्र तो ॥ २४४ ॥
भलतैसा फांके । परी येकपणा न मुके ।
नाना संकोच तरी आसिके । हाचि आंधी ॥ २५७ ॥
म्हणोनि इये आत्मलीळे । नाहीं आन कांटाळें ।
आतां ययाचिये तुळे । हाचि ऐसा ॥ २६६ ॥

सर्वांचें तात्पर्य ' जग असिकी वस्तुप्रभा ' हेंच होय. आपल्या सिद्धांताला महाराज पुढीलप्रमाणें श्रुतिप्रमाण देतात:—

' विभाति यस्य भासा : सर्वमिदं ' हा ऐसा ।
श्रुति काय वायसा । ढेकर देती ? ॥ २९० ॥

आठव्या ज्ञानखंडणाच्या प्रकरणांत " अज्ञान जेथें नाहीं तेथें अज्ञानसापेक्ष ज्ञान तरी कोठून असणार ? दोन्हीं परस्परसापेक्ष वृत्तिच आहेत " असें म्हटलें आहे:—

अज्ञानाचा प्रवतु । नाहीं जया गांवाआंतु ।
तेथें ज्ञानाची तऱ्हीं मातु । कोण जाणे ! ॥ १० ॥

ज्ञानाज्ञानसंबंधरहित जें स्वस्वरूप तें सद्गुरूंनीं आमचें आम्हांला दिलें आहे. तें वाचेच्या हातीं कसें देऊं !

**तैसें आमुचेनि नांवें । अज्ञानाचें नांवही नव्हे ।**
**आम्हांलागीं गुरुदेवें । आम्हीच केलों ॥ ८-१ ॥**
**किंबहुना श्रीनिवृत्ती । ठेविलों असों जिये स्थिती ।**
**तें काय देऊं हातीं । वाचेचिया ? ॥ ८-८ ॥**

नवव्या जीवन्मुक्तदशा प्रकरणांत जीवन्मुक्त आत्मरूप झाल्यामुळें चंद्रावर चांदणें पडावें किंवा सागरावर वृष्टि व्हावी त्याप्रमाणें त्याचीं इंद्रियें व विषयही आत्मरूप होतात असें प्रतिपादिलें आहे. त्याचें विषय-सेवनही मोक्षावर ताण करितें व देवभक्त एक होतात. त्याची उपासना वस्तुतंत्र असतेः—

**जाला देवोचि भक्तु । ठावोचि जाला पंथू ।**
**होऊनि ठेला एकांतु । विश्वचि हें ॥ ९-३४ ॥**
**अवघियाचि उपचारा । जपध्याननिर्धारा ।**
**नाहीं आन संसारा । देवेवांचूनि ॥ ३९ ॥**
**कर्माचा हातु नलगे । ज्ञानाचें कांहीं न रिगे ।**
**ऐसीच होतसे आंगें । उपास्ती हे ॥ ९८ ॥**

दहाव्या प्रकरणांत सद्गुरुकृपेनें प्रतीतीस आलेलें हें अमृत जगास मजकरवीं देवनिवृत्तींनीं त्यांचेंच औदार्य आहे असें सांगून हा सिद्धानु-वाद म्ह० मौनाचेंच मौन आहे असें म्हटलें आहे. "माझें स्वात्मसुख मींच भोगावें असतें पण देवानें सूर्याला प्रकाश दिला तो जग प्रकाशित करण्या-साठीं दिला आहे, चंद्रामृत जगासाठीं दिलें आहे, दिव्याचा प्रकाश साऱ्या घरासाठीं आहे, त्याप्रमाणें हें स्वात्मसुख सर्वांना वांटून देण्याची त्यांचीच आज्ञा आहे, हें त्यांचें औदार्य आहे." अशा प्रकारें अमृतानुभवांत स्वतंत्र, स्वसंवेद्य आत्मबोधाचें निरूपण केलें आहे.

४ ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव ह्याशिवाय महाराजांचे दुसरे जे लहान ग्रंथ प्रसिद्ध आहेत त्यांत हरिपाठाचे अभंग व चांगदेवपासष्ठी हे

मुख्य आहेत. पैकीं चांगदेवपासष्टीचें निरूपण मागें "चांगदेव आणि ज्ञानदेव' ह्या प्रकरणांत (पृष्ठ ११८-१२२) झालें आहेच. हरिपाठाचा इतर अभंगांबरोबरच आतां विचार करूं. ज्ञानेश्वरीअमृतानुभवांत मुख्यतः अध्यात्मविचार सांगितला आहे व जागोजाग 'सगुण-निर्गुण एक हरी' असें प्रतिपादन केलें आहे. प्राकृत जीवांना निर्गुणोपासनेचा अधिकार नसल्यामुळें व सगुणोपासनेंत सर्व सामर्थ्य असून ती सुलभतर असल्यामुळें तिचाच महाराजांनीं अभंगांत पुरस्कार केला आहे. हरिपाठादि अभंगांत सगुणप्रेमाचीच लूट सांपडते. त्यांच्या अभंगांत 'देव, भक्त आणि नाम हा त्रिवेणीसंगम झाला आहे. हरिपाठाचे अभंग अवघे २७ आहेत, पण ते सर्वोत्कृष्ट आहेत. त्यांत नाममहात्म्य फार प्रेमानें वर्णिलें असून "हरि मुखें म्हणा। हरि मुखें ॥" हा उपदेश सर्व जीवांना महाराजांनीं केला आहे. योगयागविधी, तीर्थाटण इत्यादि साधनांहून 'नामस्मरण' हें साधन श्रेष्ठ व सुलभ असून नामस्मरणानें मी उद्धार पावलों असें महाराजांनीं सांगितलें आहे. हरिपाठ बहुतेकांच्या व मुख्यतः वारकऱ्यांच्या नित्यपाठांतला आहे. हरिपाठाचे अभंग म्हणजे वारकऱ्यांची संध्या आहे. नामस्मरणाकडे जड जीवांना प्रवृत्त करण्यासाठीं हरिपाठांत महाराजांनीं काय सांगितलें आहे ते थोडक्यांत पाहूं. 'देवाचीये द्वारीं उभा क्षणभरी' हा पहिला अभंग आहे.

**चहूं वेदीं जाण साहिशास्त्रीं कारण।**
**अठराही पुराणें हरिसी गाती ॥ २-१ ॥**

× × ×

**सायास करिसी प्रपंच दिनानिशीं।**
**हरीसी न भजसी कोण्या गुणें ? ॥ ४-३ ॥**

× × ×

**नाहीं ज्यासी भक्ति तो पतित अभक्त।**
**हरिसी न भजत दैवहत ॥ ७-२ ॥**

अनंत वाचाळ बरळती बरळ ।
त्या कैसेनि गोपाळ पावे हरी ॥ ७-३ ॥

× × ×

संतांचे संगतीं मनोमार्गगती ।
आकळावा श्रीपती येणें पंथें ॥ ८-१ ॥

× × ×

हरिउच्चारणीं अनंत पापराशी ।
जातील लयासी क्षणमात्रें ११-१ ॥

× × ×

तीर्थव्रतनेम भावेवीण सिद्धी ।
वायांचि उपाधी करिसी जना ॥ १२-१ ॥
भावबळें आकळे येऱ्हवीं नाकळे ।
करतळीं आंवळे तैसा हरी ॥ १२-२ ॥

× × ×

रामकृष्ण उच्चार अनंतराशी तप ।
पापाचे कळप पळती पुढें ॥ १४-२ ॥
'हरि हरि हरि' मंत्र हा शिवाचा ।
म्हणती जे वाचा तयां मोक्ष ॥ १४-३ ॥

× × ×

वेदशास्त्रप्रमाण श्रुतीचें वचन ।
एक नारायण सार जपा ॥ १९-१ ॥
जप तप कर्म हरीविण धर्म ।
वाउगाचि श्रम व्यर्थ जाय ॥ १९-२ ॥

× × ×

काळवेळ नाम उच्चारितां नाहीं ।
दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती ॥ २१-१ ॥
रामकृष्ण नाम सर्व दोषां हरण ।
जडजीवां तारण हरि एक ॥ २१-२ ॥

न सोडी रे भावो टाकीं रे संदेहो ।
रामकृष्णीं टाहो नित्य फोडी ॥ २४–२ ॥

× × ×

एकतत्वनाम दृढ धरी मना ।
हरीसी करुणा येईल तुझी ॥ २६–१ ॥
तें नाम सोपारें रामकृष्णगोविंद ।
वाचेशीं सद्गद् जपे आधीं ॥ २६–२ ॥
नामापरतें तत्व नाहीं रे अन्यथा ।
वायां आणिका पंथा जाशी झणी ॥ २६–३ ॥

× × ×

लटिका व्यवहार सर्व हा संसार ।
वायां येरझार हरीवीण ॥ २७–२ ॥
नाम मंत्र जप कोटी जाईल पाप ।
कृष्णनामीं संकल्प धरूनि राहे ॥ २७–३ ॥
ज्ञानदेवा प्रमाण निवृत्तिदेवीं ज्ञान ।
समाधिसंजीवन हरिपाठ ॥ २७–६ ॥

असो. हरिपाठांत ह्याप्रमाणें ' रामकृष्णहरी ' हें किंवा देवाचें कोणतेंही नांव काळवेळ न पाहतां सर्व काळीं उच्चारणें हें सर्वोत्कृष्ट साधन आहे असें महात्म्यांनीं सांगितलें असून नाम भजनानें आपल्या भक्तांना वैकुंठमार्ग मिळतो व [illegible] असें सांगितलें आहे. नामतुकारादि अनेक संतांना नामसंकीर्तन हेंच हरिप्राप्तीचें मुख्य साधन सर्वांना सर्वकाळीं सुसाध्य व श्रेयस्कर आहे म्हणून सांगितलें आहे. गेल्या हजार वर्षांत भरतखंडांत जे जे संतमहात्मे झाले त्या सर्वांनीं 'रामकृष्णहरी' हाच उघड मंत्र सर्वांना दिला आहे. हरिपाठाचे २७ अभंग ही मराठी भाषेंतली नामप्रतिपादक लहानशी श्रुतिच आहे असें म्हटलें तरी चालेल. ह्याप्रमाणें नामस्मरणाचा राजरस्ता लोकांस दाखवून महाराजांनीं श्रीविठ्ठल म्हणजे श्रीकृष्ण यांची उपासना लोकांस लाविली. ज्ञानेश्वरीअमृतानुभवांत सहज

प्रकट केलेलें ब्रह्मज्ञान ज्याना प्राप्त झालें किंवा जे अंगें ब्रह्मरूपच होते त्या ज्ञानेश्वरमहाराजांनीं ' मज जीवींची आवडी । पंढरपुरा नेइन गुढी ' असें म्हणत खांद्यावर पताका, हातीं दिंडी किंवा टाळ घेऊन ' जय जय रामकृष्ण हरी ' ह्या नाममंत्राचा जयघोष करीत प्रेमळ वारकरीभक्तांच्या मेळ्यांबरोबर गात, नाचत पंढरीस जावें व तेथें कीर्तनसुखानें हजारों लोकांस तोषवून भक्तिमार्गास लावावें हें पाहून त्यांच्या भूतदयेची धन्यता वाटते. "तुज सगुण म्हणों कीं निर्गुणरे सगुण निर्गुण एक गोविंदु रे " ह्या अभंगांत त्यांनीं सगुणनिर्गुण, स्थूलसूक्ष्म, दृश्यादृश्य, व्यक्ताव्यक्त, आकारनिराकार, हा अवघा गोविंद आहे असें म्हटलें आहे. ज्ञानी आणि अज्ञानी सर्वांना घेऊन चालणारे महात्मे एकांगी नसतात. सगुणोपासना लहानथोरांना अत्यवश्य आहे व ती मोक्षापर्यंत पोंचविणारी आहे हें मनांत आणून त्यांनीं ' सगुण निर्गुण समान ' म्हणून " एक सगुणींच काय न लभे रया ? " म्ह० सगुणोपासनेनें काय एक प्राप्त होत नाहीं असा निर्गुणवाद्यांना प्रश्न केला आहे.

५. महाराजांच्या स्फुट अभंगांत कांहीं निर्गुणपर आहेत व कांहीं सगुणपर आहेत; कांहींत योगाच्या खुणा आहेत व कांहीं थोडे अभंग कूटात्मक आहेत. तथापि बहुतेक अभंग श्रीकृष्णप्रेमानें ओथंबलेले असून सगुणप्रेमा वाढविणारे आहेत. "रूप पाहतां लोचनीं । सुख झालें वो साजणी । तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा ॥ " ह्या महाराजांच्या गोड अभंगानें वारकऱ्यांचीं कीर्तनें सुरू होतात. ज्ञानेश्वरमहाराजांचा ' रूप पाहतां लोचनीं ' हा अभंग आरंभाला व तुकोबांचा ' हेंचि दान देगा देवा ' हा अभंग समाप्तीला घेतल्याशिवाय निरूपणी कीर्तनेंच होत नाहींत. महाराजांची मुख्य शिकवण व त्यांचा श्रीकृष्णप्रेमा त्यांच्या स्फुट अभंगांतूनही आपण पाहूं व हें प्रकरण संपवूं.

**हें नव्हे आजिकालीचें । युगां अठ्ठाविसांचें ।**
**मज निर्धारितां साचें । हा मृत्युलोकचि नव्हे ॥ १ ॥**

हाचि मानीरे निर्धारू । येर सांडीरे विचारू ।
तरी तूं पाहसी परात्परू । तरि तूं जारे पंढरिये ॥ २ ॥

× × ×

मेघश्याम घेऊनीयां बुंधी । जयातें श्रती पै वानिती ।
कीं तें पुराणांसी वाडें । तें पंढरिये उभे गे माय ॥ १ ॥

× × ×

कटावरि ठेवूनि हात । जना दावी संकेत ।
भवजलाब्धीचा अंत । इतुलाची ॥ १ ॥
समचरणीच्या खुणा । उभा पंढरीचा राणा ।
तो आवडे जनामना । दुर्लभ गे माय ॥ २ ॥

× × ×

उंच पताका झळकती । टाळ मृदंग वाजती ।
आनंदें प्रेमें गर्जती । भद्रजाती विठ्ठलाचे ॥ १ ॥
सतत कृष्णमूर्ती सांवळी । खेळे हृदयकमळीं ।
शांति क्षमा तयांजवळी । जीवेंभावें अनुसरती ॥ २ ॥
ऐसे एकांगवीर । विठ्ठलरायाचें डिंगर ।
बाप रखुमादेवीवर । तेहीं निर्धारीं जोडिला ॥ ३ ॥

× × ×

निरंतर ध्यातां हरी । सर्व कर्माची बोहरी ।
दोष जाती दिगंतरीं । रामकृष्णउच्चारणीं ॥ १ ॥

× × ×

गोपाळारे तुझें ध्यान लागो मना ।
आनु न विसंबे हरि जगत्रयजीवना ॥ १ ॥
सोनियाचा दिवस आजि अमृतें पाहला ।
नाम आठवितां रूपीं प्रकट पै झाला ॥ २ ॥
तनु मन शरण विनटलों तुझ्या पायीं ।
बाप रखुमादेवीवरावांचूनि आनु नेणे कांहीं ॥ ३ ॥

हरि आला रे हरि आला रे। संतसंगें ब्रह्मानंदु झाला रे ॥ध्रु०॥
हरि येथें रे हरि तेथें रे। हरिवांचुनि न दिसे रितें रे॥ २॥
हरि पाही रे हरि ध्याई रे। हरिवांचुनि दुजें नाहीं रे॥ ३॥
हरि वाचे रे हरि नाचे रे। हरि पाहतां आनंदु सांचे रे॥ ४॥
हरि आदी रे हरि अंतीं रे। हरि व्यापक सर्वांभूतीं रे।
हरि जाणा रे हरि वाना रे। बाप रखुमादेवीवर राणा रे॥ ५॥

(१) आवडे ते करिसी देवा। कवण करी तुझा हेवा रे; (२) ॐ नमो भगवते वासुदेवाय; (३) नुद्धरिजे नुद्धरिजे नुद्धरिजे। गोपाळेंविण नुद्धरिजे ॥ धृ० ॥ (४) कान्होबा तुझी घोंगडी चांगली। आम्हांसि कां दिली वांगली रे ॥ धृ० ॥ इत्यादि अनेक अभंग उत्कृष्ट आहेत. ते गाथ्यांतूनच वाचकांनीं पहावेत.

# १२ स्तुतिसुमनांजलि.

## अभंग.

( १ ) नामदेवराय:—

तिन्ही देव जैसे परब्रह्मींचे ठसे । जगीं सूर्य जैसे प्रगटले ॥ १ ॥
धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान । धन्य तो निधान ज्ञानदेव ॥२॥
उपजतां ज्ञानी हें वर्म जाणोनी । आले लोटांगणीं चांगदेव ॥ ३ ॥
प्रत्यक्ष पैठणीं भट्टीं केला वाद । रेड्यामुखीं वेद बोलविले ॥ ४ ॥
सोहंसुकृताच्या सोडोनीयां गांठी । केलीसे मराठी गीतादेवी ॥५॥
नामा म्हणे सर्व सुकृत लाहिजे । एक वेळ जाइजे अलंकापुरा॥६॥

( २ ) जनाबाई:—

२

सदाशिवाचा अवतार । स्वामी निवृत्ती दातार ॥ १ ॥
महाविष्णूचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ २ ॥
ब्रह्मा सोपान तो झाला । भक्ता आनंद वर्षला ॥ ३ ॥
आदिशक्ति मुक्ताबाई । दासी जनी लागे पायीं ॥ ४ ॥

३

गीतेवरी आन टीका । जैसें ओगरीलें ओका ॥ १ ॥
रत्नताटामाजी । जैसी वोपियेली कांजी ॥ २ ॥
माझ्या ज्ञानियावांचूनी । टीका नोहे म्हणे जनी ॥ ३ ॥

४

विवेकसागर । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥
मरोनियां जावें । बा माझ्याच्या पोटा यावें ॥ २ ॥

ऐसें करिं गा! माझ्या भावा। सख्या माझ्या ज्ञानदेवा ॥३॥
जाइन ओंवाळुनी। म्हणे जन्मोजन्मीं जनी ॥ ४ ॥

५

ज्ञानाबाई आई आर्त माझें पायीं। धांवुनीयां येई झडकरी ॥ १ ॥
बहु कासावीस होतो माझा जीव। कळवळ्याची कींव येवों द्यावी २
नामयाची जनी म्हणावी आपुली। तुम्ही आपंगिली मायबापा॥३॥

( ३ ) सेना न्हावी:—

६

श्रीज्ञानराजें केला उपकार। मार्ग हा निर्धार दाखवीला ॥ १ ॥
विटेवरी उभा वैकुंठनायक। आणि पुंडलीक चंद्रभागा ॥ २ ॥
अविनाश पंढरी भूमीवरी पेठ। प्रत्यक्ष वैकुंठ दाखवीलें ॥ ३ ॥
सेना म्हणे चला जाऊं तया ठाया। प्रत्यक्ष सखया भेटावया ॥ ४ ॥

७

अलंकापुरवासिनी। ज्ञानाबाई मायबहिणी ॥ १ ॥
लेंकुराची चिंता। वागवावी कृपावंता ॥ २ ॥
मी तों आहें यातीहीन। माझा राखा अभिमान ॥ ३ ॥
करूनी विनवणी। सेना लागतो चरणीं ॥ ४ ॥

८

विष्णूचा अवतार। सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥
चला जाऊं अलंकापुरा। संतजनांच्या माहेरा ॥ २ ॥
स्नान करितां इंद्रायणी। मुक्ती लागती चरणीं ॥ ३ ॥
ज्ञानेश्वराच्या चरणीं। सेना आला लोटांगणीं ॥ ४ ॥

९

धन्य अलंकापूर धन्य सिद्धेश्वर। धन्य ते तरुवर पशुपक्षी ॥ १ ॥
धन्य इंद्रायणी धन्य भागीरथी। तेथें स्नान जे करिती धन्य जन्म।
धन्य तो प्रयाग धन्य ते त्रिवेणी। वहाती येउनी गुप्तरूपें ॥ ३ ॥
धन्य ते भूमी धन्य ते प्राणी। जे देखती नयनीं ज्ञानदेवा ॥ ४ ॥

धन्य ते भाग्याचे जाती अळंकापुरा । तयाचा निर्धारा धन्य वंश ५
धन्य ज्ञानानुदास अळंकापुरींचा । सेना न्हावी त्याचा रजःकण ६

१०

येउनी नरदेहासी वाचे उच्चारी ज्ञानेश्वर ।
तयाचा संसार सुफळ झालागे माय ॥ १ ॥

प्रत्यक्ष परब्रह्म येउनि अवतारासी । तारिलें जगासी नाममात्रें ॥२॥
जयाचे आंगणीं पिंपळ सोनियाचा । सिद्धसाधकांचा मेळा तेथें ३
तयाचे स्मरणें जळती पातकें । सांगे पंढरीनाथ सेना म्हणे ॥ ४ ॥

( ४ ) नरहरि सोनारः—

११

सवंगडे निवृत्ति सोपान मुक्ताई । ज्ञानदेवापायीं भाव माझा ॥ १ ॥
धन्य ते वैष्णव मिळाले सफळ । जीवभाव वोवाळी तया चरणीं
अखंड ध्यानीं ध्यातो हृदयीं साचार । नरहरी सोनार कायामनें ३

( ५ ) एकनाथमहाराजः—

१२

विश्रांतीचें स्थान संतांचें माहेर । तें या भूमीवर अलंकापूर ॥ १ ॥
तये स्थळीं माझा जीवींचा वो ठेवा । नमीन ज्ञानदेवा जाऊनीयां२
सिद्धेश्वरस्थान दरुशनें मुक्ती । ब्रह्मज्ञानप्राप्ती वटेश्वर ॥ ३ ॥
चौऱ्यांशीं सिद्धांचा सिद्धभेटीमेळा । प्रत्यक्ष स्थापिला कल्पवृक्ष ४
अमृतमय पुढें वाहे इंद्रायणी । भागीरथी आदिकरुनि तीर्थराज ५
ऐसिया स्थळीं समाधि ज्ञानदेव । एकाजनार्दनीं ठाव अलंकापूर६

१३

सर्व सुखाची लहरी । ज्ञानाबाई अलंकापुरीं ॥ १ ॥
शिवपीठ हें जुनाट । ज्ञानाबाई तेथें मुकुट ॥ २ ॥
वेदशास्त्र देती ग्वाही । म्हणती ज्ञानाबाई आई ॥ ३ ॥
ज्ञानाबाईचे चरणीं । शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

१४

कैवल्याचा पुतळा प्रगटला भूतळा ।
चैतन्याचा जिव्हाळा ज्ञानी माझा ॥ १ ॥
ज्ञानियांचा शिरोमणी वंद्य जो कां पूज्यस्थानीं ।
सकळांसी शिरोमणी ज्ञानोबा माझा ॥ २ ॥
चालविली जड भिंती हरली चांगयाची भ्रांती ।
मोक्षमार्गीचा सांगाती ज्ञानोबा माझा ॥ ३ ॥
रेड्यामुखीं वेद बोलविला गर्व द्विजांचा हरविला ।
शांतिब्रिंब प्रगटला ज्ञानोबा माझा ॥ ४ ॥
गुरुसेवेलागीं जाण शरण एकाजनार्दन ।
चैतन्याचें जीवन ज्ञानोबा माझा ॥ ५ ॥

१५

कृपाळू उदार माझा ज्ञानेश्वर । तया नमस्कार वारंवार ॥ १ ॥
न पाहे यातीकुळाचा विचार । भक्तकरुणाकर ज्ञानाबाई ॥ २ ॥
भलतिया भावें शरण जातां भेटी । पाडितसे तुटी जन्मव्याधीं ॥३॥
ज्ञानाबाई माझी अनाथाची माय । एकाजनार्दनीं पाय वंदितसे॥४॥

१६

माझी ऐकावी विनंती । ज्ञानदेवा श्रेष्ठमूर्ति ॥ १ ॥
तुम्ही बसोनी अंतरीं । मज जागवा निर्धारी ॥ २ ॥
तुम्ही सत्ताधारा । प्रपंच करावा बाहेरी ॥ ३ ॥
श्रेष्ठा ज्ञानदेवा । एकाजनार्दनीं आठवा ॥ ४ ॥

१७

जोडोनीयां दोनी हात । जगा जाणवीतों मात ॥ १ ॥
एकदां जारे अलंकापुरा । जन्मवेरझारा चुकवा ॥ २ ॥
आवडी सांगा जीवींचें आर्त । माउली पुरवीत जाणोनी ॥ ३ ॥
ज्ञानराज माझी माउली । एका जनार्दनीं साउली ॥ ४ ॥

( ६ ) श्रीतुकाराममहाराजः—

१८

ज्ञानियांचा गुरु राजा महाराव । म्हणती ज्ञानदेव ऐसें तुम्हां ॥१॥
मज पामरा हें काय थोरपण । पायींची वहाण पायीं बरी ॥ २ ॥
ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळंगणें । इतर तुळणें काय पुरें ॥ ३ ॥
तुका म्हणे नेणे युक्तीची ते खोली । म्हणोनी ठेविली पायीं डोई ॥

१९

जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले ॥१॥
करील तें काय नव्हे महाराज । परी पाहे बीज शुद्ध अंगीं ॥ २ ॥
जेणें हे घातली मुक्तीची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ॥३॥
तुका म्हणे तेथें सुखा काय उणें । राहे समाधानें चित्ताचीया ॥४॥

२०

बोलिलीं लेंकुरें । वेडीं वांकुडीं उत्तरें ॥ १ ॥
करा क्षमा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध ॥ २ ॥
नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायापें किंकरा ॥ ४ ॥

( ७ ) निळोबारायः—

२१

पंढरपुरीं ज्ञानेश्वरीं । मुक्ति कामारी वोळंगती ॥ १ ॥
तेथें देव येथें भक्त । महिमा अद्भुत दोहींचा ॥ २ ॥
तेथें ध्यान येथें ज्ञान । परलोकसाधन दों ठायीं ॥ ३ ॥
निळा म्हणे तेथें गरुड । येथें झाड अजानतरु ॥ ४ ॥

२२

यात्रे अलंकापुरा येती । तें आवडती विठ्ठला ॥ १ ॥
पांडुरंगें प्रसन्नपणें । केलें देणें हें ज्ञाना ॥ २ ॥
भूवैकुंठ पंढरपूर । त्याहूनि थोर महिमा या ॥ ३ ॥
निळा म्हणे जाणुनि संत । येती धांवत प्रतिवर्षी ॥ ४ ॥

२३

उभा राहिला ध्वज तिहीं लोकांवरी ।
ऐसी चराचरी कीर्ति ज्याची ॥ १ ॥
ते हे निवृत्तिनाथ ज्ञानेश्वर सोपान ।
मुक्ताबाई ज्ञानदीप्तिकळा ॥ २ ॥
धरूनियां सगुणरूपें केली क्रीडा ।
बोलविला रेडा निगम वाचे ॥ ३ ॥
बैसूनीयां वरी चालविली भिंती ।
चांगदेवाप्रती दिली भेटी ॥ ४ ॥
मग वास केला अळंकापुरासी ।
पिंपळ द्वारासी कनकाचा ॥ ५ ॥
निळा म्हणे ज्याच्या नामें करितां घोष ।
नातळती दोष कळिकाळाचे ॥ ६ ॥

२४

बोलविला बोलें वेद । म्हैसा सुबुद्ध स्वरान्वयें ॥ १ ॥
काय एक न करा देवा । भिंती चालवा निचेष्टिता ॥ २ ॥
शिष्यांलागीं देतां बोध । न लगे पदार्थ निमिषही ॥ ३ ॥
निळा म्हणे ज्ञानेश्वरा । मजही अंगिकारा दीना ॥ ४ ॥

२५

नमो ज्ञानेश्वरा नमो ज्ञानेश्वरा ।
निवृत्ति उदारा सोपानदेवा ॥ १ ॥
मुक्ताबाई नमो त्रिभुवनपावनी ।
अद्वैतजननी देवाचीये ॥ २ ॥
जगदुद्धारालागीं धरिला अवतार ।
मिरविला बडिवार सिद्धाईचा ॥ ३ ॥
निळा शरणागत म्हणवा आपुला ।
संतीं निरविला देउनि हातीं ॥ ४ ॥

( ८ ) कान्हूपात्रा:—

२६

धन्य धन्य धन्य धन्य निवृत्तिराया ।
धन्य ज्ञानदेवा सोपान सखया ॥ १ ॥
प्रत्यक्ष पैठणीं भट्टा दाविली प्रचीती ।
रेडियाचे मुखीं वदविला वेदश्रुती ॥ २ ॥
चवदाशें वर्षांचे तप्तीतीररहिवासी ।
गर्व हरविला चालविले भिंतीसी ॥ ३ ॥
धन्य कान्हुपात्रा आज झाली भाग्याची ।
भेटीं झाली ज्ञानदेवाची म्हणूनीयां ॥ ४ ॥

श्लोक.

( ९ ) शिवदिन केसरी:—

२७

निष्ठा भावें व्यापक सकळांतर्यामी
तरती पापी ज्याच्या पावननिजनामीं ।
ध्यातां चित्तीं चिंतनउन्मनसुखसिंधू
तो हा वंदा ज्ञानेश्वरगुरु दिनबंधु ॥ १ ॥
सत्तासाक्षी लीलाकौतुक करि नाना
सोज्वळ साधु विष्णू-अवतारचि माना ।
वदला म्हैसा वेदऋचेचा उद्बोधू
तो हा वंदा ज्ञानेश्वरगुरु दिनबंधु ॥ २ ॥
जागृत केली प्राकृत गीता गूढार्थी
वाची नेमें तो न पडे विघ्न-अनर्थी ।
ओली भिंती चालवि जड-देहसंबंधू
तो हा वंदा ज्ञानेश्वरगुरु दिनबंधू ॥ ३ ॥

( १० ) भोळानाथ:—

२८

गीतामृतें जिवविलें सकळांजनांसी
श्रीज्ञाननाथ अभिधान असे तयासी ।

लावण्य शांतरस अद्भुतरूप कैसें
पाहावया उभयतां नयनांसि पीसें ॥ १ ॥
ज्याचा प्रकाश भुवनत्रयिं व्यापलाहे
ब्रह्मस्वरूप जग सर्वहि भासताहे ।
जो साक्षिभूत सकळैकचराचराचा
श्रीज्ञाननाथ सुखदायक या मनाचा ॥ २ ॥
अज्ञानमोह दृढ पैठणिच्या जनांसीं
होता म्हणूनि करणी विपरीत ऐसी ।
संपूर्ण वेद वदला महिषा मुखाचा
शांतिक्षमा धरुनि गर्व हरी द्विजांचा ॥ ३ ॥
इंद्रायणीसुरनदीतटिचा निवासी
कैवल्यदायक सदा प्रिय सज्जनांसी ।
द्वारीं अजानतरुकल्पलता विराजे
देदीप्यमान सुखरूप समाधि साजे ॥ ४ ॥

( ११ ) निरंजनमाधवः—

३

केली टीका भगवद्गीताशास्त्राची
नेली मायाभ्रांति विनाशा सुजनाची ।
पाहा नेत्रीं उघडा मोक्षाचा दाता
चित्तीं चिंता ज्ञानेश्वरसद्गुरुनाथा ॥ १ ॥
ज्याच्या द्वारीं पिंपळ शोभे सोन्याचा ।
ज्याच्या गांवीं डंका वाजे पुण्याचा ।
जातो प्राणी वैकुंठा ज्यातें गातां ॥ चित्तीं० ॥ २ ॥
इंद्राणी हे जेथें वाहे शुभगंगा
स्नानें पानें कर्ती पातकगिरिभंगा ।
तारी पाहा केवळ जे दीन अनाथा ॥ चित्तीं० ॥ ३ ॥
कामारी हा श्रीसिद्धेश्वर तैं नांदे
जेथें तोषें मोक्ष लुटावा स्वच्छंदें ।
पुण्या जोडी दर्शन घे वाटे जातां ॥ चित्तीं० ॥ ४ ॥

ज्याची टीका वाचुनि ज्ञानी बहु झाले
वैकुंठीं ते श्रीधररूपें स्थिर केलें ।
ऐशी दावी अद्भुत लोकां निजसत्ता ॥ चित्तीं० ॥ ५ ॥

कामक्रोधा मोहतमातें तें थारा
नाहीं नाहीं वाचा गीता सुखसारा ।
बोधानंदीं डोलुनि लागा सुखपंथा ॥ चित्तीं० ॥ ६ ॥

नाथ निवृत्ति ज्ञान कथी ज्याला सोपें
तेणें जेणें हरिलीं लोकांचीं पापें ।
चित्तीं माझ्या प्रेम भरे ज्याला ध्यातां ॥ चित्तीं० ॥ ७ ॥

## पदें.

१

( १२ ) रंगनाथस्वामीः—

ज्ञानदेव ज्ञानदेव म्हणतां ज्ञान देव देतो ।
वासुदेवाचिं होतो अखंड वदनिं वदे तो ॥ ध्रु० ॥
ज्ञानदेव चतुराक्षरि जप हा करितां सर्वज्ञा ।
ज्ञानाज्ञानाविरहित ब्रह्मप्राप्तीची संज्ञा ।
ज्ञाता होय निजांगें होये हे ज्याची प्रज्ञा ।
ज्ञानाग्नीनें पापें जळती हे याची आज्ञा ॥ १ ॥
नररूपें श्रीविष्णु अवतरला श्रीभगवान ।
नद नदि वापी कूप पहातां उदक नव्हे भिन्न ।
नवल हेंचि पशु म्हैसा परि तो करि वेदाध्ययन ।
नमन करुनि सद्भावें जपतां होय विज्ञान ॥ २ ॥
देवादिदेव तो हा भगवद्भक्तांप्रति वर दे ।
देतां वर ब्रह्मांडीं ब्रह्मानंदाचि हा कोंदे ।
देशिकराज दयानिधि अलंकापुरीं जो नांदे ।
देशभाषा ज्ञानदेवी गीता ग्रंथ वदे ॥ ३ ॥

वक्ते श्रोते पडणें श्रवणें पावति समभाव ।
वर्णूं जातां अगणित महिमा होती जिव्हाशीव ।
वंदुनि अनन्यभावें गाऊं गीतीं ज्ञानदेव ।
वर्णीति निजरंगें ते पूर्ण जाणाति स्वानुभव ॥ ४ ॥

( १३ ) मध्वमुनीश्वरकृतः—

२

शुकसनकादिक महिमा ज्याच्या वर्णिति वेदपुराणीं रे ।
गोकुळिं गोंवळ होउनि गाई चारी चक्रपाणी रे ॥
जो हा पांडवघरीं हरि-सारथी पाजी तुरगा पाणी रे ।
तो हा सद्गुरु ज्ञानेश्वरहरि स्मरणें तारी प्राणी रे ॥ १ ॥
ज्यानें केली भगवद्गीतेवरती सुंदर टीका रे ।
सादर परिसति होती त्यांची संसारांतुनि सुटका रे ।
प्राकृत भाषा रुचिकर रचिली करूनि सुधारस फिका रे ।
भक्तिज्ञानविरक्तीच्याही पोषीतो रस निका रे ॥ २ ॥
दगडाची ही भिंति जयानें चालविली जड माती रे ।
पैठणिं दिधली वेदपरीक्षा वेद्या रेड्याहातीं रे ॥
सुवर्णाचा पिंपळ ज्याच्या द्वारीं वैष्णव पाहती रे ।
अजानवृक्षाखालें शांभव आसन घालुनि राहती रे ॥ ३ ॥
मुक्तिपुरीहुनि श्रेष्ठ पुरातन पाहतां क्षेत्र आळंदी रे ।
इंद्रायणिचें जळ जो सेवी इंद्रपदासहि निंदी रे ॥
ज्याचे सन्निध सिद्धेश्वर तो सन्मुख शोभे नंदी रे ।
कार्तिकमासीं पंढरपुरपति समाधि ज्याची वंदी रे ॥ ४ ॥
ज्ञानेश्वर या नामाचा जो जप करि अनुदिन वाचे रे ।
त्याचे हृदयीं परमेश्वर तो लक्ष्मी घेउनि नाचे रे ॥ ५ ॥
ज्याची टीका श्रवणीं पडतां भवभयपर्वत कांचे रे ।
अगणित गुणगण मध्वमुनीश्वर वर्णीतो हे वाचे रे ॥ ६ ॥

## आर्या.

( १४ ) मोरोपंतः—

श्रीविष्णुसा न तारीं जन काय ज्ञानदेव वेगानें ? ।
हा दे तें स्वर्गाच्या जनका यज्ञा न देवदे गानें ॥ १ ॥
वास्तव या स्तवनार्हा स्तवितों, कवि तो नव्हे, यथाबुद्धि ।
स्तवितां भावें देतो ज्ञानेश्वरविष्णु हा मनःशुद्धि ॥ २ ॥
ज्ञानेशा ! भगवंता ! भगवज्जनवल्लभा ! महासदया ! ।
कलियुगवर्ती जन जो देशी स्मरणांचि मुक्तिचें पद या ॥३॥
कोणा जडा न होशिल सुगतिप्रद, जाहलासि भिंतीतें ।
श्रीरामाचें जैसें तव यश सज्जनसमाज चिंती तें ॥ ४ ॥
श्रीमद्भगवद्गीताव्याख्या केली जगासि ताराया ।
सारा या सद्ग्रंथा सेवीते संसारताप साराया ॥ ५ ॥
श्रीहरिहरकीर्ति तशा बा ! विश्वास प्रिया तुझ्या ओव्या ।
जो व्यास तोहि बहुधा म्हणतो 'श्रुतिशास्त्रें या मला व्हाव्या॥६॥
ज्ञानेशा ! त्वत्कृतितें करितो ज्ञातें समस्तही प्रणतो ।
ज्ञानेश्वरी भवानी होय महामोह महिष हे म्हणतो ॥ ७ ॥
शंकर निवृत्ति, हरि तूं ज्ञानेश, ब्रह्मदेव सोपान ।
विद्या मुक्ता, तुमच्या कीर्तिसुधेचें सदा असो पान ॥ ८ ॥
गीते ! शुचिकीर्ति तुझी सुमते ज्ञानेश्वरी प्रिया आली ।
झाली विश्वख्याता, हे कार्या बहुजनाश्रिया आली ॥ ९ ॥
नेती तिकडे जासी, भगवति ! बहुमत इचें तुला उक्त ।
ज्ञानेश्वरीस जन जे अनुसरले त्यासि करिसि तूं मुक्त ॥१०॥
त्वां बहु जड उद्धरिले, प्रकट ज्ञानेश्वरा ! दयालो ! हें ।
तारी मयूरहि, तुला परिसासि हिणाविजे न या लोहें ॥११॥

( १५ ) श्रीधरस्वामीः—

गीता हें पदक निर्धारें । वरी ज्ञानेश्वरें जोडिले हिरे ।
इतर जडतील तीं खापरें । मागें अथवा पुढेंही ॥ १६६ ॥

ज्ञानेश्वर तोचि कृष्णनाथ । केला गीतेचा तेणें अर्थ ।
जे निंदितील ते यथार्थ । मंदमती जाणावे ॥ १६८ ॥

( १६ ) मुक्तेश्वरः—

प्राकृत कवीश्वराचार्य । ज्ञानदेव ज्ञानैकवर्य ।
जयाचे बुद्धीचें गांभीर्य । अगाध सिंधूसारखें ॥ १ ॥
त्याचे चरण चिंतिले मनीं । तेणें पावन झालों जनीं ॥

( १७ ) विठोबा अण्णा कऱ्हाडकरः—

यद्विलासवशादात्मवस्तु नैव प्रकाशते ।
अलंदीपो विनाशाय तमसस्तस्य केवलम् ॥

# आरत्या.

१

आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा ।
सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ आ० ॥ ध्रु० ॥
लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी ।
अवतार पांडुरंग । नाम ठेविलें ज्ञानी ॥ आ० ॥ १ ॥
प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि ठेलें ।
रामाजनार्दनीं । पायीं टकाचि ठेलें ॥ आ० ॥ २ ॥

२

होतां कृपा तुमची पशु बोले वेद ।
निर्जिव चाले भिंती महिमा अगाध ।
भगवद्गीता टीका ज्ञानेश्वरी शुद्ध ।
करूनि भाविकलोकां केला निजबोध ॥ १ ॥
जय देव जय देव जय ज्ञानसिंधु ।
नामस्मरणें तुमच्या तुटे भवबंधू ॥ जय० ॥ ध्रु० ॥
चौदाशें वर्षांचे तप्तीतीरवासी ।
येउनि चांगदेव लागले चरणांशीं ।
करुनि कृपा देवें अनुग्रहिलें त्यासी ।
देउनि आत्मज्ञान केलें सहवासी ॥ २ ॥
समाधिसमयीं सकळ संतसमुदाव ।
घेउनि सुरवर आले श्रीपंढरिराव ।
द्वारीं अजानवृक्ष सुवर्णपिंपळासमाव ।
जाणुनि महिमा निळा मागे चरणातळिं ठाव ॥ ३ ॥

३

जय देव जय देव जय ज्ञानदेवा ।
विष्णूचा अवतार देईं पदसेवा ॥ जय० ॥ ध्रु० ॥

बाळपणीं दाखविलें अगाध महिमान ।
रेड्यावदनीं वेद बोलविला जेणें ।
मातीची जड भिंत चालविली कोणें? ।
ऐसें दाविति सुजना अद्भुत विंदाण ॥ १ ॥
तुझिया करिंची काठी अजानतरु झाली ।
देखत लोकां देते ज्ञान महावल्ली ।
ऐसीं अपूर्व चरितें जें लोकीं केलीं ।
तरती पतीत पामर परिसुनि तात्काळीं ॥ २ ॥
भगवद्गीता टीका ज्ञानाची नौका ।
भवसागरतारणिं त्वां केली अकलंका ।
वैकुंठाचे पीठीं बैसविते लोकां
म्हणोनि माधवनंदन वंदी पदपंका ॥ ३ ॥



---

# वरप्रार्थना.

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ १ ॥

जे खळाची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मी रति वाढो ।
भूतां परस्परें जडो । मैत्र जीवांचे ॥ २ ॥

दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ३ ॥

वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ ४ ॥

चलां कल्पतरूंचे अरव । चेतनाचिंतामणींचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ५ ॥

चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ६ ॥

किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥ ७ ॥

—ज्ञानेश्वरी, अ० १८



# पांगारकरांचीं पुस्तकें.

१. भक्तिमार्गप्रदीपः—( आवृत्ति अकरावी ) किं. ०८

२. श्रीएकनाथचरित्रः—सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति किं. ०१२

३. कविरामायण:—किं. ०४

४. आनंदलहरी:—( कवितासंग्रह ) ह्यांत पांगारकरांच्या कवितेपैकीं ४० स्फुट प्रकरणें दिलीं आहेत. किं. ०१२

५. नारदभक्तिसूत्रें:—( आवृत्ति ३ री ) सार्थ, सटीक व सविवरण भक्तिशास्त्राचा यांत सांगोपांग विचार केला आहे. किं. ०८ व्ही. पी. नें ०११

६. नवविधाभक्तिः—नवविधाभक्तीचें नऊ प्रबंधांत विवरण. किं. ०४

७. निरंजनमाधवांची कविता:—भाग १ ला किं. रु. १

८. सार्थ हरिपाठ व चांगदेवपासष्टी:—( वै. विष्णुबुवा जोग यांनीं केलेल्या अर्थासह ) किं. ०५.

९. मोरोपंती वेंचे (दुसरी आवृत्ति):—पंतांच्या अफाट कवितार्णवां-तून निवडलेलीं विविध प्रकारचीं मौक्तिकें यांत एकत्र मिळतील. पंतांचें संक्षिप्त चरित्र प्रथम देऊन काव्यशास्त्रावर स्वतंत्र प्रस्तावना दिली आहे. किं. रु. १०१२

१०. पारिजातकाचीं फुलें ( तिसरी आवृत्ति ):—परमार्थविचाराचे अर्थगंभीर विचार. किं ०८ ११. मारुतिउपासना (आवृत्ति ४ थी) किं ०४.

१२. श्रीतुकाराममहाराजांचें चरित्र:— तुकोबांच्या सर्व प्रसिद्ध अप्रसिद्ध गाथा, जुनीं दप्तरें वगैरे पाहून वारकरीसंप्रदायाच्या इतिहासासह सांग्र लिहिलेला हा ग्रंथ अत्यंत लोकप्रिय झाला आहे. यांत पंढरीच्या श्रीविठ्ठलाचा व देहूचे सहा असे सात फोटो आहेत. प्रकरणें १५ किं. रु. ३

१३. कविवर्य मुक्तेश्वर (चरित्र आणि काव्यविवेचन):—किं. रु. १.

१४. निबंधमालेचें स्वरूप आणि कार्यः—( विष्णुशास्त्र्यांच्या चरित्रासह ) किं. ०१०.

१५. संतचरित्रमाला:—ह्यांत कांहीं प्राचीन व अर्वाचीन अशा ४३ सत्पुरुषांचीं चरित्रें दिलीं आहेत किं० रु० १०८.

१६. मुमुक्षूंतील निवडक निबंध ( भाग १।२ ) प्रत्येकीं रु. १०८.

१७. श्रीदासबोधः— किं. रु. ४.

श्रीतुकारामचरित्रामृत:—नित्यपाठास अत्यंत उपयुक्त किं० ०५.

पत्ता:— व्यवस्थापक 'मुमुक्षु' पुणें शहर.